"अर्थ" ग्रंथमाला

पुस्तक ३ रें

# व्यापारी उलाढाली



लेखक :
प्रो. वामन गोविंद काळे

पुणें

किंमत १ रुपया

सन १९३५

# प्रस्तावना.



चांदी, सरकारी कर्जरोखे, औद्योगिक मंडळ्यांचे भाग, ह्यांच्या किंमतींत मुंबईमधील बाजारांत विलक्षण चढउतार होऊन गोंधळ उडाल्याचीं उदाहरणें अलीकडे वारंवार घडलीं असून त्याविषयींच्या बातम्या वृत्तपत्रांच्या सामान्य वाचकांच्याहि नजरेस आल्या आहेत. वायद्यांचे व्यवहार आणि सट्टेबाजी ह्यांत आपला पैसा घालवून अल्पकालांत पुष्कळ फायदा मिळवण्याची इच्छा महाराष्ट्रीय जनतेमध्येंहि पसरत आहे. कर्जरोखे व मंडळ्यांचे भाग ह्यांत व्यक्तींनीं आपल्या कमाईचा कांहीं अंश गुंतवणें ह्यांत त्यांचें व समाजाचें हित आहे; कारण त्याचे-योगानें उद्योगधंदे आणि व्यापार ह्यांस आवश्यक असलेलें भांडवल प्राप्त होऊन त्यांची अभिवृद्धि होण्यास सहाय मिळतें. तथापि, पैशाचा ह्या प्रकारचा विनियोग समजूतदार रीतीनें होईल तरच त्याचे अपेक्षित सुपरिणाम घडून येतील. ह्याकरितां, रोख्यांच्या, पैशाच्या आणि कपास, चांदी-सोनें इत्यादि अनेक जातींच्या विविध बाजारांत व्यवहार कसे चालतात, तेथील किंमती कमी-ज्यास्त कां व कशा होतात, त्यांत धंदा करणारांनीं कोणत्या धोरणानें वागावें इत्यादि गोष्टींचें ज्ञान सामान्य माणसासहि होणें आवश्यक झालें आहे. महाराष्ट्रांत औद्योगिक व व्यापारी प्रगति होणें अगत्याचें असल्यानें ह्या ज्ञानाचा प्रसार जितका अधिक व जितक्या त्वरेनें होईल तितकें इष्टच आहे.

आधुनिक पद्धतीच्या आर्थिक उन्नतीच्या मार्गांत महाराष्ट्रीयांचें पाऊल पुढें पडत आहे, ही गोष्ट अभिनंदनीय आहे. मराठी वृत्तपत्रांत निरनिराळे बाजारभाव आणि व्यापारी व्यवहारांच्या हकीकती आतां प्रसिद्ध होऊं लागल्या आहेत, हें ह्या उत्क्रांतीचें उत्तेजनकारक निदर्शक आहे. व्यापारी क्षेत्रांतील उलाढालींची माहिती व त्यांचें सांगोपांग विवेचन मराठी वाचकांस पद्धतशीर रीतीनें उपलब्ध व्हावें, ह्या हेतूनें आम्हीं, "अर्थ" हें साप्ताहिक चालविलें आहे. वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होणाऱ्या आणि वेळोवेळ ऐकूं येणाऱ्या, निरनिराळ्या बाजारांतील बातम्यांचें रहस्य, सामान्य मराठी वाचकांस समजेल अशा सोप्या मराठी भाषेंत समजावून देणें, हा प्रस्तुत पुस्तकाचा उद्देश आहे. आर्थिक व्यवहारांसंबंधांतल्या प्रश्नांची चर्चा करून महाराष्ट्रीय समाजाचा कल, संघटित उद्योगधंदे आणि व्यापार ह्यांच्याकडे वळवणाऱ्या वाङ्मयाची आज विशेष आवश्यकता आहे अशी आमची समजूत आहे. 'बँका आणि त्यांचे व्यवहार' आणि 'हिंदुस्थानची रिझर्व्ह बँक' ह्या आम्हीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांच्या मुळाशीं हीच कल्पना असून हें तिसरें पुस्तक त्यांच्या जोडीस आतां वस-

विलें आहे. व्यापार, पैसा, धंदे इत्यादि विषयांच्या माहितीस वाहिलेले वृत्तपत्रांतले रकाने, ही एक अडगळ आहे असें समजून त्यांस बगल देऊन इतर मजकूर वाचण्याकडे महाराष्ट्रीय वाचकांची सामान्यतः प्रवृत्ति असते. ती महाराष्ट्राच्या आजच्या सांस्कृतिक, मानसिक आणि सामाजिक परिस्थितीचें लक्षण आहे. त्या बाबतींत सुधारणा घडवून आणण्याचे कामीं प्रस्तुत पुस्तकाचा उपयोग होईल अशी आशा आहे. हें पुस्तकहि लिहिण्याची स्फूर्ति श्रीमंत सर गंगाधरराव पटवर्धन, चीफ ऑफ मिरज ( सीनियर ), ह्यांच्या प्रोत्साहनानेंच पला मिळाली, हें कृतज्ञतापूर्वक येथें नमूद करणें अगत्याचें आहे.

" दुर्गाधिवास ", पुणें ४ }
ता. १.१०।३५ }

वा. गो. काळे.

# अनुक्रमणिका



## प्रकरण पहिलें

### प्रास्ताविकः—



## प्रकरण दुसरें

### निश्चित व्याजाचे रोखेः—



## प्रकरण तिसरें

### संयुक्त भांडवलाच्या मंडळ्यांचे भागः—

# प्रकरण चौथें

## संयुक्त भांडवलाच्या मंडळ्याः--



# प्रकरण पांचवें

## रोखे-बाजारः—

## प्रकरण सहावें

### पैशाचा बाजार, व्याजाचे दर आणि हुंडणावळः—



## प्रकरण सातवें

### मालाचे बाजारः--

# व्यापारी उलाढाली

---

## प्रकरण पहिलें

---

### प्रास्ताविक

---

#### दैनिकांतले वृत्तविभाग

कोणतेंहि इंग्रजी दैनिक उघडून चाळलें असतां, त्या पत्राचे कित्येक रकाने व पृष्ठें, कर्जरोखे व भाग यांचे बाजारभाव आणि पैशाच्या व्यवहारां-संबंधींचे आंकडे यांनीं भरलेले असल्याचें आढळून येतें. बहुतेक वाचकांस ही माहिती कंटाळवाणी तर वाटतेच; परंतु ती निरर्थक असून तीच जागा ज्यास्त मनोरंजक मजकुरानें भरावी, अशी त्यांची इच्छा असते. मुंबईच्या व्यापारी वर्गाच्या नेहमीं वाचण्यांत येणाऱ्या गुजराती वृत्तपत्रांत इंग्रजी दैनिकांप्रमाणेंच बाजारभाव नियमानें प्रसिद्ध करण्याची व्यवस्था झाली आहे आणि मराठी वर्तमानपत्रांतूनहि अलीकडे अशा प्रकारची माहिती व तीवरील टीका मधून मधून येऊं लागली आहे.

सामान्य वाचकांस ह्या माहितीपेक्षां फौजदारी खटल्यांचे वृत्तांत, सामाजिक भानगडींच्या बातम्या, अपघातांचीं वर्णनें, राजकीय पुढाऱ्यां च्या दौऱ्यांच्या हकीकती, शर्यतींतल्या घोड्यांचे पराक्रम, चित्रपटांचे व नट-नटींचे समाचार, इत्यादि बाबी ज्यास्त मनोरंजक वाटतात; आणि कित्येक जण आपल्या आवडीच्या विषयांचीं पानें प्रथम काढून त्यांतच रंगत असतात. केवळ बाजारभावांच्या माहितीसाठी वर्तमानपत्र विकत घेणारे वाचक महाराष्ट्रांत फार विरळा. महत्त्वाच्या बाजारांसंबंधीं ताज्या बातम्या मिळवून त्या प्रसिद्ध करण्यांत वर्तमानपत्रांस बराच खर्च येतो, व वरच्या दर्जाच्या दैनिकांस ह्या कामाकरितां स्वतंत्र तज्ज्ञ संपादकांचीहि योजना करावी लागते. ज्याअर्थी इंग्रजी व गुजराती वर्तमानपत्रांचे संपादक

आपल्या दैनिक अंकाचा बराचसा भाग व्यापारी घडामोडींच्या हकीकती प्रसिद्ध करण्यांत खर्च करतात,- त्याअर्थीं ह्या बातम्या त्यांच्या ग्राहकांपैकीं अनेकांस उपयुक्त व महत्त्वाच्या वाटत असल्या पाहिजेत, हें उघड आहे. सर्व साधारण वाचकांस असल्या वृत्तांताचें महत्त्व नसतें; परंतु, विशेषेंकरून त्याच बातम्या प्रसिद्ध केल्या व इतर मजकूर फारसा दिला नाहीं, तरी वर्तमानपत्र तातडीनें विकत घेणारा वाचकवर्ग मुंबई, अहमदाबादप्रमाणें महाराष्ट्रांत अजून निर्माण व्हावयाचा आहे. अलीकडे रोख्यांच्या बाजारांत कांहीं मंडळी कारवाई करूं लागली असल्यानें व्यापारी माहितीचें महत्त्व इकडे हळुहळु वाढत आहे, असें मात्र दिसून येतें. खुद्द पुण्यामध्यें रोज संध्याकाळीं 'ईव्हिनिंग न्यूज'ची वाट पहाणारे कांहीं लोक आढळतात.

## मराठी वृत्तपत्रें आणि व्यापारी बातम्या

अलीकडच्या जागतिक, राजकीय व आर्थिक घडामोडींमुळें महाराष्ट्रीय वृत्तपत्रांत येणाऱ्या बातम्यांमध्यें व्यापारी महत्त्वाच्या बातम्यांस वाढतें स्थान मिळणें अपरिहार्य झालें आहे. डॉलरच्या, पौंडाच्या किंवा फ्रँकच्या भावांत चढउतार झाल्यास त्याची हकीकत जाडी टाइपांत देण्यांत येते, व सरकारनें नवीन कर्ज काढावयाचें ठरवल्यास त्या बातमीस मोठें महत्त्व प्राप्त होतें. सोन्या-चांदीचा आणि सरकारी कर्जरोख्यांचा रोजचा भावहि प्रामुख्यानें छापला जातो. वृत्तपत्रांत व्यापार-विषयक असा कांहींतरी मजकूर बातमीवजा असणें हें प्रतिष्ठितपणाचें लक्षण समजलें जात असून, ही प्रवृत्ति प्रगतीचें लक्षण म्हणून एका दृष्टीनें अभिनंदनीयच गणली पाहिजे. कित्येक जिज्ञासु वाचकांस, प्रयत्न करूनहि, ज्ञान आणि सांपत्तिक फायदा प्राप्त करून घेण्याचे कामीं व्यापारी अहवालांचा उपयोग करून घेतां येत नाहीं. व्यवहारांची मोडणी व व्यापारी परिभाषा अवगत असल्याखेरीज बाजारभावांच्या आंकड्यांचें व वृत्तांतांचें आकलन होणें शक्य नसतें, ही मोठी अडचण आहे. व्यापारी बातम्या व आंकडे त्रोटक पण स्पष्ट व बिन-चूक देणें आवश्यक असतें; आणि त्यांची चांगली खुलासेवार फोड होणें सर्वसाधारण वाचकांचे दृष्टीनें इष्ट असलें, तरी आटोपशीरपणा साधण्या-करितां सांकेतिक शब्दांचा उपयोग केल्याखेरीज गत्यंतर नसतें. व्यापारी अहवाल, बातम्या आणि आंकडे ह्यांचें रहस्य लक्षांत येणें, आमच्या देशांत, व विशेषेंकरून महाराष्ट्रांत, दिवसानुदिवस अधिकाधिक आवश्यक

होत आहे. अलीकडे नवीन नवीन कंपन्या निघत आहेत, व जुन्या मंडळ्यांची पुनर्घटना होत आहे. विमा मंडळ्या, बँका, साखरेचे व इतर कारखाने, व्यापारी संघ, इत्यादींची घटना, व्यवहार आणि उपयोग ह्यांविषयीं समाजांत कुतूहल उत्पन्न झालें आहे. तसेंच, व्याजाचे दर उतरल्यामुळें किरकोळ कमाईवर आपला गुजारा करणाऱ्या कित्येक मध्यम स्थितींतल्या बायाबापड्यांचें उत्पन्न घटलें आहे. शेतकरीवर्गाचा कर्जबाजारीपणा वाढला असून त्यास आणि कारागीर लोकांस तारणाचे अभावीं कर्ज मिळण्याची मारामार पडत आहे, तर सुखवस्तु वर्गाचे पैसे, जवळच्या ठेवी वाढल्यामुळें, बँका स्वीकारण्यास तयार नाहींत. हीं स्थित्यंतरें नीट समजण्यास आणि त्यांपासून स्वतःचें हित करून घेण्यास, निदान त्यांच्या योगानें होणारें नुकसान टाळण्यास, प्रत्यहीं होणाऱ्या आर्थिक घडामोडींचें ज्ञान सर्व जनतेंत पसरणें आवश्यक झालें आहे. ह्याकरितां सदरहु विषयाचें थोडेसें विस्तृत विवेचन येथें केल्यास तें उपयुक्त होईल असें वाटतें.

## व्यापारी बातम्यांचें महत्त्व

बाजारांत नित्य होणाऱ्या उलाढालींचें व चढ-उतारांचें महत्त्व वस्तुतः सर्व नागरिकांस आहे. कारण, त्यांचा परिणाम प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें प्रत्येकाच्या जीवितावर होत असतो. कारखानदार आणि धंदेवाले ह्यांनींच बाजाराच्या हालचालींकडे लक्ष्य ठेवावें, इतरांस ही उठाठेव कशास पाहिजे? असें कोणांस वाटत असेल तर ती त्यांची चूक आहे. वृत्तपत्रांत अपघात, गुन्हे, अधिकाऱ्यांच्या बदल्या व नेमणुका, निवडणुकींचे निकाल, कायदेमंडळांतली चर्चा इत्यादींच्या हकीकती लोक वाचतात. सरकारी कर्जरोख्यांचे भाव चढले, मालाची आयात-निर्गत कमी-ज्यास्त झाली, चलनाचा प्रसार किंवा चणचण झाली, सोनें--चांदी महागली किंवा स्वस्तावली वगैरे प्रकारच्या बातम्यांचें सामान्य नागरिकांस वरील हकीकतीपेक्षां अधिक नसलें तरी त्यांच्या इतकें महत्त्व वाटूं नये काय? वास्तविक पाहातां, आर्थिक उलाढालींचा संबंध प्रत्येक माणसाच्या संसाराशीं येतो आणि ही वस्तुस्थिति त्यास कळली नाहीं तरी तिचा बरावाईट परिणाम त्याच्यावर झाल्यावांचून मात्र रहात नाहीं. मनुष्यानें आपला प्रपंच ज्ञानपूर्वक, सावधगिरीनें 'नेटका' केला पाहिजे; आणि त्याकरितां संभाव्य काय चाललें आहे ह्याचें त्यास ज्ञान पाहिजे. म्हणजे दूरदृष्टि ठेवून, येणाऱ्या आपत्तींची

वेळींच तरतूद करणें त्यास शक्य होतें आणि अनुकूल परिस्थितीचा फायदाहि घेतां येतो. संसारसागरांत आपली नाव पडली असतांना केवळ दैवावर हवाला ठेवून बेफिकीरपणें न वागतां ती तीरास सुरक्षितपणें लागेल ह्याविषयीं दक्षता बाळगणें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य आहे. ह्यासाठीं आर्थिक व्यवहारांची माहिती सामान्य जनतेसहि होणें अगत्याचें आहे असें उघड होतें.

## सामान्य जनता आणि व्यापारी हालचाली

समाजांतील निरनिराळया पेशांच्या व दर्जांच्या लोकांचे आर्थिक हितसंबंध आणि गरजा भिन्नभिन्न असल्या तरी उद्योगधंद्यांच्या, व्यापाराच्या, बँकिंगच्या व असल्या इतर आर्थिक क्षेत्रांत काय घडामोडी चालल्या आहेत ह्याचें ज्ञान त्यांपैकीं प्रत्येकाच्या विशिष्ट दृष्टीनें प्राप्त होणें अगत्याचें आहे. एक तर, अलीकडे आर्थिक हालचाली अत्यंत निकट रीतीनें परस्परा-वलंबी अशा झाल्या आहेत. त्या कारणानें पांढरपेशा वर्गांतील लोकांसहि त्यांची स्थूलमानाची माहिती असावी लागत आहे. एखाद्या सामान्य स्थितीं-तल्या माणसास देखील आपली अगदी अल्प बचत व्याजी लावावयाची असेल तर त्यास पोस्ट ऑफिसची किंवा सहकारी बँकेची सेव्हिंग्ज खात्यांतली सोय काय असते हें ठाऊक असलें पाहिजे. व्याजाचे दर कमी-ज्यास्त झाले आहेत कीं काय, पोस्ट ऑफिसच्या कॅश सर्टिफिकिटांत आपले पैसे गुंतवणें सोयीचें व फायद्याचें आहे काय, आपणांस कर्ज मिळण्याची चांगली सोय कोठें आहे इत्यादि प्रकारच्या साध्या गोष्टींचें ज्ञान त्यास आवश्यक आहे आणि त्यासंबंधांत वारंवार फेरबदल होत असतात, तेहि त्यास समजले पाहिजेत. असल्या साध्या गोष्टींची माहिती सामान्य माणसांस झाली असतां त्यांचा व त्यांच्या कुटुंबांचा फायदा तर होईलच; पण अप्रत्यक्ष रीतीनें त्यांत एकंदर समाज आणि राष्ट्र ह्यांचेंहि हित आहे.

## पांढरपेशे व सुशिक्षित लोक

ही सामान्य स्थितींतल्या लोकांची गोष्ट झाली. पांढरपेशा, सुशिक्षित आणि बऱ्या स्थितींतल्या वर्गाचा विचार केला तर आर्थिक व्यवहारांचें ज्ञान त्यांस अधिकच उपयुक्त आणि आवश्यक आहे असें दिसून येईल. सरकारी कर्जरोखे, औद्योगिक व व्यापारी मंडळ्यांचे भाग, इत्यादींत आपला शिलकी पैसा गुंतवावयाचा असल्यास रोख्यांच्या बदलणाऱ्या बाजार-भावांची माहिती त्यांस जरूर आहे. अशा लोकांची बचत त्यांच्या

जवळ पडून रहाण्यांत किंवा योग्य रीतीनें न गुंतवली जाण्यांत त्यांचें व समाजाचें नुकसान आहे. हा पैसा बँका, औद्योगिक मंडळ्या, सरकारी व स्थानिक संस्थांचे कर्जरोखे ह्यांमध्यें घातला गेला असतां देशाचे उद्योगधंदे आणि व्यापार ह्यांस सहाय्य होऊन सर्वांची सोय निघते आणि राष्ट्राची उत्पादक शक्ति आणि कमाई वाढते. परंतु राष्ट्रांचे आर्थिक व्यवहार कसे चालतात, त्यांमध्यें स्थित्यंतरें कशीं होतात आणि दिवसानुदिवस त्यांच्या धडामोडी कसकशा बनत जातात, ह्याची माहिती नसणारे लोक आपला पैसा किफायतशीर रीतीनें व्यापारांत गुंतवण्यास प्रवृत्त होणें शक्य नाहीं. म्हणून आर्थिक व्यवहारांच्या पद्धतींचें स्थूलमानाचें ज्ञान मध्यम स्थितींतल्या लोकांस असलें पाहिजे आणि हें ज्ञान देणाऱ्या साधनांचा त्यांस उपयोग करून घेतां आला पाहिजे.

## व्यापारी वर्ग आणि व्यापारी व्यवहारांच्या बातम्या

लहान-मोठ्या उद्योगधंद्यांशीं व व्यापाराशीं ज्यांचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध येतो अशा मंडळींचें बाजाराच्या दैनिक परिस्थितीच्या माहितीवांचून खरोखर चालावयाचेंच नाहीं. ह्यांपैकीं कांहीं मंडळी तुटपुंज्या व जुजबी ज्ञानावर काम भागवतात. परंतु त्यांचे व्यवहार प्रगमनशील व कार्यक्षम होण्यास त्यांस आपल्या धंद्यांतले आडाखे समजले पाहिजेत. इतकेंच नव्हे तर, त्या संबंधांत दिवसानुदिवस काय फेरफार होतात तेहि ठाऊक झाले पाहिजेत. निरनिराळ्या जातींच्या व्यवहारांचे स्वतंत्र ‘बाजार’ आज संघटित झाले असून त्यांच्या पद्धति, नियम, प्रचार इत्यादि तपशीलहि निश्चित झाले आहेत. सोनें-चांदी, जवाहीर, मोती, कापड-चोपड, कपास, गळिताचीं धान्यें, साखर, ताग, चहा, दगडी कोळसा, सरकारी व इतर कर्जरोखे, संयुक्त भांडवलाच्या मंडळ्यांचे भाग, हुंड्या, बँकिंग, सराफी ह्या सर्वांचे असे बाजार आहेत व त्यांमध्यें वावरणाऱ्या धंदेवाल्यांस त्यांची मांडणी अवगत पाहिजे. मुंबई-कलकत्त्याच्या बाहेर धंदा करणाऱ्या लोकांस ह्याची विशेष आवश्यकता आहे. कारण, इलाख्याच्या मुख्य ठिकाणीं व उद्योगधंद्यांच्या मोठ्या केंद्रांमध्यें धंदेवाल्यांस आपल्या विशिष्ट उद्योगांच्या पद्धतींचें ज्ञान रोजच्या अनुभवानें सहज होतें. जिल्ह्यांतील लहान-मोठ्या ठिकाणांतील व्यापाऱ्यांस हें शक्य नसल्यानें, त्यांस अडत्ये, दलाल, सराफ वगैरे मध्यस्थांवर सर्वस्वी अवलंबून रहावें लागतें. निदान, विस्तृत ज्ञानाच्या

अभावीं, आपला धंदा वाढवणें, इतर उद्योगांस हात घालणें इत्यादि फाय-द्याच्या गोष्टी करणें त्यांस कठिण होतें. मुंबईसारख्या बंदराच्या शहरीं पर-राष्ट्रीय आयात-निर्गत व्यापार मोठ्या प्रमाणावर चालणें अपरिहार्य आहे, आणि तेथेंच व्यापारी बँका, एक्सचेंज बँका आणि मोठमोठ्या औद्योगिक मंडळयांच्या मुख्य कचेऱ्या प्रस्थापित होतात. तेथील धंदेवाल्यांस आपापल्या बाजारांविषयींची माहिती देशी भाषांत प्रसिद्ध होणाऱ्या दैनिक पत्रांत उपलब्ध होऊन तिचा त्यांस चांगला उपयोग करून घेतां येतो.

## महाराष्ट्रीय जनता आणि व्यापारी वृत्ति

महाराष्ट्रांतल्या लहान मोठ्या शहरांमध्यें अशा प्रकारची सोय आणि प्रघात नाहीं. इंग्रजी दैनिकांत व्यापारी माहितीनें भरलेलीं पानें असतात, त्यांतील मजकुराचें महत्त्व न वाटल्यामुळें व त्या संबंधाची गोडी नसल्यानें बहुतेक वाचक तीं उलटून पुढें जातात. ह्या माहितीचा दैनिक पुरवठा ही एक वर्तमानपत्रांतील अडगळच आहे असें त्यांस वाटतें. इंग्रजी जाणणारांची ही अवस्था झाली असतां ती भाषा ज्यांस येत नाहीं त्यांची गोष्ट तर विचा-रावयासच नको. मराठी दैनिकांत अलीकडे कोठें बाजारभावांचें सदर सुरू करण्यांत आलें असून साप्ताहिकांत क्वचित् त्यावर थोडें-बहुत भाष्यहि असतें. महाराष्ट्रीय वृत्तपत्रांत व्यापारी माहितीचीं एकदोन पानें दिल्यास तीं कोणी हातीं तरी धरतील कीं नाहीं ह्याची वानवाच आहे. आमचें ‘ अर्थ ’ साप्ताहिक, धंदे, व्यापार, चलन, हुंडणावळ, बँकिंग वगैरे आर्थिक विषयांच्या चर्चेस वाहिलेलें असल्यानें वर उल्लेखिलेल्या माहितीचे आंकडे स्पष्टीकरणासह देण्याचा प्रघात आम्हीं चालू ठेवला आहे. शिवाय, ह्या बाबतींतले आठवड्याचे आंकडे स्वतंत्र देण्याचाहि उपक्रम आम्हीं केला आहे. तथापि, ह्या आंकड्यांचें व माहितीचें रहस्य व त्यांच्या मुळाशीं अस-लेलीं तत्त्वें आणि त्यांची मांडणी हीं नीट ध्यानांत आल्यावांचून असल्या सटीक अंकमालिकांचा व्हावा तसा उपयोग होणार नाहीं. म्हणून हें ज्ञान सोपपत्तिक, सोदाहरण व सोप्या भाषेंत देण्यासाठी प्रस्तुत पुस्तक आम्हीं लिहिलें आहे. त्यांतलें विवेचन धंदेवाल्यांस, पांढरपेशा लोकांस व सामान्य वाचकांसहि सहज समजावें अशी रचना केलेली आहे. विवेचन केवळ तांत्रिक स्वरूपाचें न होतां त्यानें सुलभ तत्त्वबोध व्हावा अशी खबरदारी घेतली आहे.

## पुढील प्रकरणांतील विषय

व्यापारी माहितीचे, तिच्या स्वरूपास अनुसरून, निरनिराळे युक्त असे भाग केले असून ती स्वतंत्र प्रकरणांत ग्रथित केली आहे. निरनिराळ्या पेशांच्या वाचकांस उपयुक्त होईल अशी विषयांची मांडणी केली आहे, आणि प्रत्येक प्रकरणांत, वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होणाऱ्या माहितीचीं उदाहरणें दिलीं आहेत. मुंबईच्या बाजारांत वावरणाऱ्या व्यक्ती व त्यांत व्यवहार करणाऱ्या मंडळ्या आणि संस्था ह्यांचेकडून बरीचशी तपशीलवार माहिती दैनिक वृत्तपत्रांस मिळते व पत्रांचे प्रतिनिधिहि कांहीं माहिती जमवून ती संगतवार मांडणीसाठी तयार करतात. त्यांचे वृत्तांत व आंकडे ह्यांपासून अर्थबोध कसा करून घ्यावा हेंहि प्रस्तुत पुस्तकाच्या वाचनानें लक्ष्यांत यावें अशी योजना आम्हीं केली आहे. प्रत्येक धंद्यांतील व्यवहारांची विशिष्ट परिभाषा असते आणि त्यांतल्या धडामोडी आंकड्यांत व्यक्त करण्याची ठराविक पद्धति बसून गेलेली असते. आंतरराष्ट्रीय हुंडणावळीचें उदाहरण घेतलें असतां ह्या विधानाची सत्यता तेव्हांच पटेल. पांढरपेशा वर्गाच्या थोड्याबहुत परिचयाच्या सरकारी कर्जरोख्यांच्या विषयानें आम्हीं पुस्तकास प्रारंभ केला असून पहिल्या प्रकरणांत त्याचें प्रामुख्यानें विवेचन केलें आहे. पुढील भागांत निरनिराळे व्यापारी व्यवहार आणि बाजार ह्यांचीं वर्णनें यथाक्रम येतील.

---

# प्रकरण दुसरें

## निश्चित व्याजाचे रोखे

### कर्जें आणि कर्जरोखे

एखाद्या इसमास पैशाची जरूर लागल्यास तो इतरांकडून रकमा कर्जाऊ घेतो आणि त्यांस वचनचिठ्ठ्या लिहून देतो. कर्ज काढण्याचा हा अगदी सामान्य व सर्वत्र प्रचलित असा मार्ग आहे. कर्ज देतांना सावकार रोखा लिहून घेतो आणि करारप्रमाणें कर्जफेड झाली नाहीं, तर ऋणकोवर कायदेशीर इलाज करून कोर्टामार्फत आपली रकम तो वसूल करतो. अशा रीतीनें ऋणको व धनको ह्यांचा कायदेशीर देण्या-घेण्याचा परस्पर-संबंध निर्माण होतो; तथापि सावकारास आपली रकम परत मिळण्याच्या कामीं अनेक अडचणी येतात व ऋणकोकडून व्याजाची रकम वेळेवर वसूल होणेंहि जड जातें. स्वतः सावकारास रोकड पैशाची जरूर लागल्यास त्यानें कर्जाऊ दिलेला पैसा उपयोगी पडत नाहीं. त्याच्या हातांत असलेला, ऋणकोनें लिहून दिलेला, कर्जरोखा बाजारांत विकून त्याची रोकड करतां येत नाहीं; कारण असल्या वैयक्तिक स्वरूपाच्या व्यवहारास तेथें महत्त्व प्राप्त होणें अशक्य असतें. ह्याच्या उलट, सरकारांनीं किंवा निमसरकारी व मोठ्या खासगी व्यापारी संस्थांनीं लिहून दिलेल्या कर्जरोख्यांचा पैसा वाटेल तेव्हां उभा करतां येण्याची सोय असते. जेव्हां राष्ट्रीय सरकारें, बँका आणि औद्योगिक व व्यापारी मंडळ्या ह्यांसारख्या संस्था भांडवल जमा करतात, तेव्हां देखील लोकांकडून त्या कर्ज काढतात किंवा त्यांस भागीदार करून घेतात. राष्ट्रीय सरकारनें काढलेल्या रोख्यांचे मालक, हे सरकारचे सावकार बनतात आणि मंडळ्यांचे भाग धारण करणारे लोक त्यांचे मालक होतात. हे हक्क ज्यांत नमूद केलेले असतात, तीं खतें व पत्रें हजारो, लाखो असूं शकतील आणि दोन व्यक्तींमधील करारपत्रांपेक्षां असल्या रोख्यांस अर्थातच ज्यास्त महत्त्व प्राप्त होतें. तसेंच, ह्या रोख्यांची बाजारांत खरेदी-विक्री सररहा होऊं शकते. **लोकांस आपल्या रकमा गुंतवावयाच्या असतात तेव्हां त्यांस कर्ज घेणाऱ्या**

व्यक्ती शोधून काढून त्यांच्याशीं स्वतंत्र करार करण्याची आवश्यकता ह्या रोख्यांच्या बाजारामुळें उरत नाहीं. रोखे व भाग खरेदी करणें त्यांस सोपें असतें. या उलट, रोखे धारण करणारे लोकहि योग्य भाव आल्यास, बाजारांत ते विकूं शकतात. अशा रीतीनें, रकमा व्याजी लावणें व कर्जाऊ दिलेल्या पैशाची, जरूरीप्रमाणें, रोकड उभी करणें ह्या गोष्टी, कर्जरोख्यांची खरेदी-विक्री मोठ्या प्रमाणांत व उघड रीतीनें होण्याची बाजारांत सोय झाल्यामुळें, अनायासें घडतात. रोखे व भाग ह्यांची देवघेव पद्धतशीर व्हावी म्हणून मोठमोठ्या शहरांतून त्यांचे विशिष्ट बाजार निर्माण होतात, व त्यांमध्यें ऋणलेखांची खरेदीविक्री सारखी चालते. ह्या बाजार-नियामक संस्थांस 'स्टॉक एक्सचेंज' असें म्हणतात.

## रोखे-बाजार ( स्टॉक एक्सचेंज )

स्टॉक एक्सचेंजच्या व्यवहारांची माहिती पुढें येईलच. ह्या रोख्यांच्या बाजारांत खरेदी किंवा विक्री करणारे लोक जातीनें हजर राहिले पाहिजेत असें नाहीं; तेथील सर्व व्यवहार दलालांचे मार्फत होतात. गाडीतळावर ज्या-प्रमाणें कडब्यांच्या गाड्या उतरतात आणि त्यांच्या मालकांच्या वतीनें दलाल बोलणीं करितो, त्याप्रमाणेंच येथेंहि होतें. कर्जाची मुदत, त्यावरील व्याजाचा दर इत्यादि बाबी सर्व ऋणलेखांत एकाच तऱ्हेच्या नसतात. कर्ज काढणाऱ्या संस्थेचा आणि मंडळीचा दर्जा, त्यांची पैशासंबंधाची गरज, कर्जाऊ घेतलेल्या भांडवलाचा होणारा विनियोग इत्यादि बाबींमध्यें भिन्नता असते, तशीच भिन्नता कर्जरोख्यांत नमूद झालेल्या शर्तींमध्येंहि असते. राष्ट्रीय सरकारांच्या कर्जरोख्यांत सुरक्षितता पहिल्या प्रतीची असली, तरी एका देशापेक्षां दुसऱ्या देशाची आंतरराष्ट्रीय पत कमी जास्त असणें स्वाभाविक आहे. त्याचप्रमाणें, निमसरकारी संस्थांच्या ऋणलेखांवरील लोकांचा विश्वास, हा त्या संस्थांच्या व्यवस्थेवर, सचोटीवर आणि आर्थिक परिस्थितीवर अव-लंबून राहील. तथापि, सरकारें व निमसरकारी संस्था ह्यांनीं लिहून दिलेल्या कर्जरोख्यांत दाखल असलेलें व्याज ठराविक दरानें हमखास मिळेल आणि मुद्दलहि कराराप्रमाणें परत केलें जाईल ह्याविषयीं शंका घेण्यास जागा नसते. व्यापारी व औद्योगिक मंडळ्यांची गोष्ट ह्याहून भिन्न असते. बँका, गिरण्या इत्यादि चालविणाऱ्या मंडळ्यांचे भागांवर काय उत्पन्न मिळेल, हें नेहमींच अनिश्चित रहाणार. कांहीं मंडळ्या आजतागायत एकसारखा नफा वांटीत

आल्या आहेत, तथापि औद्योगिक व व्यापारी चढ-उताराचा परिणाम ह्या नफ्यावर होणें अपरिहार्य आहे.

### ऋणलेखांचे दोन मुख्य प्रकार.

भागांवर दिलें जाणारें डिव्हिडंड हें प्रत्येक वर्षांत होणाऱ्या नफ्यावर अवलंबून रहातें आणि ह्यामुळें मंडळयांच्या भागांस निश्चित व्याजाचे रोखे असें म्हणतां येणार नाहीं. तथापि, ह्या मंडळयाहि निश्चित व्याजाचा करार करून 'डिबेंचर्स'च्या स्वरूपांतल्या रोख्यांच्या द्वारें कर्जें काढीत असतात, हें येथें नमूद करणें आवश्यक आहे. कर्जरोख्यांच्या बाजारांत, (स्टॉक एक्सचेंज) खरेदी-विक्री करण्यांत येणाऱ्या ऋणलेखांचे, वरील विवेचनास अनुलक्षून, दोन प्रमुख विभाग पाडतां येतील, ते ह्याप्रमाणें:—




देशांच्या सरकारांनीं काढलेलीं कर्जें ज्यांत नमूद आहेत असे रोखे व म्युनिसिपालिटट्या, पोर्ट ट्रस्ट इत्यादि निम-सरकारी संस्थांनीं लिहून दिलेले कर्जरोखे ह्यांचा समावेश पहिल्या वर्गांत होईल. बँका, विमाकंपन्या, रेल्वेज, कारखाने, गिरण्या इत्यादि संस्था चालविणाऱ्या संयुक्त मंडळयांनीं भागांचे रूपानें भांडवल उभारलेलें असतें व त्या स्वरूपांत काढलेल्या कर्जाचे निदर्शक रोखे दुसऱ्या विभागांत समाविष्ट होतील. प्रस्तुत प्रकरणांत वरील दोन वर्गांपैकीं पहिल्या प्रकारच्या रोख्यांचें विवेचन आम्ही करणार आहों.

### सरकारी कर्जरोख्यांचें वैशिष्ट्य.

सुरक्षितपणाचे दृष्टीनें सरकारी कर्जरोख्यांचा नंबर पहिला लागेल. वेळच्यावेळीं ठराविक व्याज मिळून मुदलाची परतफेड होण्याची निश्चितता असणें

एवढ्यानें कर्ज देणारांचें समाधान होण्यासारखें नाहीं; तर प्रसंग पडल्यास परतफेडीच्या ठरलेल्या वेळेपूर्वीहि आपलें मुद्दल उभें करतां येईल, अशी त्यांस खात्री वाटली पाहिजे. म्हणजे जवळ असलेला कर्जरोखा वाटेल तेव्हां बाजारांत विकून त्याचे रोख पैसे त्यांस उभे करतां आले पाहिजेत. ह्या दृष्टीनें विचार केला असतां, सरकारी कर्जरोख्यांइतका सुरक्षितपणा व निश्चितता इतर कोणत्याच रोख्यांत आढळून येणार नाहीं. अर्थात् विशिष्ट अडचणीच्या प्रसंगीं, राष्ट्रीय सरकारांसहि आपले ऋणको ह्या नात्याचे करार पाळतां येतीलच, असें नाहीं. तथापि, सरकारी कर्जरोख्यांइतकी सुरक्षितता इतर रोख्यांचे बाबतींत मिळणें कठिण आहे, ही गोष्ट अगदीं स्पष्ट आहे. प्रजेवर कर बसवून आपलें उत्पन्न जरुरीप्रमाणें वाढवण्याचा अधिकार आणि सबंध राष्ट्राची इभ्रत, ह्यांचा जणूं काय ह्या रोख्यांस पाठिंबा असतो आणि अशा प्रकारच्या भरभक्कम तारणामुळें त्यांस विशेष महत्त्व प्राप्त होणें साहजिक आहे. योग्य व्याज हमखास मिळण्याचीच केवळ ज्यांस व्यवस्था करावयाची असते व मुद्दल उभें करण्याची आवश्यकता उत्पन्न होईल असें ज्यांस वाटत नाहीं अशा व्यक्ती व संस्था ह्यांनीं आपले पैसे सरकारी कर्जरोख्यांत गुंतवणें सोईचें असतें. परंतु, विवक्षित मर्यादेपर्यंत सुरक्षितता प्राप्त होऊन शिवाय जास्त व्याजाची अपेक्षा असेल, तर दुसऱ्या विभागांत वर्णिलेले रोखे अधिक सोइस्कर वाटतील.

## युद्ध-कर्जांचा बोजा

जगांतील सर्व देशांचीं सरकारें वरचेवर नवीं कर्जें काढीत असतात व जुन्या कर्जांची परतफेड करीत असतात. युद्धाचे प्रसंगीं खर्चासाठी मोठमोठ्या रकमांची जरूरी भासते. त्यांपैकीं कांहीं पैसा जादा कर बसवून उभा केला, तरी मोठमोठ्या रकमा आकर्षक अशा व्याजाचा दरांचें आमिष दाखवून कर्जाऊच घ्याव्या लागतात. महाराष्ट्राच्या इतिहासांत पेशव्यांचा कर्जबाजारीपणा तर प्रसिद्धच आहे. अमेरिकेनें स्वातंत्र्य युद्ध जिंकलें, त्यावेळीं इंग्लंडच्या कर्जांत १६५ कोटि रुपयांची भर पडली. नेपोलियनशीं झालेल्या युद्धांमुळें इंग्लंडास ८५८ कोटि रुपये कर्ज काढावें लागलें. गेल्या महायुद्धामुळें जगांतील सर्वच देशांमध्यें राष्ट्रीय कर्जांत विलक्षण भर पडली आहे. ह्या कर्जांचा उपयोग अर्थोत्पादनाकडे होत नसून, त्यांचें सहाय संपत्तीचा नाश आणि मनुष्यहानि यांस मात्र होत असतें. ह्यामुळें जनतेच्या बचत केलेल्या भांडवलाचा विनियोग सामाजिक हिताप्रीत्यर्थ व्हावा तसा होत

नाहीं; आणि पिढ्यान् पिढ्या कर्जाचा बोजा सरकारांवर म्हणजे अप्रत्यक्षपणें जनतेवर बसून, राष्ट्रीय उत्पन्नाचा मोठा भाग व्याजापायीं खर्च होतो. कांहीं कांहीं वेळां युद्ध करणें हें राष्ट्राच्या संरक्षणासाठी व अस्तित्वासाठीहि जरूर असतें हें खरें; तथापि, सर्वसाधारणपणें, अशा प्रसंगीं काढलेल्या कर्जावर व्याज भरपूर द्यावें लागतें. हिंदुस्थानांत युद्धखर्चाकरितां मोठमोठीं सरकारी कर्जें काढलेलीं आहेत, आणि वार्षिक उत्पन्नाच्या वाढाव्यांतून त्यांची वेळो-वेळ फेड करण्यांत आली आहे. त्यांपैकीं कित्येक कर्जें इंग्लंडमध्यें उभार-लेलीं आहेत.

## उत्पादक कामांसाठीं काढलेलीं कर्जें.

इतर कांहीं कारणांसाठीहि राज्यकर्त्यांस कर्जाची जरूरी भासते. राष्ट्रीय, प्रांतिक आणि स्थानिक सरकारांस लोकहिताचीं मोठीं कामें हातीं घ्यावीं लागतात, तेव्हां त्यांस जरूर असलेला पैसा उभा करण्यास सार्वजनिक कर्ज हाच एक मार्ग उपलब्ध असतो. आगगाड्या, पूल, रस्ते, पाटबंधारे, पाणीपुरवठ्याच्या व ड्रेनेजच्या वगैरे योजना लांब मुदतीचीं कर्जें काढूनच पार पाडाव्या लागतात. त्यांसाठीं परतफेडीची मुदत ठरवून गंगाजळींत जरूर ती रकम दरसाल टाकीत गेलें म्हणजे कराराप्रमाणें कर्जफेड करतां येते. लोकहिताच्या उत्पादक कार्याकडे कर्जाचा विनियोग झाला असतां नवीन कामांमुळें जें वाढतें उत्पन्न मिळतें, त्यांतून प्रारंभीं केलेल्या अंदाजी योजने-प्रमाणें कर्जाची परतफेड, निदान व्याजाची भरपाई तरी, करितां येते. इंग्लंड-मध्यें अशा तऱ्हेचे राष्ट्रीय रोखे अजिबात नाहींतच, असें म्हटलें तरी चालेल. उत्पादनाचें कार्य खासगी कंपन्यांकडे सर्वस्वी असून, सरकारास मध्यें हात घालण्याचें कारण पडत नाहीं. कांहीं कांहीं प्रसंगीं तात्पुरत्या वेळेपुरतें कर्ज घेण्याची जरूरी भासते. अशा वेळीं ट्रेझरी बिलांसारख्या अत्यल्प मुदतीचीं कर्जें काढण्यांत येतात. सरकारी खर्च वर्षभर सारखा चालू असतो; परंतु उत्पन्न त्या प्रमाणांत सतत येत रहात नाहीं. कमी-जास्त उत्पन्नाचे मोस-मच असतात, आणि त्यावेळीं जमा व खर्च ह्यांचेमध्यें खिंड पडते. ती भरून काढण्यासाठी जरूरीप्रमाणें ट्रेझरी बिलांच्या रूपानें तीन किंवा सहा महिने मुदतीचीं कर्जें उभारण्यांत येतात. ज्यांस खेळता पैसा पांच-चार महिने गुंतवावयाचा असतो अशा लोकांस आणि बँकांसहि ही मोठी सोय असते. हिंदुस्थानांत राष्ट्रीय सरकारनें आगगाड्या व कालवे ह्यांच्यासाठीं कोट्यवधि

रुपयांचीं कर्जें काढलीं आहेत. त्यांपैकीं बरींच इंग्लंडमध्यें उभीं केलेलीं आहेत. फार लहान प्रमाणांत, कांहीं प्रांतिक सरकारांनींहि अशीं कर्जें काढलीं आहेत.

## कर्जांची मुदत व त्यांवरचें व्याज.

अशा रीतीनें, बाजारांची परिस्थिति, पुढें होणाऱ्या आर्थिक घडामोडींचा अंदाज आणि तिजोरीची मागणी ह्या गोष्टींस अनुलक्षून सरकारी कर्जें व त्यांच्या मुदती भिन्नभिन्न प्रकारांच्या असतात. तीन महिने, एक वर्ष, तीन वर्षें, पांच वर्षें, दहा वर्षें अशा मुदतींच्या करारानें सरकार जनतेकडून पैसा कर्जाऊ घेतें. ठरलेली मुदत भरण्यापूर्वीं रोख्यांचे पैसे परत देण्याचा हक्क कित्येक करारांत सरकारनें राखून ठेवलेला असतो. कांहीं कर्जांस परत फेडीची मुदतच नसते व तीं सरकारच्या सोयीप्रमाणें केव्हांहि फेडतां येतात. बिनमुदतींच्या राष्ट्रीय कर्जांच्या रोख्यांस ( उदाहरणार्थ, साडेतीन टक्क्यांचे हिंदुस्थान सरकारचे कर्जरोखे ) विशिष्ट वर्ग आणि संस्था ह्यांचेकडून सतत मागणी असते. व्याजाच्या उतरलेल्या दराचा फायदा घेऊन ब्रिटिश सरकारनें व हिंदी सरकारनेंहि अलीकडे कोट्यवधि रुपयांचीं कर्जें परत देऊन हलक्या दरानें तितकींच कर्जें पुन्हां उभारलीं आहेत. ह्यामुळें कर्जाच्या रकमेंत फरक पडला नाहीं तरी व्याजाची बचत झाली आहे.

प्राप्तीवरील कर सर्व देशांत कमीजास्त प्रमाणांत असतोच. कर्जरोख्यांवरील व्याज जनतेस देतांना सरकार प्राप्तीवरील कराची आकारणी करून तो कापून घेतें आणि उरलेली रकम कर्जरोखे धारण करणारांस मिळते. प्राप्तीवरील कराच्या कमाल दरानें ही आकारणी होते, आणि कापून घेतलेल्या कराच्या रकमेची पावती रोख्यांच्या मालकांस मिळते. एकूण द्यावयाच्या प्राप्तीवरील कराच्या रकमेंतून ही आगाऊ वसूल झालेली रकम पुढें वजा करण्यांत येते व त्या वेळीं जवळची पावती हजर करावी लागते. ज्या इसमास प्राप्तीवरील कराची आकारणी लागू नाहीं, किंवा ती कमी दरानें आहे, त्यानें अर्ज केला असतां व्याज काढून घेतांना त्याप्रमाणें योग्य तजवीज केली जाते. प्राप्तीवरील कराची माफी नसलेल्या कर्जरोख्यांची ही गोष्ट झाली. कांहीं कर्जरोख्यांवरील व्याजावर ह्या कराची माफी दिलेली असते, म्हणजे व्याजाची रकम रोखेदारांस सबंध मिळते. अर्थात् प्राप्तीवरील कर कोणत्या दरानें आकारावयाचा, हें ठरविण्यासाठी ही व्याजाची

रकम एकूण उत्पन्नांत मिळवावी लागते. परंतु तो दर ठरला, कीं त्याची आकारणी मात्र ह्या व्याजाच्या रकमेवर होत नाहीं. कर माफ असलेल्या व नसलेल्या रोख्यांची आकर्षकता प्राप्तीवरील कराच्या प्रचलित दरांवर पुष्कळशी अवलंबून राहील हें उघड आहे. व्याजाची रकम आपण लिहून देऊं त्या तिजोरींतून आपणांस मिळण्याची तजवीज केली जाते.

## कर्जरोख्यांचे बाजारभाव कसे निश्चित होतात ?

सरकारी कर्जरोख्यांची सुरक्षितता निर्वेध असल्याकारणानें, वेगवेगळया मुदतींच्या व निरानिराळे व्याजाचे दर असलेल्या रोख्यांचा बाजारभाव अशा रीतीनें निश्चित होत असतो कीं, शेवटीं रोखे नवीन घेणारांस द्याव्या लागणाऱ्या रकमेवर सर्वसाधारणपणें एकच व्याज सुटतें. उदाहरणार्थ, ४ टक्के दराच्या रोख्यांची किंमत बाजारांत जर १०० असेल, तर सर्वसाधारणपणें ५ टक्क्यांच्या रोख्यांस १२५ रुपये पडतील व ३ टक्क्यांच्या रोख्यांस ७५ रुपये द्यावे लागतील. म्हणजे कोणतेहि रोखे घेतले तरी, सर्वसाधारणपणें, गुंतवावयाच्या रकमेवर शेकडा ४ असा व्याजाचा दर पडेल. व्याजाचा दर चढेल कीं उतरेल, ह्या संबंधाच्या अंदाजावर कमीजास्त मुदतींच्या रोख्यांचे भावांत फरक पडेल. आज व्याजाचे दर सर्वत्र पडले आहेत. समजा, ६ टक्के दराच्या कांहीं रोख्यांची परतफेड पुढील वर्षी व्हावयाची आहे, व कांहींची परतफेड दहा वर्षांनीं व्हावयाची आहे. जरी दोन्ही रोख्यांवर मिळणारें व्याज एकच दराचें असलें, तरी त्यांच्या बाजारभावांत फरक पडेल. पुढील वर्षी परतफेडींत रोख्यांचे पैसे मिळाले, तरी ते तितक्याच फायदेशीर रीतीनें इतरत्र गुंतविण्यास साधन नसल्यानें लोकांची नजर दहा वर्षांनंतरच्या परतफेडीच्या रोख्यांकडे लागणार; म्हणजे अल्प मुदतीच्या रोख्यांची किंमत उतरणार आणि दीर्घ मुदतीच्या रोख्यांच्या भावास तेजी येणार.

दुसरें एक उदाहरण घेऊं. ६ टक्के व्याजाच्या १०० रुपये दर्शनी किंमतीच्या एका कर्जरोख्याची बाजारांतील किंमत आज १०६ रुपये असली व त्या रोख्याची परतफेड सहा वर्षांनीं होणार असली, तर आजच्या बाजारभावाच्या मानानें पुढें १०० च रुपये हातीं पडणार असल्यानें सहा वर्षांत सहा रुपये नुकसान येणार, हें उघड आहे. रोखे धारण करणारा मनुष्य ही गोष्ट ध्यानांत ठेवूनच व्याजाच्या दराचा हिशेब करीत असतो,

आणि भारी व्याजाच्या रोख्यांची परतफेडीची मुदत जसजशी संपत येईल, त्या त्या मानानें रोख्यांचा भाव उतरत जातो. रोख्यांवरील व्याजाचा दर आणि परतफेडीची मुदत, ह्या दोन्ही गोष्टींचा विचार करूनच परिणामीं पडणारें व्याज ठरवावयाचें असतें. विवक्षित दिवशीं विशिष्ट रोख्यांची किंमत काय असेल हें इतर कारणांवरहि कांहीं अंशीं अवलंबून असतें, आणि मागणी-पुरवठ्याचा नियम येथेंहि लागू पडतो. ह्या विषयाचें जास्त विवेचन पुढें येईलच.

### रोख्यांचा नमुना.

सरकारी रोख्यांवरील व्याज वर्षांतून दोनदां मिळतें. शिलकी व्याजावर पुनः व्याज मिळत नाहीं व व्याज घेतेवेळीं सांठलेलें सर्व व्याज घ्यावें लागतें. म्हणजे, कोणत्याहि सहामाहीचें व्याज शिलकी ठेवून नंतरच्या सहामाहीचें व्याज घेतां येत नाहीं. कर्जरोख्याचा आकार साधारपणें फूलस्केप कागदा-एवढा असतो. त्याच्या दर्शनी बाजूवर रोख्याचें नांव, ( उ० ४ टक्क्यांचें १९६०-१९७० चें कर्ज ) नंबर, किंमत, व्याजाचा दर, परतफेडीची तारीख, प्राप्तीवरील कर माफ आहे कीं नाहीं ह्याची माहिती, इत्यादि मजकूर असतो. त्याचप्रमाणें, हिंदी रोख्यांचे पानाच्या मध्यावर गव्हर्नर जनरल इन कौन्सिल ह्यांची सेक्रेटरी ऑफ स्टेट इन कौन्सिलच्या तर्फे रोख्याची रकम व व्याज ठराविक वेळीं देण्याबाबतची वचनचिठ्ठी असते, आणि सेक्रेटरी टु गव्ह-मेंटतर्फे कन्ट्रोलर ऑफ करन्सीची सही असते. चलनी नोटांचा व्यवहार आतां रिझर्व बँकेच्या ताब्यांत गेल्यामुळें ह्या शेवटीं निर्दिष्ट केलेल्या अधि-काऱ्याचें प्रयोजन उरलें नाहीं. रोख्याचे पाठीवर व्याज मिळण्याच्या तारखा कोष्टकरूपानें दिलेल्या असतात, व व्याज आदा होईल, त्या दिवशीं तिजो-रीच्या अधिकाऱ्याची सही व तारीख तेथें घालण्यांत येते. व्याज मिळाल्या-बद्दल पावतीची जरूरी नसते. रोखा दुसऱ्याचे नांवानें वर्ग करावयाचा असेल, तर ह्या व्यवहाराच्या नोंदीकरितां रिकामी जागा मुद्दाम राखून ठेव-लेली असते. ठराविक फी दिल्यास पहिल्या रोख्याचे बदली दुसरा रोखा मिळूं शकतो.

प्रत्येक राष्ट्राच्या सरकारास वरचेवर कर्ज उभारावें लागतें, परंतु जरूर तेवढी रकम आपल्या देशांत योग्य व्याजानें मिळेलच, याचा भरं-वसा नसतो. ह्या कारणानें, राष्ट्रीय कर्जास आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त

होतें. तरी बलाढ्य राष्ट्रांस इतरांपासून कर्ज काढण्यांत कमीपणा व धोका वाटतो आणि लहान-सहान राष्ट्रांनीं तसें केल्यावांचून भागत नाहीं. लंडन किंवा न्यूयॉर्क ह्यांसारख्या शहरांत भांडवल उभें केलें असतां कित्येक वेळां तें स्वस्त व सोईनें मिळतें. सर्व प्रमुख देशांचे तर्फे कर्ज उभारण्यास व तें मिळवून देण्यास बँका तयार असतात. ठराविक रकमेची त्या हमीहि घेतात, व तेवढी रकम त्यांचेकडे लोकांकडून जमा न झाल्यास, हमीची रकम स्वतः भरतात. ह्या जबाबदारीच्या व्यवहारास 'अंडर रायटिंग' असें म्हणतात. अर्थात् हमी घेतलेल्या रकमेवर बँका योग्य तें कमिशन आकारीत असतात. लंडनसारख्या केंद्रांत वेगवेगळे राष्ट्रीय कर्जरोखे एकत्र येतात, व त्यांचे बाजारभाव प्रत्येक राष्ट्राच्या आर्थिक पतीवर अवलंबून रहातात.

सरकारी रोखे वेगवेगळ्या स्वरूपांत काढण्यांत येतात. 'प्रॉमिसरी नोटा' (परमेश्वरी) बाजारांत विकतां येतात, व त्यांची खरेदीविक्री नेहेमी चालू असते. दुसऱ्यास हा रोखा विकतांना, आपण त्याचें नांव लिहून त्याखाली आपली सही केली म्हणजे झालें. अशा तऱ्हेच्या रोख्यांचेंच वर्णन ह्या प्रकरणांत आम्हीं मुख्यतः केलें आहे. 'स्टॉक'च्या स्वरूपांत आपण धनकोचा हक्क विकत घेतला तर त्याबद्दल आपणांस प्रॉमिसरी नोट न मिळतां फक्त सरकारी सर्टिफिकेट मिळतें, आणि त्या सर्टिफिकेटांत सर्व तपशील असतो. 'बेअरर बॉंड्सच्या' रूपानेंहि कधींकधीं कर्ज उभारलें जातें; बॉंड्स धारण करणाऱ्या इसमास व्याज मिळून त्यांची देवघेव चलनी नोटांप्रमाणें होऊं शकतें. अगदीं अल्प मुदतींचीं कर्जें काढतांनाच 'बेअरर बॉंड्स'च्या स्वरूपाच्या रोख्याचा उपयोग करतात.

### रोखे काढणें व विकत घेणें ह्याविषयींचें धोरण.

सरकारनें कर्ज केव्हां उभारावें, हें ठरविणें जबाबदारीचें व अवघड काम असून, त्यांतलें यश योजकाच्या हुशारीवर व समयज्ञतेवर अवलंबून असतें. बाजारांत पैशाचा पुरवठा कसा काय आहे, व्याजाचे दर चढीचे आहेत कीं बेताचे आहेत, व्यापारी व्यवहारांत किती चलती आहे, बँकांच्या जवळ शिलका किती आहेत, इत्यादि प्रश्नांच्या उत्तरांस अनुसरून कर्ज काढण्याची वेळ, त्याची एकूण रकम, त्याचा प्रकार, रोख्यांची मुदत, व्याजाचा दर, ह्या सर्व गोष्टी ठरवाव्या लागतात. बाजारांत चलनाची तंगी असेल. तर स्वस्त दरानें

कर्ज उभारणें शक्य होत नाहीं. ह्यासाठी योग्य वेळ पाहून कर्ज उभारावयाचें धोरण अंगीकारावें लागतें. त्याचप्रमाणें, कर्ज उभारण्यास योग्य अशी परिस्थिति निर्माण करणें ही गोष्ट चलनाच्या अधिकाऱ्यांचे हातांत असते. बाजारांत ज्यास्त नाणें खेळवून भांडवलाचा मुबलक पुरवठा केला असतां व्याजाचे दर उतरतात व सरकारास अनुकूल अशा रीतीनें कर्जरोख्यांची भरपूर विक्री होते. शेतीच्या मोसमांत पैशाला मागणी मुबलक असते; व ह्यावेळीं कर्ज उभारणें अर्थातच फायद्याचें होत नाहीं. बाजारांत पैसा पुरेसा असून तो गुंतवण्यास वाव नसला आणि तो पडून राहिला म्हणजे कर्ज काढण्यास अनुकूल परिस्थिति निर्माण होते. अशा तऱ्हेनें कर्जांच्या उभारणीची वेळ, व्याजाचे दर, परतफेडीसंबंधीं तपशील इत्यादि गोष्टी ठरवणें हें चातुर्याचें काम आहे. चलन-बाजार व सरकारी कर्जें ह्यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध असून, त्यांचा एकमेकांवर इष्टानिष्ट परिणाम सारखा घडत असतो. कर्जे उभारण्याचें काम ज्याप्रमाणें परिस्थितीस अनुलक्षून धोरणानें व हुषारीनें करावें लागतें, त्याचप्रमाणें कर्जरोख्यांची खरेदी-विक्री करणारांनीं सावधगिरीनें व दूरदृष्टि ठेवून व्यवहार करणें जरूर आहे हें सांगावयास नको. कर्ज काढणारें सरकार व तें देणारी जनता ह्यांचे हितसंबंध सकृद्दर्शनी परस्पर-विरोधी परंतु वस्तुतः एकमेकांस सुसंगत असेच असतात. पैसा गुंतवणारांच्या दृष्टीनें भारी व्याजाचा दर हितावह असला तरी त्यावरून सरकारची पत चांगली नाहीं असें ध्वनित होतें आणि राष्ट्रीय तिजोरींतून व्याजाच्या स्वरूपांत ज्यास्त पैसा द्यावा लागला असतां तो बोजा शेवटीं प्रजेवर म्हणजे अप्रत्यक्ष रीतीनें सरकारास कर्ज देणारांवरच पडतो, हें येथें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे.

हिंदुस्थान सरकारास युद्धें, सरहद्दीवरील लढाया वगैरे अनुत्पादक कामांसाठी कर्जें काढावीं लागलीं आहेत, तशींच सरकारनें रेलवेज, कालवे इत्यादि उत्पादक कार्यांकरितांहि कर्जें काढून पैसा उभा केलेला आहे आणि त्यांपैकीं कित्येक कर्जें इंग्लंडमधलीं आहेत हें वर सांगितलेंच आहे. आज शिल्लक असलेलीं हीं सरकारी मुख्य कर्जें किती रकमांचीं व कोणत्या स्वरूपांचीं आहेत हें दर्शवणारें कोष्टक पुढें दिलें आहे. तथापि सरकारच्या एकूण कर्जाची व देण्याची स्थूल मानानें कल्पना यावी म्हणून आम्हीं अगोदर त्यासंबंधाचे तुलनात्मक आंकडे पुढें देत आहों.

## हिंदुस्थान सरकारचीं निरनिराळया प्रकारचीं कर्जें.

( आंकडे कोटि रुपयांचे आहेत )

| | ३१, मार्च, १९२३ | ३१, मार्च, १९२९ | ३१, मार्च, १९३४ |
|---|---|---|---|
| **ज्यांवर व्याज द्यावें लागतें अशा कर्जाऊ घेतलेल्या रकमा** | | | |
| **हिंदुस्थानांतील कर्जें.** | | | |
| मुख्य कर्जें | ३३९·८३ | ३९०·७३ | ४३५·१७ |
| इतर देणीं ......... | | | |
| ट्रेझरी बिलें (लोकांच्या हातांत) | २१·५९ | ४·०० | ३०·०० |
| ,, ( चलनाच्या निधींत ) | ४९ ६५ | ३९·१५ | १७·७५ |
| पोष्ट ऑफिस सेव्हिंग्ज बँका | २३ २० | ३४·४९ | ५२·५० |
| कॅश सर्टिफिकिटें | ३ १३ | ३२·३० | ६३·४४ |
| प्रॉव्हिडंट फंड इ. | ३६ १७ | ६०·५२ | ८२·१४ |
| प्रांतिक सरकारांच्या शिलका | २·८६ | १०·४३ | ४·४२ |
| एकूण कर्जें व देणीं | ४११·०७ | ४३३·८८ | ४८२·९२ |
| इतर द्यावयाच्या रकमा | ६५·३६ | १६८·८३ | २१७·८६ |
| **एकूण हिंदुस्थानांत कर्ज व देणें** | ४७६ ४३ | ६०२·७१ | ७००·७८ |
| **इंग्लंडमधील कर्ज** | (आंकडे कोटि | पौंडांचे | अ हेत ) |
| मुख्य कर्जें | २२·२ | २८·३ | ३२·० |
| महायुद्ध देणगींतलें कर्ज | १ ९ | १·६ | १·६ |
| रेलवे ॲन्युइटीजबद्दल देणें | ६·१ | ५·३ | ४.५ |
| किरकोळ | ·००४ | ·०४ | ·१ |
| **एकूण इंग्लंडमधील कर्ज** | ३०·३ | ३५·३ | ३८·३ |
| **इंग्लंडमधील कर्जाचे १८ पेन्स** | (आंकडे कोटि | रुपयांचे | आहेत ) |
| **हुंडणावळीच्या दरानें कोटि रुपये** | ४०५·३ | ४७१·७ | ५११ ६ |
| **एकंदर (हिंदुस्थानांत व इंग्लंड-मध्यें मिळून ) कर्ज** | ८८१·७४ | १,०७४·४६ | १,२१२·३८ |
| **सरकारनें गुंतवलेल्या व्याज देणाऱ्या रकमा** | | | |
| **रेलवेजना दिलेलें भांडवल** | ५१७·२२ | ७००·६९ | ७५७·२० |

| | ३१, मार्च, १९२३ | ३१, मार्च, १९२९ | ३१, मार्च, १९३४ |
|---|---|---|---|
| इतर व्यापारी खात्यांस दिलेलें | १९·४३ | २१·८१ | २२·५५ |
| प्रांतिक सरकारांस दिलेलें | ८७·४९ | १३७·५२ | १७६·७२ |
| हिंदी संस्थानांस दिलेलें व इतर | ८·९० | १५·४९ | २१·२० |
| **एकूण व्याज देणाऱ्या गुंतवलेल्या रकमा** | ६३३·०४ | ८७५·५१ | ९७७·६७ |
| रोकड, सोनें-चांदी व तिजोरींतले रोखे. ...... | ४४·८० | २८·३४ | २६.८८ |
| ज्या घेतलेल्या कर्जास येणें कर्जाचें वगैरे तारण नाहीं असें **निवळ कर्ज.** | २०३·९० | १७०·६१· | २०७·८३ |

हिंदुस्थान सरकारास निरनिराळ्या प्रकारांचीं देणीं किती आहेत, हें वरील आंकड्यांवरून स्पष्ट होईल. पैसा इंग्लंडमध्यें खर्चावयाचा असेल व तो हुंड्यांच्या सहाय्यानें तिकडे पाठवणें अवघड असेल तर त्या देशांत कर्ज काढणें सोयीचें असतें. हिंदुस्थानांतील कित्येक व्यक्ति व मंडळ्या, आपणांस निवळ व्याज शेवटीं काय पडेल हें लक्ष्यांत घेऊन, त्या कर्ज-रोख्यांत पैसा गुंतवतात. लंडनमध्यें बेताच्या व्याजाच्या दरानें कर्ज मिळालें व रोख्यांचे भाव उंचीचे राहिले तर तेथील बाजारांत हिंदुस्थानची पत चांगली आहे असें समजण्याची रीत आहे. स्वतः कर्ज काढून तें प्रांतिक सरकारांस व निमसरकारी संस्थांस देण्याची हिंदुस्थान सरकारची कित्येक वर्षांची पद्धति आहे. परंतु ह्या संस्थांची स्वतःची पत बाजारांत अलीकडे बरी असल्यामुळें व त्यांच्या कर्जाचा राष्ट्रीय सरकारास अडथळा न भासल्यामुळें त्या स्वतंत्र रीतीनें लोकांकडून जाहीर कर्जें काढतात.

वरील कोष्टकांत, मुख्य कर्जाच्या हिशेबांत, देणें असलेल्या कर्जाची दर्शनी किंमत नमूद केलेली असते; त्याचप्रमाणें परतफेडीची तारीख उलटून गेली असतांहि लोकांनीं कर्जाच्या रकमा परत नेल्या नसतील, अशा पैशाचा अंतर्भाव त्यांत झालेला असतो. चालू देणीं भागविण्यासाठी सरकार बेळो-

वेळ ट्रेझरी बिलांच्या रूपानें तात्पुरतीं कर्जें उभारीत असतें. जेवढी रकम जरूर असेल, तेवढ्या रकमेची भरती शक्य तितक्या अल्प व्याजाच्या कर्जानें व्हावी, ह्यासाठी व्याजाचे दर व कर्जाची रकम नमूद केलेलीं टेंडरें मागविण्यांत येतात व सर्वांत हलक्या दराचीं जरूर तेवढीं टेंडरें स्वीकारण्यांत येतात. चलनास आधार म्हणून ह्यापैकीं कांहीं बिलें चलनाच्या निधींत ठेविलेलीं असतात. ट्रेझरी बिलांची देवघेव बाजारांत, इतर रोख्यांप्रमाणें अर्थात् होत नाहीं. पोस्टऑफिस सेव्हिंग्ज बँकांचा व्यवहार इतर बँकांप्रमाणेंच असून, सरकारचें व जनतेचें बँक व खातेदार ह्यांच्या नात्याप्रमाणेंच नातें असतें. कॅशसर्टिफिकिटांचा मुख्य हेतु, सरकारास अल्प मुदतीचें तात्पुरतें कर्ज मिळवणें आणि लोकांच्या ठेवी आकर्षून, त्यांस भांडवलाची बचत करण्यास सवलत देणें हा होय. ह्या सर्टिफिकिटांसहि बाजारभाव संभवत नाहीं, कारण तीं धारण करणारांसच फक्त त्यांची रकम मिळूं शकते. मध्यवर्ती सरकारच्या नोकरांचे प्रॉव्हिडंट फंड इत्यादि फंडांच्या रकमा सरकारजवळ शिलकी असतात, व त्या देणें ह्या सदराखालीच येतात; कारण त्यांचा विनियोग निश्चित कारणासाठी करणें सरकारास भाग पडतें, व ती जबाबदारी पैशाच्या स्वरूपांत व्यक्त झालेली असते. कित्येक प्रांतिक सरकारें कांहीं रकमा मध्यवर्ती सरकाराजवळ ठेव म्हणून ठेवतात, व ह्या ठेवींवर व्याज द्यावें लागतें.' फॅमीन इन्शुअरन्स फंड ' ह्या नांवाच्या दुष्काळनिवारण फंडांतील कांहीं रकमेचाहि ह्या आंकड्यांत समावेश होतो. इंग्लंडमधील कर्जांत महायुद्धदेणगींतलें कर्ज म्हणून जो आंकडा आहे, तो हिंदुस्थानानें इंग्लंडास युद्धखर्चास मदत म्हणून दिलेल्या बक्षीस रकमेचा आहे. बक्षीस रकम कर्ज समजण्यांत आलें आहे व त्याची फेड क्रमाक्रमानें होत आली आहे. ' रेलवे ॲन्युइटीज ' ह्या सदराखाली, सरकारनें द्याव्या लागणाऱ्या वर्षासनांची बेरीज करून, हीं वर्षासनें देण्यास किती मुद्दल लागेल, ह्याचा आंकडा दिलेला आहे. सरकारनें गुंतविलेल्या व्याज देणाऱ्या रकमा, रोखे, सोनें–चांदी, तिजोरींतील रोखे, इत्यादींची गणना येणें या सदराखाली होते. देणें व येणें ह्यांमधील जी तफावत, तें हिंदुस्थान सरकारचें निवळ कर्ज होय. ट्रेझरी बिलें किंवा परतफेडीची मुदत ठरविण्यांत आलेले रोखे, ह्यांची परतफेड वेळचे वेळीं होत असते व त्यांस ' फ्लोटिंग डेट ' ऊर्फ ' तरंगतें कर्ज ' असें म्हणतात. ह्याच कर्जाचें कायम व्याज देणाऱ्या व परत न

फेडण्यांत येणाऱ्या रोख्यांत रूपांतर केलें, म्हणजे त्यास 'फंडिंग' केलें असें म्हणतात. 'फ्लोटिंग' व 'फंडेड' डेट हे या दृष्टीनें रोख्यांचे दोन प्रमुख भाग होत.

निमसरकारी म्हणजे पोर्ट ट्रस्ट, म्युनिसिपालट्या इत्यादि संस्थांच्या कर्जरोख्यांचें स्वरूप सरकारी रोख्यांप्रमाणेंच असतें. हें कर्ज बहुधा पाणी-पुरवठा, ड्रेनेज, ट्रामवे इत्यादि उत्पन्नदायक योजनांसाठीं काढलेलें असतें. शहर-सुधराई, रस्तेरुंदी, आरोग्याच्या योजना, ह्यांसारख्या तात्काळ उत्पन्न न देणाऱ्या परंतु परिणामीं लोकहितकारक अशा योजनांसाठींहि कित्येक वेळां कर्ज उभारण्यांत येतें. बिनसरकारी रोख्यांवर व्याजाचा दर थोडा ज्यास्त असतो, हा सरकारी रोख्यांच्या मानानें त्यांसंबंधांत फरक होय. पैसे गुंतविणाऱ्यांच्या दृष्टीनें सरकारी रोख्यांइतकी सुरक्षितता बिन-सरकारी किंवा निम-सरकारी रोख्यांस प्राप्त होणें शक्य नाहीं, हें उघड आहे. म्हणूनच, ज्यास्त दरानें हे रोखे काढावे लागतात व परतफेडीची व्यवस्था नीट झाली आहे कीं नाहीं, हा महत्त्वाचा मुद्दा येथें उपस्थित होतो. सरकारी देखरेखीखालींच हीं कर्जें बहुधा काढण्यांत येतात व ह्या संस्था मगदुराबाहेर कर्जें काढीत नाहींत, अशी सरकार काळजी घेतें. निमसरकारी रोख्यांची सुरक्षितता पुरेशी असून, त्यांवर व्याजाचा दरहि चांगला पडतो. तथापि त्यांत एक अडचण उत्पन्न होण्याचा संभव असतो. इंपीरियल बँकेसारख्या बँका रोख्यांच्या तारणावर कर्जें देण्याचा व्यवहार करीत असतात. पोर्ट ट्रस्ट, कॉर्पोरेशन इत्यादि संस्थांचे रोखे त्या स्वीकारतात, परंतु लहान-सहान म्युनिसिपालट्यांच्या रोख्यांचे तारणावर बँकांकडून कर्ज मिळण्यास लोकांस पंचाइत पडते. ह्या रोख्यांची बाजारांत रोज फारशी उलाढाल होत नाहीं व त्यांचे दैनिक भावहि प्रसिद्ध होत नाहींत. स्टॉक एक्सचेंजमध्यें विवक्षित रोख्यांचेच व्यवहार होत असतात. अर्थातच ज्यांस रोख्यांचे तारणावर रकमा उभ्या करण्याची जरूरी असते, त्यांस लहान-सहान निमसरकारी संस्थांचे रोखे सरकारी रोख्यांइतके उपयोगीं पडत नाहींत.

पुढील पृष्ठांवर दिलेल्या कोष्टकांत प्रमुख हिंदी कर्जरोख्यांचा तपशील दिलेला आहे. त्यावरून वरील विवेचन ध्यानांत घेऊन, रोख्यांचे बाजारभाव, त्यांतील चढउतार, मिळणाऱ्या व्याजाच्या दराचा अंदाज इत्यादि बाबीं-संबंधानें बोध होईल.

हिंदुस्थान सर-

| कर्जाची रकम | व्याजाचा दर | कर्ज कोणत्या सालीं उभारलें | परत फेडीचें वर्ष |
|---|---|---|---|
| **लक्ष रुपये** | | | **( अ ) हिंदुस्थानांत** |
| बिन मुदतीचीं कर्जें | | | |
| ३१६ | ३ | १८९६–९७ | सरकारच्या मर्जीनुरूप केव्हांहि तीन महिन्यांच्या नोटिशीनें |
| २३७२ | ३½ | १८४२–४३ | |
| २१९९ | ३½ | १८५४–५५ | |
| ७ | ३½ | ” | |
| ३७०७ | ३½ | १८६५ | |
| २८४ | ३½ | १८७९दर | |
| ३६३२ | ३½ | १९००–०१ | |
| मुदतीचीं कर्जें | | | |
| १०६७ | ३ | १९३४ | १९४१ |
| ५५९४ | ३¼ | १९३३ | १९४७–५० |
| ६३३० | ४ | १९२६ | १९६०–७० |
| १९९७ | ४ | १९३३ | १९४३ |
| ४०५ | ४½ | १९२८ | १९५५–६० |
| ११४३ | ५ | १९२५ | १९३५ |
| २७७८ | ५ | १९२९ | १९३९–४४ |
| २५१८ | ५ | १९३२ | १९४०–४३ |
| ५६७९ | ५ | १९१९ | १९४५–५५ |
| १९१४ | ५½ | १९३२ | १९३८–४० |
| १६१० | ६½ | १९३१ | १९३५ |
| | | | **( ब ) इंग्लंडमध्यें** |
| **लक्ष पौंड** | | | |
| ११५ | २½ | — | एका वर्षाच्या नोटिशीनें |
| ७७० | ३ | — | |
| ८८७ | ३½ | — | |
| १७५ | ४½ | १९२७ | १९५८–६८ |
| ३९९ | ४½ | १९२२ | १९५०–५५ |
| १२० | ६ | १९३० | १९३५–३७ |

## कारचे कर्जरोखे

| चालू बाजारभाव रुपये | व्याज मिळण्याची तारीख | शेकडा किती व्याज पडतें — रोख्याची मुदत लक्ष्यांत घेऊन | शेकडा किती व्याज पडतें — साध्या हिशेबानें |
|---|---|---|---|
| **उभारलेलें कर्ज** | | | |
| ८३ | फे० २२ व जुलै २२ | | ३·६१४ |
| ९२ १/८ | फे० १ व ऑ० १ | | ३·७५८ |
| ९२ १/८ | जून ३० व डि० ३१ | | ३·७५८ |
| ९२ १/८ | ” | | ३·७५८ |
| ९२ १/८ | मे १ व नो० १ | | ३·७५८ |
| ९२ १/८ | जाने० १६ व जुलै १६ | | ३·७५८ |
| ९२ १/८ | जून ३० व डि० ३१ | | ३·७५८ |
| १०० १/२ | मार्च व सप्टें० | २·८३१ | २·९८५ |
| १०१ १/४ | मे १५ व नोव्हें० १५ | ३·३९३ | ३·४५७ |
| १०५ ५/१६ | मार्च १५ व सप्टें० १५ | ३·६७७ | ३·७९२ |
| १०५ ५/८ | फे० १ व ऑ० १ | ३·२१५ | ३·७९१ |
| ११० ३/४ | मार्च १५ व सप्टें० १५ | ४·०६३ | ४·०६३ |
| १०० ३/४ | ” | ३·४७४ | ४·९६३ |
| १०७ १/२ | जाने० १५ व जुलै १५ | २·९९६ | ४·६५१ |
| १०९ ३/८ | एप्रिल १ व आक्टो० १ | २·९६७ | ४·५७१ |
| ११५ १३/१६ | एप्रिल १५ व ऑ० १५ | ३·२६० | ४·३२० |
| १०८ २/८ | एप्रिल १ ऑ० १ | २·६२३ | ५·०८१ |
| १०१ ३/८ | मार्च १५ व सप्टें० १५ | २·८०० | ६·३८१ |
| **उभारलेलें कर्ज** | | | |
| पौंड | | | |
| ७४ ३/४ | | | ३·३३४ |
| ८७ १/४ | | | ३·४३८ |
| ९५ १/२ | जाने० ५ व एप्रिल ५ | | ३·६६५ |
| ११६ १/२ | —— | ३·४५४ | ३·८९६ |
| ११२ १/२ | मे १५ व नोव्हें० १५ | ३·४२७ | ४·००० |
| १०२ १/२ | एप्रिल ५ व ऑ० १५ | ३·४३५ | ५·८५४ |

| कर्जाची रकम | व्याजाचा दर | कर्ज कोणत्या सालीं उभारलें | परत फेडीचें वर्ष |
|---|---|---|---|
| **लक्ष पौंड** | | | |
| १६९ | ५ १/२ | १९३१ | १९३६–३८ |
| १०० | ५ | १९३२ | १९४२–४७ |
| १२० | ४ | १९३३ | १९४८–५३ |
| १०० | ३ १/२ | १९३३ | १९५४–५९ |

**लक्ष रुपये** **(अ) प्रांतिक सरकारांचीं हिंदु-**

| | | | |
|---|---|---|---|
| २५८ ( संयुक्तप्रांत ) | ५ | १९३२ | ऑ० १,१९४४ |
| ३२९ ( पंजाब ) | ४ | १९३३ | १९४८ |
| ८६ ( पंजाब ) | ५ ३/४ | १९२५ | १९३७ |
| ९३९ ( मुंबई डेव्हलपमेंट ) | ६ १/२ कर्जमाफ | १९२० | नो० १,१९३५ |

**म्हैसूर सरकारनें**

| | | | |
|---|---|---|---|
| १०९ | ६ १/४ क०मा० | १९२० | १९४० |
| २६ | ६ १/२ क०मा० | १९२१ | १९४१–५१ |
| १६३ | ५ क०मा० | १९३० | १९५५ |
| २४६ | ५ १/२ क०मा० | १९३३ | १९३८ |
| २४८ | ४ | १९३३ | १९५३–६३ |

## निमसरकारी

### (अ) हिंदुस्थानांत

मुंबई, कराची, रंगून, मद्रास आणि कलकत्ता येथील पोर्टट्रस्ट्स; रंगून येथील म्युनिसिपालिट्या ह्या सर्वांनीं मोठें भांडवल एकदम लागणाऱ्या वार्षिक उत्पन्न तारण लावलेलें आहे. वरील संस्थांचीं बहुतेक सर्व कर्जें तुलना करतां वैशिष्ट्य असें कांहीं नसून त्यांचे बाजारभाव परतफेडीची निवडक रोख्यांसंबंधीं माहिती खाली दिली आहे:—

| | | | |
|---|---|---|---|
| ३९ ( कलकत्ता पोर्ट ट्रस्ट ) | ४ | १९०७ | १९३७ |
| १४ ( मुंबई पोर्ट ट्रस्ट ) | ३ १/२ | १९३२ | १९६२ |
| २ ( कराची पोर्ट ट्रस्ट ) | ५ ३/४ | १९३३ | १९५५ |
| २५ ( मुंबई इंप्रूव्हमेंट ट्रस्ट ) | ४ | १९१६ | १९७६ |
| ४ ( मुंबई म्युनिसिपा० ) | ४ | १९१३–१५ | १९५५ |
| ४० ( मुंबई म्युनिसिपा० ) | ६ | १९३० | १९५०–६० |

| चालूबाजारभाव रुपये | व्याज मिळण्याची तारीख | शेंकडा किती व्याज पडतें रोख्याची मुदत लक्ष्यांत घेऊन | साध्या हिशेबानें |
|---|---|---|---|
| १०५½ | जाने० १५ व जुलै १५ | २·६५८ | ५·२१३ |
| १०६½ | जून १५ व डिसें० १५ | २·३३३ | ४·२९२ |
| १०८½ | ” | ३·१९६ | ३·६८७ |
| १०५½ | ” | ३·११४ | ३·३१८ |
| **स्थानांत उभारलेलीं कर्जें** | | | |
| ११० | एप्रिल १ व ऑक्टो० १ | ३·६८४ | ४·५४५ |
| १०४ | सप्टें० १ व मार्च १ | ३·५३४ | ३·८२८ |
| १०५½ | ऑक्टो० १६ व एप्रिल १६ | २·८९४ | ५·४५ |
| १०१½ | मे १ व नोव्हें० १ | ३·४४८ | ६·४०४ |
| **उभारलेलीं कर्जें** | | | |
| ११८½ | एप्रिल १ व ऑक्टो० १ | ३·१२४ | ५·२७४ |
| १२०½ | नोव्हें० १ व मे १ | ३·०८१ | ५·३९४ |
| ११७½ | ” | ३·७४८ | ४·२५५ |
| १०९½ | ” | २·२१० | ५·०२३ |
| १०८½ | जून १ व डिसें० १ | ३·३६६ | ३·६८७ |

## संस्थांचीं कर्जें.

### उभारलेलीं

मुंबई आणि कलकत्ता येथील इंप्रूव्हमेंट ट्रस्ट्स; मुंबई, कलकत्ता, मद्रास व निरनिराळया कामांसाठीं कर्जें काढलेलीं आहेत व त्यांस ह्या संस्थांचें हिंदुस्थानांतच उभारलेलीं आहेत. त्यांच्या कर्जरोख्यांत सरकारी रोख्यांशा मुदत व व्याजाचा दर ह्यांस अनुसरूनच निश्चित होतात. त्यांपैकीं कांहीं

| चालूबाजारभाव रुपये | व्याज मिळण्याची तारीख | शेंकडा किती व्याज पडतें रोख्याची मुदत लक्ष्यांत घेऊन | साध्या हिशेबानें |
|---|---|---|---|
| १०१¼ | ऑक्टो० १ व फे० १ | ३·३४९ | ३·९५१ |
| ९९ | मार्च १ व सप्टें० १ | ३·५५८ | ३·५३५ |
| बा·भा.नाहीं | मार्च ३१ व सप्टें० ३० | — | — |
| १०२ | जाने० व जुलै | ३·९०२ | ३·९२२ |
| १०२ | मे व नोव्हें० | ३·८५६ | ३·९२२ |
| १२२ | जून व डिसें० | ४·०३१ | ४·९१८ |

आतांपर्यंत दिलेल्या माहितीवरून, वृत्तपत्रांमध्यें कर्जरोख्यांचे जे बाजारभाव प्रसिद्ध होतात, त्यांचें पूर्ण आकलन करतां येईल, व त्यांत होणाऱ्या चढउतारांचें मर्महि ध्यानांत येईल. दैनिकांत आढळणाऱ्या व्यापारी बातम्यांपैकीं कर्जरोख्यांच्या बाजाराविषयींची, एका दिवसाची नमुनेवजां हकीकत खाली दिली आहे. ३॥ टक्के दराच्या रोख्यांवरून पैशाच्या बाजाराची नाडी समजते. बँका, विमा कंपन्या, शैक्षणिक संस्था, ट्रस्टी वगैरे हेच रोखे बहुतेक पसंत करतात, व त्यांमध्यें सट्टेबाजीहि पुष्कळ चालते. विम्याचे कामास सुरवात करण्यापूर्वी विमाकंपन्यांस सरकारजवळ २५,००० रुपयांचे रोखे अनामत ठेवावे लागतात, व ३॥ टक्क्यांच्या प्रकाराचे व दर्जाचे दुसरे रोखे उपलब्ध नसल्यामुळें, ह्या रोख्यांस विशेष मागणी असते. त्यामानानें ह्या प्रकारच्या रोख्यांचा बाजारांतील पुरवठा मर्यादित आहे, व शिवाय, बिनमुदतीचे हे एवढेच रोखे आहेत. ३॥ टक्क्यांच्या रोख्यांचे भावांप्रमाणें इतर रोख्यांचे बाजारभाव चढत किंवा उतरत असल्यानें त्यांस एक तऱ्हेचें प्रातिनिधिक स्वरूपच प्राप्त झालें आहे. कर माफ नसलेले ३॥ टक्क्यांचे रोखे, १९६०–७० चे ४ टक्क्यांचे रोखे व १९४५–५५ चे ५ टक्क्यांचे रोखे, ह्यांचीच फक्त वायद्यानें खरेदी–विक्री होऊं शकते; बाकीच्या रोख्यांची देवघेव रोखीनें होते. ह्यामुळें, ह्या तीन रोख्यांस कर्जरोख्यांच्या बाजारांत सट्ट्यांचे दृष्टीनें विशेष महत्त्व आहे.

## बाजारभावांच्या बातमीचा नमुना

### मुंबईचा कर्जरोख्यांचा बाजार

कर्ज-रोख्यांच्या बाजारांत विशेष चलबिचल झाली नाहीं. साडेतीन टक्क्यांचा भाव सुरवातीस ९३–८ होता, तो ९४–१ ला चढून शेवटीं तो ९३–१४ झाला. चार टक्के ( १९६०–७० ) रोख्यांस १०९–३ भाव आला आणि कर्ज-माफ लोनची ( १९४५–५५ ) ११६–२च्या दरानें देवघेव झाली. आज दोन वाजतांच बाजार बंद झाल्यामुळें, पांच वाजतांचे आंकडे जाहीर होणार नाहींत.

[ पूर्वींच्या दिवसाचे भाव कंसांत दर्शविले आहेत. वायद्याचे भाव व्यवहार संपण्याच्या वेळचे आहेत. ]

## सरकारी रोखें

६½% डेव्हलपमेंट लोन ( १०१ १/४ ) १०१ ३/४
५½% ट्रेझरी बाँड ( १९३५ ) ( १०१ १/४ ) १०१ ९–१६
५½% ( १९३८–४० ( १०७–८ ) १०८
५% कर–माफ लोन ( १९४५–५५ ) ( ११६–२ ) ११६–२
५% लोन ( १९३९–४४ ) ( १०७–४ ) १०७–१४
५% लोन ( १९४०–४३ ) ( १०८–२ ) १०९–४
५% करमाफ नसलेलें लोन ( १९३५ ) ( १००–४ ) १००–९
४½% दीर्घ मुदतीचें ( १९५५–६० ) ( ११० ) १११–४
४% १९६०–७० ( १९६०–७० ) ( १०६–१ ) १०६–३
३½% गव्हर्मेंट पेपर ( ९३–७–६ ) ९३–१४
३½% लोन ( १९४७–५० ) ( १०१ ) १०१ १/२
४% १९४३ ( १०४–४ ) १०५–६
३% लोन ( १९४१ ) ( १००–८ ) १००–८
४% पोर्ट ट्रस्ट ( गॅरंटी नसलेलें ) दीर्घ मुदतीचे (१०० ३/४) १०२
४% म्युनिसिपल ( दीर्घ मुदतीचे ) ( १०१ ) १०१ १/४
४% सिटी इंप्रूव्हमेंट ट्रस्ट बाँड्स ७० वर्षें ( १०१ ) १०१ १/४
४% सिटी इंप्रूव्हमेंट ट्रस्ट बेअरर बाँड्स (१०१ ) १०१ १/४
४% म्हैसूर लोन ( १९५३–६३ ) ( १०३–८ ) १०५–८
५% म्युनिसिपल ( १९५९ ) ( १११ ) ११२–८
५% म्हैसूर लोन ( १९५५ ) ( ११५ ) ( ११६ )
५½% म्हैसूर लोन ( १९३८ ) ( १०६ ) १०७
६% म्युनिसिपल लोन ( १९५४ ) ( १२२ ) १२३
६% कराची पोर्ट ट्रस्ट ( १२२ ) १२३

## लंडनमधील हिंदी कर्जें

हिंदुस्थानाचीं परराष्ट्रीय देणीं भागविण्यासाठीं येथील सरकार वेळोवेळ लंडनमध्यें कर्ज उभारीत असतें, ह्याची माहिती वर आलीच आहे. हिंदुस्थानाच्या तिजोरींतून सेवानिवृत्त युरोपियन नोकरांस द्यावयाचीं पेन्शनें, व सरकारनें खरेदी केलेल्या मालाबद्दल चुकते करावयाचे पैसे, ह्यासाठींहि

लंडनमध्यें पैशाची जरुरी भासते. पूर्वीं उभारलेल्या कर्जाची पूर्णतः किंवा अंशतः परतफेड करावयाची असल्यासहि पुनः कर्ज काढावें लागतें. कित्येक वेळां, हिंदुस्थानांत कर्जाची उभारणी करण्यापेक्षां लंडनमध्यें ती करणें सोईचें व स्वस्त पडतें, व बाहेरच्या जगांत हिंदी राष्ट्राची पत चांगली आहे ह्याबद्दलचा सरकारला दाखला उपलब्ध होतो. येथील कित्येक धंदेवाले आणि गबर लोक हिंदुस्थानातर्फे लंडनमध्यें काढलेल्या रोख्यांत पैसे गुंतवीत असतात. हुंडणावळ व व्याजाचे दर ह्यांचा, कमाईच्या दृष्टीनें विचार करूनच, ते हा व्यवहार करतात. लंडनमध्यें उभारलेल्या 'स्टर्लिंग' लोनचे व हिंदुस्थानांत उभारलेल्या ' रुपी ' लोनचे बाजारभाव कित्येक वेळां बरोबर चढतात व उतरतात; त्यांचा एकमेकांवर परिणाम होत असलेला नजरेस पडतो. भांडवल आणि पैसा ह्यांस राष्ट्रांच्या सरहद्दी अडवूं शकत नाहींत, असें म्हणतात, त्याचें हें एक उदाहरण आहे. शिवाय इंग्लंड व हिंदुस्थान ह्यांचे विशिष्ट रीतीचे निकट संबंध आहेत, त्यांचाहि परिणाम सदरहु रोख्यांच्या भावांवर होत असतो. ह्या दृष्टीनेंहि ' स्टर्लिंग ' सिक्युरिटीजचें महत्त्व आहे. खाली दिलेल्या कोष्टकांत हिंदुस्थानातर्फे इंग्लंडमध्यें उभारलेल्या व तेथें खरेदी-विक्री केल्या जाणाऱ्या रोख्यांचे १६ मे, १९३५ चे बाजारभाव दिले आहेत. 'एक्स–डिव्हिडंड' ह्याचा अर्थ भागांसंबंधीं माहिती दिली आहे, त्याठिकाणीं समजावून सांगण्यांत येईल.

३% इंडियन स्टॉक ( £ ८८१/२ ) £ ८८१/२
३% इंडियन स्टॉक ( £ ९८ ) £ ९८१/२
४½% इंडियन स्टॉक ( १९५०–५५ ) ( £ ११३१/२ ) £ ११३१/२
४½% इंडियन ( १९५८–६८ ) ( £ ११६१/२ ) £ ११६१/२
४% न्यू इंडिया ( १९४८–५२ ) ( £ १०९१/२ ) £ १०८ एक्स डि०
३½% न्यू इंडिया (१९५४–५९) (£ १०६) £ १०५ एक्स डि०
५% इंडियन (१९४२–४७) ( £ ११७½ ) £ ११७½

ह्या प्रकरणांत सरकारी कर्जरोख्यांविषयींची जरूर तेवढी माहिती देण्यांत आली आहे. असल्या रोख्यांत पैसा गुंतविणें अत्यंत सुरक्षितपणाचें व सोयीचें असतें, हें वर सांगितलेंच आहे. सर्वसाधारण लोकांस हे रोखे अत्यंत विश्वासार्ह व आकर्षक वाटतात, आणि जनतेच्या समजुतींत त्यांस सोन्याइतकें महत्त्वाचें स्थान प्राप्त होतें. म्हणूनच, ह्या रोख्यांस ' गिल्ट

एज्ड' सिक्युरिटीज किंवा ' सुवर्ण किनारीचे ' रोखे असें नांव पडलें आहे. ग्रेट ब्रिटनमधील' ' फंडेड ' कर्जांस 'कन्सॉल्स' असें म्हणतात, ह्याचें कारण, १७५२ मध्यें, हेन्री पेल्हॅम ह्यानें ब्रिटनचीं वेगवेगळीं कर्जें एकत्रित ( कन्सॉलिडेटेड) करून त्यांचें ३ टक्क्यांत रूपांतर केलें, म्हणजेच 'फंडिंग' केलें, हें होय. 'कन्सॉलिडेट ' ह्या शब्दावरून ' कन्सॉल्स ' हा शब्द प्रचलित झाला आहे. या सर्व तऱ्हेच्या रोख्यांचा विशेष हा, कीं त्यांवरील व्याज मिळेल, ह्याची खात्री बाळगतां येते व त्यांची खरेदी-विक्री वाटेल तेव्हां करितां येते. कंपन्यांचे प्रेफरन्स भाग व डिबेंचर्स ह्यांचाहि असा दर्जा असतो. त्यांचें वर्णन पुढील प्रकरणांत येईलच.

# प्रकरण तिसरें.

## संयुक्त भांडवलाच्या मंडळ्यांचे भाग

### कर्जरोखे आणि भाग

सरकारी व निम-सरकारी रोख्यांची सुरक्षितता निर्वेध असते व त्यांवर ठराविक व्याज मिळत रहातें. रोख्यांच्या बाजारभावांत चढ-उतार झाला तरी व्याजाचा दर व व्याजाच्या स्वरूपांत रोखे धारण करणारांस मिळणारी रकम हीं ठराविक आणि कायम असतात. ह्या कारणानें, पैसे गुंतविण्याचा हा अत्यंत सोपा व सोईचा असा मार्ग ठरतो. संयुक्त भांडवलाच्या मंडळ्यांच्या भागांची गोष्ट ह्याहून निराळी असते. हे भाग धारण करणारांस भांडवलावर निवळ व्याज मिळत नसून कंपन्यांच्या नफ्यांत ते अंशोपभोगी असतात. कंपन्यांची सांपत्तिक स्थिति निश्चित नसल्यामुळें त्यांस नफा होईल किंवा नाहीं व झाल्यास त्याची वांटणी कोणत्या दरानें होईल हें खात्रीनें सांगतां येत नाहीं. सरकारी कर्जाचा विनियोग कसाहि करण्यांत आला, तरी रोखेदारांस नक्की व्याज मिळण्यासंबंधानें शंकाहि घेण्यास जागा नसते. भागांत गुंतविलेल्या भांडवलाची गोष्ट अगदी वेगळी आहे. मंडळीस नफा झाला, तरच त्याची वांटणी होणार, नफा अल्प झाला तर डिव्हिडंड अल्प मिळणार व पुष्कळ फायदा उरला तर भागीदारांसहि त्यांत वाटणी मिळणार, अशी परिस्थिति असते. मंडळीचे सर्व खर्च वजा जातां जर वाढावा उरला, तरच त्यांत भागीदारांस हिस्सा मिळतो. ह्या कारणानें भागांत भांडवल गुंतविणारांची, नफा मुबलक मिळावा अशी इच्छा असली, तरी तो अल्प मिळेल किंवा अजिबातच मिळणार नाहीं, ह्या शक्यतेचीहि त्यांस जाणीव हवी. मंडळ्यांस नफा किती उरेल, ह्याचा अंदाज त्यांच्या व्यवहारांवरून लोक करीत असतात व ह्या अंदाजांचा परिणाम मंडळ्यांच्या भागांचे बाजारभाव सारखे वर-खाली जाण्यांत होत असतो.

### रोखे धारण करणारा धनको, पण भागीदार मालक

मोठ्या प्रमाणावर जोखीम स्वीकारून स्वतंत्रपणें धंदा करणें व्यक्तींस शक्य होत नाहीं. हल्लीच्या यांत्रिक युगांत उत्पादनाचें क्षेत्र जसजसें वाढत

गेलें आहे, तसतशी कारखान्यांच्या, गिरण्यांच्या व व्यापारी संस्थांच्या कार्यांची मर्यादा वाढत गेली आहे. मोठ्या प्रमाणावर मालाचें उत्पादन करण्यास भांडवल पुष्कळ लागतें आणि तें उभें करणें एकट्या-दुकट्या व्यक्तीच्या आवांक्याबाहेरचें असतें. अनेक लोकांच्या लहान–लहान रकमा एकत्र करून, जमलेल्या भांडवलाच्या सहाय्यानें उद्योगधंदा चालविला, तरच तो यशस्वी होणें आतां शक्य आहे. ह्या कारणानें संयुक्त भांडवलाच्या मंडळ्यांची प्रगति जोरानें होत आहे. भागीदारांस, त्यांच्या भांडवलाच्या प्रमाणांत हिस्सा देऊन त्यांस मंडळीच्या मालकी हक्कांत वांटेकरी करतां येतें, आणि सर्व भागीदारांनीं निवडलेल्या व्यवस्थापक मंडळाच्या हुकमतीखाली धंद्याच्या व्यवहारांची व्यवस्था चालते. व्यक्तींचे उद्योग आणि व्यवसाय, त्यांचे हयातीनंतर चालू रहाण्याची खात्री नसते; समाइक भांडवलाच्या मंडळ्या वर्षानुवर्ष सारख्या चालण्यास अडचण नसते. तसेंच, मंडळ्यांचीं कर्जें वगैरे देण्यास भागीदार जातीनें बांधलेले नसून फक्त त्यांच्या भागांच्या रकमेइतकीच जोखीमदारी त्यांच्या शिरावर असते. मंडळी ही सर्व भागीदारांची प्रतिनिधिरूप संस्था असते, व तिला भागीदारांहून स्वतंत्र असें कायदेशीर अस्तित्त्व प्राप्त होतें. ह्यामुळें, भागीदार व कंपनी यांचेमध्यें करार-मदार होऊं शकतात.

एखाद्या इसमानें १० लक्ष रुपये भांडवल विक्रीस काढलेल्या मंडळीचा दहा रुपयांचा एक भाग विकत घेतला, तर त्या व्यक्तीस मंडळीच्या जिंदगीचे एक लक्षांश हिश्शावर मालकी हक्क सांगतां येतो व उत्पन्नाच्या विभागणींतही त्या मानानें अंश मिळतो. यदाकदाचित् मंडळी बुडाली तर त्या व्यक्तीस ह्या हिश्शानें वांटून येईल इतका जिंदगीचा भाग हटकून मिळेल. प्रत्येक भागास अशा तऱ्हेचा जिंदगीच्या व नफ्याच्या वांटणीचा हक्क आहे हें गृहीतच धरलेलें असतें आणि बाजारांत पर्यायानें ह्या हक्काचीच खरेदी-विक्री होत असते. एखाद्या मंडळीची सांपत्तिक स्थिति चांगली असून तिला नफा भरपूर मिळेल अशी लोकांची कल्पना झाली असतां तिच्या भागांवर चांगलें डिव्हिडंड मिळेल, ह्या अक्षेपेमुळें त्यांस मागणी उत्पन्न होते व सहाजिकच त्यांचा बाजारभाव चढतो. ह्या उलट, मंडळीची परिस्थिति विशेष समाधानकारक नाहीं अशी कल्पना लोकांत पसरली कीं, भागीदारांमध्यें चुळबुळ सुरू होऊन, भाग विकून टाकणारांची संख्या

वाढते व त्यांचा भाव पडतो. भागांवर फायदा काय पडेल, ह्यासंबंधाच्या अंदाजावर जेथें बाजारभावांत चढ-उतार होत असतो, तेथें खरोखरच डिव्हिडंड जाहीर झाल्यावर भागांची किंमत कमी–ज्यास्त होईल, ह्यांत काय नवल ?

## भागांचे प्रकार

मंडळ्यांचे भाग हे सर्व एकाच रकमेचे किंवा सर्व भागीदारांचे त्यांतले मालकी हक्क एकाच दर्जाचे असले पाहिजेत, असें नाहीं. प्रत्येक मंडळीचा प्रयत्न शक्य तितकें भांडवल सोइस्कर मार्गानें मिळविणें हा असतो. वेगवेगळ्या प्रवृत्तींच्या लोकांस आकर्षक वाटावे ह्या हेतूनें भागांचेहि वेगवेगळे प्रकार करण्यांत येतात व त्यामुळें भांडवल जमविणें व तें कायम राखणें सोपें जातें. भागांचे तीन प्रकार आहेतः १ प्रेफरन्स भाग, २ ऑर्डिनरी भाग व ३ डिफर्ड भाग. ह्या प्रत्येकाचा स्वतंत्र रीतीनें विचार करूं. सरकारी कर्जरोख्यांवर मिळणाऱ्या हलक्या व्याजाच्या दरानें ज्यांचें समाधान होत नाहीं, परंतु आपल्या पैशाच्या सुरक्षिततेसंबंधानें ज्यांचा विशेष कटाक्ष असतो अशा लोकांस अत्यंत सोइस्कर भाग म्हणजे 'प्रेफरन्स' भाग होय. इतर भागीदारांस नफा वांटण्यापूर्वी प्रेफरन्स भागीदारांचा हिस्सा त्यांस द्यावा लागतो. ही वांटणी होऊन कांहीं रकम उरली, तरच सामान्य म्हणजे 'ऑर्डिनरी' भागांच्या वांट्यास नफा येऊं शकतो. 'साहस नाहीं तेथें फायदा नाहीं,' ह्या विचारानें कित्येक लोकांस 'ऑर्डिनरी' भागच पसंत पडतो. एखाद्या वर्षी कमी नफा झाला तरी दुसऱ्या वर्षी तो पुष्कळ अधिक होऊन सरासरीनें आपणांस चांगल्या दरानें डिव्हिडंड पडेल अशी त्यांची अपेक्षा असते. दुसऱ्या लोकांस, कमी मिळकतीचा किंवा नुकसानीचा धोका नको असतो, आणि निश्चित दरानें आपल्या पैशावर व्याज पडावें अशी त्यांची इच्छा असते. अशा स्वभावाच्या मंडळीस 'प्रेफरन्स' भाग सोयीचे वाटतात.

## 'प्रेफरन्स' भाग

ह्या भागांवरचा ठरलेल्या दरानें वांटलेला नफा वजा जातां उरलेल्या रकमेंतून 'ऑर्डिनरी' भाग धारण करणारांस हिस्सा मिळतो. प्रेफरन्स भागांमध्येंहि दोन प्रकार आहेत. (१) क्युम्युलेटिव्ह प्रेफरन्स व (२) नॉन्-क्युम्युलेटिव्ह प्रेफरन्स, हे ते होत. प्रत्येक वर्षी मंडळीस प्रेफरन्स भागीदारांसहि ठराविक नफा वांटता येईलच, अशी खात्री नसते. एखाद्या वर्षी पुरेसा नफा झाला नाहीं तर प्रेफरन्स भागीदारांस

ठराविक डिव्हिडंड देतां येणार नाहीं. ही तूट, पुनः जेव्हां मंडळीस भरपूर नफा होईल, तेव्हां अगोदर भरून काढली पाहिजे, व नंतरच इतर भागीदारांचा विचार व्हावा, अशी अट ज्या प्रेफरन्स भागांसंबंधीं घातलेली असते, ते 'क्युम्युलेटिव्ह' प्रेफरन्स भाग होत. त्यांचा नफा आज वांटला नाहीं तरी त्यावरील भागीदारांचा हक्क नाहींसा न होतां, पुनः वेळ येईल, तेव्हां तो सर्व भरून काढला जातो. समजा, चालू सालीं विवक्षित मंडळीस प्रेफरन्स भागांवर नफा वांटता येण्याजोगी परिस्थिति नाहीं, परंतु ६ टक्के व्याजाची तर हमी घेतलेली आहे. क्युम्युलेटिव्ह प्रेफरन्स भागांचे मालक ह्यामुळें भिऊन जाणार नाहींत. आज जरी ६ टक्के डिव्हिडंड मिळालें नाहीं, तरी ही तूट पुढच्या वर्षीं भरून येईल, असा त्यांस भरंवसा असतो; निदान ह्या डिव्हिडंडवरील त्यांचा हक्क नाहींसा होत नाहीं. नॉन-क्युम्युलेटिव्ह प्रेफरन्स भाग धारण करणारांच्या डिव्हिडंड संबंधाच्या हक्कास प्रत्येक वर्षापुरतेंच प्राधान्य मिळतें; नफा झाला नाहीं तर त्याबद्दलचा हक्क पुढील वर्षीं शिल्लक रहात नाहीं. सुरक्षिततेच्या दृष्टीनें मंडळयांच्या भागांत क्युम्युलेटिव्ह प्रेफरन्स भागांचा पहिला नंबर लागतो. ह्या दोन्ही प्रकारांचे भाग धारण करणारांस फक्त डिव्हिडंडच्या वांटणीपुरतें प्राधान्य मिळतें; मंडळीचें काम बंद पडल्यास जिंदगीच्या विभागणींत त्यांचा व ऑर्डिनरी भागवाल्यांचा हिस्सा ह्यांमध्यें कोणत्याहि तऱ्हेनें भेद केला जात नाहीं. डिबेंचर्स धारण करणारांचे हक्क निराळे आणि वरच्या दर्जाचे म्हणजे धनकोचे असतात हें दुसरीकडे सांगितलेंच आहे.

## ऑर्डिनरी व डिफर्ड भाग

सुरक्षिततेबरोबरच डिव्हिडंड चांगलें मिळण्याची खात्री ज्यांस हवी आहे अशा लोकांस प्रेफरन्स भाग फारच सोईचे होत. तथापि मनुष्यप्राण्याचें मन कांहीं झालें तरी थोडें-फार जुगारी प्रवृत्तीचें असतें, व कित्येकांस ठराविक, अल्प डिव्हिडंडवर संतुष्ट होऊन राहाणें आवडत नाहीं. एखादे वेळीं मुळीच डिव्हिडंड मिळालें नाहीं तरी हरकत नाहीं, त्याची भरपाई इतर वर्षीं सपाटून डिव्हिडंड मिळून होणार नाहीं कशावरून? ह्या विचारानें पुष्कळांना ऑर्डिनरी भागच ज्यास्त पसंत पडतात, ही गोष्ट वर नमूद केलीच आहे. मंडळीच्या आर्थिक हेलकाव्यांप्रमाणें डिव्हिडंडचा दरहि कमी-ज्यास्त होणार हें उघड आहे. प्रेफरन्स भागीदारांस

५

त्यांच्या भागांवर ठराविक दरानें डिव्हिडंड मिळून नफ्यापैकीं जी रकम उरेल, तिच्यांमधून ऑर्डिनरी भागीदारांत वांटणी व्हावयाची असते. कोणत्या दरानें प्रेफरन्स भागांवर डिव्हिडंड मिळणार, हें मुळांतच नियमांनीं ठरविलेलें असतें, परंतु ऑर्डिनरी भागांवर डिव्हिडंड वांटावयाचें किंवा नाहीं, व वांटण्याचें ठरल्यास तें कोणत्या दरानें वांटावयाचें, हें व्यवस्थापक मंडळ ठरवितें व वार्षिक सर्वसाधारण सभेंत त्यास भागीदारांची मान्यता घेण्यांत येते. ऑर्डिनरी भागांतहि कोणत्या अनुक्रमानें डिव्हिडंड वांटावयाचें हें कित्येक वेळां ठरविलेलें असतें व त्या अनुक्रमानुसार भागांचे 'प्रिफर्ड' व 'डिफर्ड' असे दोन प्रकार होतात. प्रेफरन्स व ऑर्डिनरी अशा दोन तऱ्हेचेच भाग जेव्हां एखाद्या मंडळीनें काढलेले असतात, तेव्हां कित्येक वेळां प्रेफरन्स भागीदारांस विशेष हक्क दिलेले असतात. ऑर्डिनरी भागांवर एका ठराविक कमाल दरानें डिव्हिडंड जाहीर होऊन उरेल तो नफा पुनः प्रेफरन्स भागीदारांत वांटण्यांत यावा अशी ही योजना असते.

सर्व तऱ्हेच्या प्रेफरन्स आणि ऑर्डिनरी भागांवर डिव्हिडंड वांटूनहि नफा उरला, तर तो 'डिफर्ड' भाग धारण करणारांस मिळतो. डिफर्ड भाग हे साधारणतः मंडळयांच्या उत्पादकांस त्यांच्या मेहेनतीबद्दल मोबदल्यादाखल दिलेले असतात; त्यांची संख्या व रकम बहुशः मोठी नसते. हे भाग केवळ मामुली स्वरूपाचे असतात, असें सकृत्दर्शनी वाटतें, परंतु नफ्याचा हिस्सा मिळण्याच्या दृष्टीनें त्यांचें महत्त्व फार आहे. समजा, एका मंडळीचें ऑर्डिनरी भागांचें १० लक्ष रुपये भांडवल १ लक्ष भागांत विभागलेलें आहे व त्यांपैकीं ५ लक्ष रुपये भरणा झालेले आहेत आणि त्याचप्रमाणें, १० हजार रुपये किंमतीचे १ हजार भाग डिफर्ड आहेत. मंडळीस १ लक्ष रुपये नफा झाला, अशी कल्पना केल्यास, आणि प्रॉस्पेक्टसप्रमाणें ६ टक्के डिव्हिडंड ऑर्डिनरी भागीदारांस वांटल्यावर उरलेला नफा ऑर्डिनरी व डिफर्ड भागांत निमेनिम वांटावयाचा, अशी योजना आहे असें गृहीत धरल्यास, डिफर्ड भागीदारांचे वांटणीस नफ्याचा केवढा तरी मोठा हिस्सा उरतो! ऑर्डिनरी भागांवर ३०,००० रुपये दिल्यानंतर ७०,००० रुपये उरतात; त्यांपैकीं ३५,००० रुपये, १०,००० रुपयांच्या डिफर्ड भागांवर वांटले, म्हणजे डिव्हिडंडचा दर ३५० टक्के इतका पडतो! ह्या खेरीज, हे भाग धारण

करणारांस जी सत्ता प्राप्त होते, त्याची जाणीवहि सहजासहजी इतरांस होत नाहीं.

## डिबेंचर्स

प्रेफरन्स, ऑर्डिनरी व डिफर्ड हे मंडळयांच्या भागांचे तीन प्रमुख प्रकार होत. तथापि, ह्या मार्गांनीं मंडळयांस जरूर तेवढें भांडवल उभारतां येतेंच असें नाहीं. जादा भांडवलाची जरूरी लागली तर तें 'डिबेंचर्स' ह्या रूपानें उभारण्यांत येतें. म्हणजे डिबेंचर्स विकत घेणारे लोक मंडळीचे सावकार बनतात, व भागीदारांस नफा मिळण्याच्या अगोदर त्यांचें व्याज मिळेल, अशी हमी त्यांस देण्यांत आलेली असते. ह्यामुळें, भागांपेक्षां डिबेंचर्सची सुरक्षितता ज्यास्त असते, हें खरें असलें, तरी डिबेंचर्सना लावून दिलेलें तारण पुरेसें व योग्य आहे कीं नाहीं, ह्यावरच त्या रोख्यांची अंतिम सुरक्षितता अवलंबून रहाते. इतर रोख्यांप्रमाणेंच डिबेंचर बॉंड काढण्यांत येतात, त्यांची परतफेडीची मुदत व पद्धत ठरविलेली असते आणि बाजारांत त्यांची सररहा खरेदी-विक्री होते.

## भागांच्या पैशाची वसुली

मंडळयांचें भांडवल भागांचे रूपानें जमा करण्यांत येतें, परंतु प्रत्येक भागाबद्दल पूर्ण रकम नेहमींच वसूल करण्यांत येते, असें नाहीं. १०० रुपयांच्या भागाचे सर्वच १०० रुपये भागीदारांकडून घेण्यांत येतील किंवा त्याचा ठराविक हिस्सा आज स्वीकारला जाऊन बाकीचा भाग, जरूरीप्रमाणें घ्यावयाच्या शर्तीवर, तसाच राखून ठेवण्यांत येईल. सामान्यतः भाग विक्रीस काढले, म्हणजे भाग विकत घेणाऱ्या इसमानें अर्जाबरोबर कांहीं, भाग त्यास दिला (अलॉटमेंट) म्हणजे कांहीं, व पुढें मागणी (कॉल) केली जाईल तेव्हां कांहीं, अशा हप्त्यांनीं रकम भरावयाची असते, व हे हप्ते प्रत्येक मंडळी आपल्या सोईप्रमाणें ठरविते. समजा, एखाद्या मंडळीचें अधिकृत भांडवल १० लक्ष रुपये आहे. इतकें भांडवल आजच्या व्यवहारांस जरूर नसेल, तर मंडळी त्यापैकीं फक्त कांहीं हिस्सा, उदाहरणार्थ, ५ लक्ष रुपयांचे भाग, विक्रीस काढील. मंडळीनें ५ लाखांचे भाग विक्रीस काढले, तर ते सर्वच खपतील असें नाहीं; त्यांपैकीं कांहीं भागच विकले जातील. ३ लक्ष रुपयांचे भाग लोकांनीं घेतले आहेत, अशी आपण कल्पना करूं. भागांबद्दलची सर्व रकम एकदम वसूल करावयाची, कां ती हप्त्यानें घ्यावयाची हें प्रत्येक मंडळी तिची गरज आणि

भावी भागीदारांची इच्छा व शक्ति ह्यांविषयींचा अंदाज, ह्यांस अनसरून ठरविते. जर सर्व भांडवल एकदम मिळण्याजोगें आणि भरावयाचें असेल, तर प्रश्नच नाहीं. नाहीं तर, कांहीं रकम अर्जाचे वेळीं, कांहीं रकम भाग देण्याचे वेळीं व उरलेली रकम मंडळी मागेल त्याप्रमाणें हप्त्यांनीं वसूल केली जाते. वरील उदाहरणांतील मंडळीचा प्रत्येक भाग १०० रुपयांचा असेल, व त्यामागें प्रत्येकीं ५० रुपयांचीच मागणी केलेली असेल, तर मागणी केलेल्या भांडवलाची रकम १॥ लक्ष रुपये होईल. ही सर्व रकम वेळचेवेळीं वसूल होईलच असें नाहीं; तेव्हां वसूल झालेलें भांडवल ह्याहून थोडें कमीच असणार. जर २५,००० रुपये बाकी राहिले, तर वसूल झालेलें भांडवल १। लक्ष रुपये होईल.

## भागांवरील डिव्हिडंड

भागांवर जेव्हां डिव्हिडंड जाहीर करण्यांत येतें, तेव्हां भागीदारांस किती रकम मिळेल, हें प्रत्येक भागांवरील भरणा झालेल्या पैशावर अवलंबून राहील. एखाद्या मंडळीनें ८ टक्के डिव्हिडंड जाहीर केलें, व प्रत्येक १०० रुपयांच्या भागावरील जमा झालेलें भांडवल ५० रुपये असेल, तर भागी-दारांस प्रत्येक भागाबद्दल ४ रुपये मिळतील. डिव्हिडंड जाहीर करण्याचा दुसराहि प्रकार आहे. अमुक टक्के डिव्हिडंड असें न म्हणतां प्रत्येक भागाबद्दल एक ठराविक रकम वांटण्यांत येते. अर्थात, शेवटीं नफा काय पडला, हें पहातांना भागीदार त्याचा शेकडेवारीनें हिशेब करतोच. डिव्हिडंड वाटतांनाच मंडळीनें त्याबद्दल प्राप्तीवरील कराची रकम परस्पर भरली तर त्यास कर भरलेलें डिव्हिडंड म्हणतां येईल. प्रत्येक भागीदारास, डिव्हिडंडचे रकमे-बरोबरच, मंडळीनें कर भरला आहे, अशा अर्थाचा दाखला देण्यांत येतो, व तो इनकमटॅक्स अधिकाऱ्यांकडे रुजू केला असतां भागीदारांस ह्या डिव्हिडंड-बद्दल पुनः कर द्यावा लागत नाहीं. सामान्य डिव्हिडंडच्या दरापेक्षां अशा तऱ्हेनें प्राप्तीवरील कर भरलेलें डिव्हिडंड भागीदारांस फायद्याचें पडतें व ज्यास्त दरानें डिव्हिडंड वांटलें असें म्हटलें नाहीं तरी पर्यायानें भागीदारांस ज्यास्त नफा मिळतो. डिव्हिडंड हें वर्षांतून एकदाच जरी देण्यांत येत असलें, तरी कांहीं मंडळ्या पहिल्या सहामाहीनंतर हिशोब करून डिव्हिडंड जाहीर करतात, व त्या मुदतीपुरती रकम देऊन टाकतात, आणि वर्षाअखेर हिशेब पुरे झाले, म्हणजे पुनः डिव्हिडंड जाहीर करून सालाचा एक वट्ट

दर निश्चित करतात. उदाहरणार्थ, एखाद्या मंडळीस असें आढळून आलें कीं पहिल्या सहामाहींत १ लक्ष रुपये नफा झाला. त्यापैकीं ८०,००० रुपये ती ८ टक्के नफा वांटण्यांत खर्च करील, व पुढच्या सहामाहीच्या नफ्यांत २०,००० रुपये जमा करील. दुसऱ्या सहामाहींत पुनः १ लक्ष नफा झाला तर १,२०,००० रुपये भागीदारांस वांटतां येईल, व मंडळी १२ टक्के दरानें दुसऱ्या सहामाहीचा नफा वांटील. म्हणजे भागीदारांस वर्षाचा १० टक्के दर पडेल.

## स्टॉक, शेअर व बॉंड

'स्टॉक', 'शेअर' व 'बॉंड' हे तीन शब्द जरी वेगवेगळ्या तऱ्हेच्या रोख्यांचे निदर्शक असले, तरी कित्येक वेळां त्या तिहींचा निर्देश 'स्टॉक' ह्या एकाच संज्ञेनें केलेला आढळतो. अमेरिकेंत त्यांस 'बॉंड असें म्हणतात भागांची दर्शनी किंमत ठरलेली असते; स्टॉकची तशी असण्याचें कारण नाहीं, हा या दोहोंतील मुख्य फरक होय. भागांची दर्शनी किंमत १ रु., ५ रु., ५० रु. १०० रु. अशी निश्चित असते, व भागांची मालकी दर्शविणारें 'शेअर सर्टिफिकेट' ह्यांत ती नमूद केलेली असते. ही किंमत बदलत नाहीं, परंतु स्टॉकची दर्शनी किंमत कितीहि असूं शकते. समजा, एका मंडळीनें एक लक्ष रुपयांचें भांडवल उभारून १०० रुपये दर्शनी किंमतीच्या एका स्टॉकला १०० रुपये, या दरानें ते विक्रीस काढले. लोकांनीं त्यांत पैसे गुंतवितांना, आपल्या अर्जामध्यें १०० रुपये किंवा त्याच्या कोणत्याहि पटीची अशी रकम नमूद करण्याचें कारण नाहीं. जरी त्यांनीं १३ रुपये, २७ रुपये, किंवा अशा कोणत्याही अडनेडी रकमेचा स्टॉक मागितला, तरी १०० रुपयांस १०० रुपयांच्या स्टॉकच्या दरानें त्यांस तो देण्यांत येतो. शेअर बाजारांत बाजारभाव निश्चित होतील ते १०० रुपयांच्या स्टॉकला किती रुपये ह्या दरानेंच होतील; परंतु गिऱ्हाइकास कोणत्याहि रकमेचा स्टॉक विकतां येईल किंवा विकत मिळेल. भागांचें तसें होत नाहीं. अर्थात्, अडनेडी रकमांच्या स्टॉकला गिऱ्हाइक मिळण्यास थोडी अडचण पडेल, हें खरें; परंतु हा सोयीचा प्रश्न आहे; शक्याशक्यतेचा नव्हे.

## रजिस्टर्ड व बेअरर रोखे

मंडळ्यांच्या कचेरींत, स्टॉक धारण करणाऱ्या लोकांची नोंद केलेली असते, व स्टॉक धारण करणारांस त्यांचे मालकी-हक्क दर्श-

विणारें एक सर्टिफिकेट देण्यांत येतें. स्टॉकची खरेदी-विक्री बाज़ारांत परस्पर होऊं शकत नाहीं; प्रत्येक व्यवहाराची मंडळीच्या कचेरींत नोंद होणें जरूर असतें. अशा स्टॉकला 'रजिस्टर्ड स्टॉक' असें म्हणतात. ज्याप्रमाणें सरकारी कर्जरोखे धारण करणारांची सरकारचे दप्तरांत नोंद असत नाहीं, त्याचप्रमाणें कित्येक वेळां भागांची नोंद मंडळ्यांचे कचेरींत ठेवलेली नसते; त्यांची खरेदी-विक्री परस्पर होऊं शकते. डिव्हिडंड देण्याचे वेळीं जो कोण भाग धारण करीत असेल, त्यास 'डिव्हिडंड मिळतें. स्टॉक हे नेहेमींच रजिस्टर्ड असतात, परंतु भाग हे रजिस्टर्ड असतील किंवा नुसते 'बेअरर' असतील म्हणजे करन्सी नोटांप्रमाणें सुलभतेनें त्यांची देवघेव होईल. रजिस्टर्ड म्हणजे मंडळीच्या कचेरींत नोंदलेल्या भागांची खरेदी-विक्री करतांना त्यांचेवर स्टॉकप्रमाणेंच बंधनें असतात. रजिस्टर्ड रोखे धारण करणारांस डिव्हिडंडची रकम घरपोंच मिळूं शकते, परंतु बेअरर रोखेवाल्यांचा पत्ता नेहेमींच अनिश्चित असल्यानें व मंडळीजवळ त्याची नोंद नसल्यानें ही सुलभता त्यांस प्राप्त होत नाहीं. शिवाय, बेअरर रोखे गहाळ झाले, किंवा चोरीस गेले, तर फारच पंचाइत पडते. रजिस्टर्ड रोखे ह्या दृष्टीनें श्रेयस्कर होत. तथापि, बेअरर रोख्यांची खरेदी-विक्री करणें अत्यंत सोईचें व सोपें असतें; वर्ग करण्यास पडणारी फी, दगदग व वेळ हीं त्यांच्या बाबतींत वांचतात.

प्रत्येक रोख्याकडे दोन दृष्टींनीं पहातां येणें शक्य आहे. मंडळीची मालमत्ता किती आहे, त्यापैकीं प्रत्येक भागाच्या वांटणीस किती येईल, व पुढें मंडळीच्या कामांत वाढ किती होईल, हें सर्व अजमावून त्या मंडळीच्या रोख्याची किंमत ठरवणें, हा एक मार्ग झाला. आज जरी मंडळीनें डिव्हिडंड अल्प दरानें वांटलें किंवा तें मुळींच दिलें नाहीं, तरी त्याकडे दुर्लक्ष्य करून मंडळीच्या एकंदर भरभराटीकडे दृष्टि ठेवून रोख्यांचा भाव ठरविणारे बरेच लोक असतात. उलट पक्षीं, केवळ डिव्हिडंडवर नजर ठेवून रोख्यांची किंमत करणारेहि लोक थोडे नसतात. भागांची किंमत, डिव्हिडंड कमी किंवा ज्यास्त मिळणार ह्याबद्दलच्या कल्पनेप्रमाणें उतरेल किंवा चढेल; त्याचप्रमाणें, मंडळीच्या भरभराटीमुळेंहि तींत फेरफार घडून येईल. केवळ डिव्हिडंडच्या दरावर रोख्यांचा बाजारभाव अवलंबून रहात नाहीं, हें पुढें दिलेल्या कोष्टकांतील रोख्यांच्या भावांवरून लक्षांत येईल.

## इनव्हेस्टमेंट ट्रस्ट्स

पैसे गुंतविणाऱ्या इसमानें कोणत्या रोख्यांत ते गुंतवावे, हें त्याच्या मनाच्या कलावर अवलंबून राहील. सुरक्षितपणाच्या दृष्टीनें त्यांची नंबरवारी अशी लागेल:—सरकारी कर्जरोखे, निमसरकारी रोखे, डिबेंचर्स, प्रेफरन्स भाग व ऑर्डिनरी भाग. तथापि, एकाच धंद्यांत फार रकम गुंतवणें श्रेयस्कर होणार नाहीं. एखाद्यानें आपली सर्व शिल्लक कापसाच्या कापडाच्या गिरण्यांचे भागांत गुंतविली व कांहीं कारणानें त्या धंद्यावर आपत्ति आली तर रकमेवर व्याज तर सुटणार नाहींच, परंतु मुद्दलहि हातीं येणें कठिण जाईल. अशा तऱ्हेचें संकट टाळण्याचा यत्न 'इनव्हेस्टमेंट ट्रस्ट्स' मध्यें केलेला असतो. वेगवेगळया धंद्यांत व त्यांतहि पुन: वेगवेगळया तऱ्हेच्या भागांत पैसे गुंतविलें असतां कांहीं मंडळयांनीं डिव्हिडंड कमी दिलें, तरी सरासरीनें व्याज चांगलें सुटूं शकतें, ह्या तत्त्वावर इनव्हेस्टमेंट ट्रस्ट्सची उभारणी केलेली असते. एकाच पाटींत सर्व अंडीं ठेवूं नयेत, अशा अर्थाची इंग्रजी भाषेंत एक म्हण आहे. तसें केलें नाहीं, तर एका अंड्यामुळें सर्वच अंडीं नासावयाचीं ! पैसे देखील एकाच ठिकाणीं न गुंतवितां, ते शक्य तितक्या निरनिराळ्या ठिकाणीं पेरणें श्रेयस्कर आहे. इनव्हेस्टमेंट ट्रस्ट्स आपल्या भागीदारांचे पैसे वेगवेगळया रोख्यांत व भागांत गुंतवितात, इतकेंच नव्हें तर निरनिराळ्या देशांतहि त्यांची विभागणी केली जाते. हेतु हा, कीं मुद्दल सुरक्षित राहून सरासरीनें डिव्हिडंड चांगलें पडावें. इंडस्ट्रियल इनव्हेस्टमेंट ट्रस्ट ह्या नांवाची एक मंडळी मुंबईंत स्थापन झालेली आहे, तिनें आपले पैसे अशाच रीतीनें विभागून पेरले आहेत. मध्यम स्थितींतील एखाद्या इसमानें आपले पैसे स्वतःच अशा पद्धतीनें निरनिराळ्या रोख्यांत व भागांत गुंतवूं म्हटलें, तरी त्यास तें अशक्य आहे, कारण त्याचे जवळील रकम मर्यादित असणार, हें उघड आहे. संयुक्त व सहकारी तत्त्वावरच ही योजना करतां येणें शक्य आहे.

## बाजारभावांचें पत्रक

खालीं दिलेल्या कोष्टकांत मंडळयांच्या भागांचे बाजारभाव नमूद केलेले आहेत. पहिल्या प्रथम मंडळीचें संक्षिप्त नांव दिलेलें असून पहिल्या कंसांत भागांची दर्शनी किंमत दर्शविली आहे. त्याच कंसांतील दुसरा आंकडा भरणा झालेली रकम दर्शवितो. त्यानंतर, भागांवर गतवर्षीं किती

डिव्हिडंड वांटलें होतें ह्याचा तपशील दिलेला आहे. कांहीं मंडळ्या भागांवर अमूक टक्के डिव्हिडंड, असें जाहीर न करतां प्रत्येक भागाबद्दल विशिष्ट रकमेइतके डिव्हिडंड, असें जाहीर करतात हें कोष्टकावरून समजून येईल. त्यानंतरच्या कंसांतील आंकडा भागांचा आदल्या दिवसाचा बाजारभाव दाखवितो व शेवटचा आंकडा अहवालाच्या दिवसाचा भाव दर्शविणारा आहे. उदाहरणार्थ, दौंड–बारामती रेल्वेचा प्रत्येक भाग १०० रुपयांचा असून ते सर्व भरणा झालेले आहेत. गेल्या वेळेस त्या मंडळीनें ५ टक्के दरानें डिव्हिडंड वांटलें. आदल्या दिवशींचा भागाचा बाजारभाव ९५ रु. ८ आणे होता, तो अहवालाचे दिवशीं उतरून ९३ रु. ८ आणे झाला.

## बँका

बँक ऑफ इंडिया ( १००–५० ) १०% ( ११९½ ) ११९½
बँक ऑफ बरोडा ( १००–५० ) १०% ( ९९½ ) १००
इंपिरियल बँक ( ५०० ) १२% ( १५७० ) १५६५
प्रॉव्हिन्शिअल कोऑपरेटिव्ह ( ५० ) ४% ( ५० ) ५०

## रेल्वेज

दौंड-बारामती ( १०० ) ५% ( ९५½ ) ९३½
पाचोरा-जामनेर ( १०० ) ४% ( ९२ ) ९२
तापी व्हॅली ( ५०० ) ८% ( ७६५ ) ७६५

## विमा–मंडळ्या

न्यू इंडिया ( ७५–१५ ) १ रु. ३ आ. ( ४३ ) ४३
ओरिएंटल ( २०० ) रु. १२५ ( ४,४१५ ) ४,४२५

## गिरण्या

लक्ष्मी कॉटन ( २५० ) रु. २५ ( ६८० ) ६८३¾
मुरारजी गोकुळदास ( १,००० ) डि० नाहीं ( ९०० ) ९००
नागपूर मॉडेल ( २५० ) डि० नाहीं ( ५७–८ ) ५०
सोलापूर ( १,००० ) रु. ६० ( २,५०० ) २,५००
विष्णु कॉटन ऑडि० ( ५०० ) रु. ६० ( १,४२० ) १,४२५

## सिमेंट

बुंदी ( १० ) रु. १–४ ( ४५$\frac{१}{४}$ ) ४६$\frac{१}{८}$
कट्नी ऑर्डि० ( १०० ) रु. ६ ( ४१५ ) ४१५
कट्नी डिफर्ड ( ४० ) ६३ रु. ८ आ. ९ पै ( १,३८५ ) १,४०५
शहाबाद ( १०० ) रु. ८ ( ५१८$\frac{३}{४}$ ) ५१८$\frac{३}{४}$ एक्स डि०

## वीज

बॉम्बे ट्रॅम्वे ऑडि० ( ५० ) १२% ( १५७$\frac{१}{२}$ ) १५६$\frac{७}{८}$
कराची ( १०० ) ९% ( २२३$\frac{३}{४}$ ) २३०
पुणें ( १०० ) ९% ( २१५ ) २१५
टाटा पॉवर ऑर्डि० ( १,००० ) रु. १५ ( १,५९६$\frac{१}{४}$ ) १,६१५
टाटा पॉवर प्रेफरन्स ( १,००० ) ७$\frac{१}{२}$% ( १,३८२$\frac{१}{२}$ ) १,३७५
टाटा हैड्रो डिबेंचर्स ( १,००० ) ६% ( ११२ ) ११०

## इतर

बेलापूर ( ५० ) रु. १० बोनस रु. २ ( ३१२$\frac{१}{२}$ ) ३१४$\frac{३}{८}$
इंडियन रेडिओ ऑर्डि० ( १०० ) १५% ( ४८८$\frac{३}{४}$ ) ४९१$\frac{७}{८}$
शिंद्या स्टीम ( १५ ) डि. नाहीं ( ११$\frac{१}{८}$ ) ११ १–१६
टाटा कन्स्ट्रक्शन ( ३० ) २–१५ ( ७५$\frac{१}{२}$ ) ७५$\frac{१}{४}$
टाटा स्टील ऑर्डि० ( ७५ ) डि० नाहीं ( १४२$\frac{१}{४}$ ) १४४
टाटा स्टील ( ३० ) डि० नाहीं ( ६८२$\frac{१}{२}$ ) ६९५
इंडियन इन्व्हेस्टमेंट ट्रस्ट ( १००–५० ) ( ५८$\frac{१}{२}$ ) ५९

---

# प्रकरण चौथें

## संयुक्त भांडवलाच्या मंडळया

### वृत्तपत्रांतली त्रोटक माहिती

संयुक्त भांडवलाच्या मंडळयांच्या वार्षिक अहवालांचा व त्यांनीं योजिलेल्या डिव्हिडंडचा उल्लेख वर्तमानपत्रांत मधून मधून केलेला आढळतो आणि कित्येक वेळां त्यांच्या वृत्तांतांचा सारांशहि दिलेला असतो. सर्वसाधारण वार्षिक सभेमध्यें, मंडळीचें व्यवस्थापक–मंडळ डिव्हिडंड किती वांटावें ह्याबद्दलचा आपला अभिप्राय भागीदारांचे मंजुरीसाठी मांडतें, कारण त्यांच्या अनुमतीवांचून डिव्हिडंडची रकम व दर कायम होत नाहीं व त्याची वांटणी करतां येत नाहीं. मंडळीचा वार्षिक अहवाल ठरलेल्या मुदतींत अगोदरच भागीदारांकडे पाठविलेला असतो, तोहि मंजूर करून घेण्यांत येतो आणि व्यवस्थापकमंडळाची फेरनिवडणूकहि करण्यांत येते. त्याचप्रमाणें, ताळेबंद व हिशेब हेहि मंजूर व्हावे लागतात आणि नेमावयाच्या हिशेबतपासनिसांचा मुशाहिरा ठरविण्यांत येतो. सर्वसाधारण सभेच्या कामाचें हें स्थूलमानानें वर्णन झालें. जेव्हां कांहीं विशेष कामासाठी मंडळीच्या भागीदारांची सभा बोलावण्यांत येते, तेव्हां तिला विशेष-साधारण सभा असें म्हणतात. भांडवलाची पुनर्घटना करणें, तींत वाढ किंवा घट करणें, भागांचें स्वरूप व त्यांची प्रतवारी ह्यांमध्यें फेरफार करणें इत्यादि कामें विशेष-साधारण सभेंतच करावीं लागतात, व कित्येक वेळां, नियमांप्रमाणें, एकदा मंजूर झालेला ठराव पुनः दुसऱ्या सभेंत मंजूर करून घ्यावा लागतो.

वर्तमानपत्रांतून सर्वच मंडळयांचे अहवाल प्रसिद्ध होतात, असें नाहीं, आणि होतात तेहि अत्यंत त्रोटक असे असतात. अगोदरच मंडळयांचे अहवाल असावे तितके तपशीलवार नसतात, आणि भागीदारांस मिळणारी माहितीहि अत्यंत तुटपुंजी अशी असते. मिळेल त्या माहितीवरूनच मंडळयांची खरी वस्तुस्थिति अजमासावी लागते, व ह्यासाठी आंकड्यांची छाननी अत्यंत काळजीनें करणें जरूर असतें.

## छाननीची आवश्यकता

एकाच तऱ्हेचे व्यवहार करणाऱ्या मंडळयांचे अहवाल ठराविक सांच्याचे असतात, असें आढळून येतें. उदाहरणार्थ, विमामंडळयांच्या वार्षिक सभांपुढें, त्यांच्या अध्यक्षांनीं केलेलीं भाषणें हीं, नांवांची व आंकड्यांची अदला-बदल केली, तर तीं कोणत्या मंडळीच्या सभेपुढें करण्यांत आलीं, हें सांगतां येणें कठीण होईल. प्रत्येक अध्यक्ष विम्याच्या अमर्याद क्षेत्रावर भर देतो व स्वतःच्या मंडळीची व्यवस्था अत्यंत काटकसरीची व चोख असल्याची ग्वाही देतो. सभांचे रिपोर्ट वृत्तपत्रांत प्रसिद्ध होतात, त्यांत ह्या अध्यक्षीय भाषणांसच प्राधान्य मिळतें; प्रसिद्ध करण्यांत येणाऱ्या मजकुरांत भागीदारांच्या तक्रारींस कित्येक वेळां दुय्यम प्रतीचेंहि स्थान मिळत नाहीं. भागीदार हे सर्व देश-भर पसरलेले असतात व त्या सर्वांस सभेस हजर राहतां येणें अशक्य असतें. ह्या कारणानें, सभेस हजर असणारांची संख्या अनेक प्रसंगीं इतकी अल्प असते, कीं अध्यक्षांचे आभार मानण्याचें काम वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींवर सोंपविण्यांत आल्याचीं उदाहरणें दाखवितां येतील. कांहीं वर्त-मानपत्रांची, मंडळयांचे अहवाल जाहिराती म्हणून प्रसिद्ध करण्याची पद्धति असते. कित्येक वेळां अहवालांवरून काढलेलीं संपादकीय अनुमानें आणि मतेंहि प्रसिद्ध केलीं जातात, आणि तीं स्वतःस अनुकूल अशीं असण्या-विषयीं मंडळयांच्या चालकांची स्वाभाविक इच्छा असते. ह्या योगानें मंडळीस प्रसिद्धी आणि वर्तमानपत्रांस पैसा मिळतो. तथापि त्यामुळें वृत्तपत्रांवर एक प्रकारची जबाबदारीहि येते, ती त्यांनीं लक्ष्यांत ठेविली पाहिजे. ह्यासंबंधांत कांहीं पत्रें अत्यंत निःपक्षपातीपणानें व सावधगिरीनें आपला अभि-प्राय देतात.

## स्थूलमानाचें पण मूलग्राही ज्ञान

अहवाल किती वेळां प्रसिद्ध झाला; व तो किती सविस्तरपणें छापला गेला, ह्यावरून कोणत्याहि मंडळीची स्थिति अजमावणें कठिण असतें. ज्यांस मंडळयांचे भाग खरेदी करावयाचे किंवा विकावयाचे असतील अशा लोकांस ह्यापेक्षां अधिक तपशीलवार व विश्वसनीय माहिती असणें जरुर असतें. अहवालांत आणि ताळेबंदांत ग्रथित केलेली माहिती अत्यंत त्रोटक असते आणि स्वतःचें मत बनवण्यास ह्याशिवाय दुसरीं साधनें तर लोकांस उपलब्ध नसतात. ह्यामुळें, मिळेल त्या माहितीवर त्यांस संतुष्ट व्हावें लागतें,

किंवा दुसऱ्याच्या सहाय्यावर अवलंबून रहाणें भाग पडतें. ह्याकरितां मंडळयांसंबंधीं सर्वसाधारण, स्थूलमानाची पण मूलग्राही अशी माहिती प्रत्येकास असणें आवश्यक आहे. नवीन मंडळयांची स्थापना आणि त्यांचें विसर्जन, त्यांची व्यवहारपद्धति, व्यवस्थापक मंडळें व त्यांवरील जबाबदारी, भागीदारांचे मंडळयांतील हितसंबंध व त्यांचें संरक्षण, हिशेब ठेवण्याची पद्धत व त्यांची तपासणी, भागीदारांच्या तक्रारींची दाद लागण्याचे मार्ग, कंपन्यांच्या कारभाराविषयींचा कायदा व त्यासंबंधीं कोर्टाचे अधिकार, इत्यादि गोष्टींचा परिचय सामान्यतः सर्वांसच इष्ट असल्यानें चालू प्रकरणांत तो करून देण्याचें आम्हीं योजिलें आहे. पुढें येणाऱ्या विवेचनावर आधारलेल्या चौकस दृष्टीनें, व्यापारी व औद्योगिक मंडळयांच्या स्थितीची छाननी केली गेल्यास तिचा प्रत्येकास चांगला उपयोग झाल्यावांचून रहाणार नाहीं, असा आम्हांस भरंवसा वाटतो.

## स्थापना-विधीचें नमुनेदार वर्णन

नवीन औद्योगिक किंवा व्यापारी मंडळीच्या स्थापनेचा विधि कसा असतो ह्यासंबंधीं मनोरंजक वर्णन मि. हार्ट्ले विदर्स ह्यांनीं आपल्या 'स्टॉक्स ॲन्ड शेअर्स' ह्या पुस्तकांत केलें आहे व उदाहरणादाखल त्यांनीं एका दंतमंजन मंडळीच्या बनावाचें सुंदर चित्र रेखाटलें आहे, तें असें आहे. दांतमोडे ह्या नांवाच्या एका दंतवैद्यानें नवीन दंतमंजन तयार केलें असलें, तरी त्यास तें मोठ्या प्रमाणावर कसें खपवावें, हें माहीत नाहीं. त्याच्याच आळींतील एक जण दलालीचा धंदा करणारा असतो व तो दांत दुरुस्त करण्यासाठी एकदा सहज दांतमोड्यांच्याकडे जातो. दांतांस लावण्याकरितां दांतमोडे त्याला आपलें मंजन देतो, आणि त्यावरून दलालाला नवीन मंडळी काढण्याची कल्पना सुचते. दोघांची त्यासंबंधीं भाषा सुरू होते; दांतमोड्यास आशा सुटून तो दंतमंजनावरील आपला हक्क रोख पैसे घेऊन विकण्यास तयार नसतो, आणि सॉलिसिटरच्या कचेरींत त्याचा मेव्हणा कारकून म्हणून असतो, त्याचा सल्ला घेण्यास तो जातो. नवीन मंडळया काढण्याच्या धंद्यांत वाकबगार आणि शोधक अशा एका एजंटाची व त्याची गांठ पडल्यावर, लवकरच मंडळीसंबंधीं कागदपत्रें व करारनामे तयार करण्यांत येतात; व त्यांत मंडळीनें कोणकोणतीं कामें करावीं ह्यासंबंधींच्या यादींत सर्व तऱ्हेच्या व्यवहारांचा समावेश करण्यांत येतो. जरी दंतमंजन मंडळीनें

आपलें दंतमंजन जगभर पाठविण्यासाठी आगबोटी बांधावयाचें ठरविलें तरी त्यास प्रत्यवाय येणार नाहीं, अशी योजना करण्यांत येते. नंतर मंडळी, सरकारांत योग्य ती फी भरून, रजिस्टर करण्यांत येते.

### मंडळी स्थापन झाली

अशा रीतीनें मंडळीस स्वतंत्र व कायदेशीर अस्तित्व प्राप्त होतें. हें काम चालू असेपर्यंत नवीन मंडळीची स्थापना करण्यांत तज्ज्ञ असलेले उपरिनिर्दिष्ट दलाल, योग्य अशा लोकांस व्यवस्थापक मंडळांत ओढून घेतात, आणि मंडळीची प्रसिद्धी होऊन तिला अनुकूल असें वातावरण निर्माण व्हावें, ह्यासाठी वर्तमानपत्रांतून "दांतांची आवश्यकता आहे काय ?" अशा आशयाचे वाद सुरू करून शेवटीं त्याचें लोण दंतमंजन मंडळीपर्यंत पोंचविण्यांत येतें. मंडळांतील व्यवस्थापक दंतवैद्यकींत निष्णात असले, तरी खरेदी–विक्री, बाजार भाव, व्यापार इत्यादि व्यावहारिक गोष्टींची त्यांस कांहींहि माहिती नाहीं, ह्याविषयीं खात्री करून घेण्यांत आलेली असते, आणि हें सर्व काम मंडळीच्या अध्यक्षाकडे सोंपविण्यांत येतें. हा अध्यक्ष असल्या कामांत अर्थातच निष्णात असा असतो, आणि तो मंडळीसाठी आपल्याच एका नातेवाइकास मॅनेजर नेमतो आणि आपल्या जुन्या व्यवसायापैकीं एक इमारत मंडळीला स्वस्त (?) किंमतींत मिळवून देतो. हें सर्व होईपर्यंत दंतमंजनास पेटंट मिळविण्यांत आलेलें असतें, आणि 'प्रॉस्पेक्टस' जाहीर व्हावयाचा काय तो अवकाश असतो. प्रॉस्पेक्टसमध्यें मंडळीच्या भागांसंबंधीं सर्व माहिती देण्यांत येऊन, भागीदारांस २० टक्के डिव्हिडंड सहज देण्यांत येईल, व त्याखेरीज गंगाजळींत पुष्कळ मोठी रक्कम ठेवतां येईल, असें जाहीर करण्यांत येऊन, भागांची आकर्षकता वाढविण्यांत येते. हा प्रॉस्पेक्टस सर्व वर्तमानपत्रांतून झळकतो, आणि स्टॉक एक्सचेंजवर भागांची खरेदीविक्री होण्यास परवानगी मिळविण्यांत येऊन, वर्तमानपत्रांत त्यांची रोजची किंमत प्रसिद्ध होऊं लागते. ह्या सर्व गोष्टी करण्यास पुष्कळ पैसा लागतो, आणि त्याचा 'प्राथमिक खर्चांत' समावेश झाल्यानें तो बोजा भागीदारांवर पडल्याखेरीज रहात नाहीं. अशा रीतीनें मंडळी स्थापन झाल्यावर मंडळीचा पुढचा कारभार भागीदारांचे तर्फे डायरेक्टर्स चालवितात.

### भागीदार आणि पातीदार

व्यापार किंवा उद्योगधंदे मोठ्या प्रमाणावर चालवावयाचे असल्यास मंडळ्या काढूनच ते यशस्वी करतां येतात, ह्याचा उल्लेख मागें आलेला

आहे. मंडळया आणि पातींत चालणाऱ्या भागीदाऱ्या, ह्यांचेमधील भेद आणि मंडळयांचें वैशिष्ट्य, ह्याचा आतां विचार करूं. पातीदारीस, पातीदारांचे व्यतिरिक्त असें स्वतंत्र अस्तित्व नसतें, परंतु मंडळीस निराळा कायदेशीर दर्जा प्राप्त होतो आणि मंडळीचे कांहीं भागीदार मृत झाले, तरी मंडळी जिवंत रहाते आणि मंडळी बुडाली, तरी भागीदार तरतो. मंडळीची मालमत्ता ही भागीदारांहून भिन्न अशा कायद्यानें प्रस्थापित झालेल्या व्यक्तीच्या मालकीची आहे, असें मानण्यांत येतें, परंतु पातीदारींत तसें होत नाहीं; पातीदारांचें वैशिष्ट्य कायम राहून, त्यांच्या सामुदायिक मालकीची ती आहे, असें समजण्यांत येतें. हा फरक अत्यंत महत्त्वाचा आहे; कारण, मंडळीस कर्ज झालें, तरी मंडळीचे भागीदार तें फेडण्यास व्यक्तिशः जबाबदार नसतात. मंडळीची मालमत्ता विकूनहि कर्जफेड झाली नाहीं, तर सावकार व भागीदार ह्यांमध्यें कोणत्याहि तऱ्हेचा धनको–ऋणकोचा संबंध उरत नाहीं. या उलट, पातीदारीमध्यें पातीदार हे पातीचें कर्ज फेडण्यास व्यक्तिशः बांधलेले असतात. एक उदाहरण घेतलें असतां, ह्या भेदाचें महत्त्व चटकन् ध्यानांत येईल. समजा, तिघाजणांची एक पातीदारी आहे व दुसऱ्या तिघा जणांची एक खासगी संयुक्त भांडवलाची मंडळी आहे. पातीच्या व्यवहारांत जर १५,००० रुपयांची खोट लागली, तर प्रत्येक पातीदारास ५,००० रुपयांची भरपाई करावी लागेल. तिघांपैकीं एखादा जर आपल्या वांट्याची रकम उभी करण्यास असमर्थ असेल, तर इतरांस आपली चीजवस्त, घरदार गहाण टाकून, प्रसंगीं ती विकूनहि कर्जफेड करावी लागेल आणि इतकें करूनहि भागलें नाहीं, तर नादारीचा प्रसंग ओढवल्याखेरीज रहाणार नाहीं. ह्या उलट, मंडळीस १५,००० रुपयांचें नुकसान येईल तर ती रकम देण्यास मंडळी जबाबदार राहील. मंडळीची मालमत्ता पुरेशी रकम उभी करण्यास असमर्थ असली, तरी मंडळीच्या भागीदारांवर त्यांच्या भागांत नमूद केलेल्या रकमांखेरीज कोणतीहि अन्य जबाबदारी येऊं शकत नाहीं. अशा रीतीनें भागीदारांची जबाबदारी मर्यादित राहून व्यवहारांत आपणांस जास्तींत जास्त किती खोट बसेल ह्याची त्यांस स्पष्ट कल्पना असते आणि त्यामुळें मंडळीच्या कार्यास स्थैर्य प्राप्त होतें. मंडळी ही कायद्यानें भागीदारांपासून स्वतंत्र अशी संस्था गणलेली असल्यामुळें, भागीदार हे तिच्याशीं करार करूं शकतात, परंतु पातीदारीच्या घटनेंत तसें होऊं शकत नाहीं.

## मंडळ्यांचे दोन प्रकार

संयुक्त पण मर्यादित जबाबदारीच्या मंडळ्यांचे प्रमुख प्रकार दोन; ‘ खाजगी ’ आणि ‘ सार्वजनिक ’. सर्वसाधारणपणें असें म्हणतां येईल, कीं बँकिंग, विमा इत्यादि प्रकारचीं कामें करणाऱ्या मंडळया सार्वजनिक स्वरूपाच्या असतात. खासगी मंडळींत जास्तींत जास्त ५० सभासद असूं शकतात; त्यांतील भागांच्या खरेदी-विक्रीचें नियंत्रण केलेलें असतें व तिच्या भागांची विक्री जाहिरात देऊन करतां येत नाहीं. कंपनी-कायद्यानें खासगी मंडळ्यांस अनेक सवलती दिलेल्या आहेत, कारण ह्या मंडळ्यांत हितसंबंध असलेल्यांची संख्या मर्यादित स्वरूपाचीच असणार, हें उघड आहे. सार्वजनिक मंडळ्यांचे व्यवहार नियंत्रित करण्यासाठी कायद्यानें विशेष खबरदारी घेतलेली आहे. मर्यादित संयुक्त जबाबदारीच्या प्रत्येक सार्वजनिक मंडळीमध्यें कमींत कमी सात भागीदार असावे लागतात. मंडळी स्थापन होण्यापूर्वींचा सर्व कारभार करणाऱ्या इसमास ‘ प्रमोटर ’ असें म्हणतात.

## मेमोरँडम व आर्टिकल्स ह्यांचीं पत्रकें

निदान सात जणांनीं ‘ मेमोरँडम ऑफ असोशिएशन ’ वर सह्या करून आपण स्वतः किती भाग घेणार, हें लिहून द्यावें लागतें. ह्या मेमोरँडममध्यें मंडळीचें नांव, रजिस्टर्ड ऑफिसची जागा, मंडळी स्थापन करण्याचे उद्देश, सभासदांची मर्यादित जबाबदारी, मंडळीचें भांडवल व त्याची विभागणी, इत्यादि गोष्टींचा खुलासा केलेला असतो. ‘ आर्टिकल्स ऑफ असोसिएशन ’ हें, मंडळीच्या अंतर्गत व्यवस्थेकरितां घातलेलीं बंधनें व नियम ह्यांचें, सविस्तर पत्रक असतें. त्यावर मेमोरँडमवर सह्या करणाऱ्या भागीदारांच्या सह्या घेण्यांत येतात. मेमोरँडममध्यें मंडळीच्या व्यवहारक्षेत्राची मर्यादा घालून दिलेली असते व त्या क्षेत्राबाहेर मंडळीस जातां येत नाहीं. आर्टिकल्समध्यें, ह्या मर्यादेंत मंडळीनें कारभार कसा करावा, ह्यासंबंधीं तपशीलवार नियम घालून दिलेले असतात. म्हणजे, मेमोरँडममध्यें ज्यांचा उल्लेख नाहीं, अशा गोष्टी आर्टिकलसमधील नियमांस धरून असल्या, तरी त्या मंडळीस करतां येणार नाहींत. मेमोरँडम व आर्टिकल्स हीं पत्रकें मंडळ्यांच्या राजिस्ट्रारचे कचेरींत नोंदावीं लागतात. कंपनी—कायद्यान्वयें तीं बरोबर आहेत कीं नाहींत हें पाहून, रजिस्ट्रार सर्टिफिकेट देतो व तें मिळाल्याबरोबर संयुक्त भांडवलाच्या मंडळीचा जन्म होतो व भागीदारांच्या वैयक्तिक अस्ति-

त्याहून भिन्न अशा एका कायदेशीर संस्थेची स्थापना होऊन तिच्या व्यवहारांस सुरवात होते.

## प्रॉस्पेक्टस

नवीन स्थापन झालेल्या मंडळयांच्या भागांत रकम गुंतवूं इच्छिणाऱ्या लोकांच्या दृष्टीनें प्रॉस्पेक्टस हें अत्यंत महत्त्वाचें पत्रक होय. मंडळीचे भाग किंवा डिबेंचर्स लोकांनीं विकत घ्यावे, ह्यासाठी आवश्यक अशा माहितीनें भरलेलें हें विनंतिपत्र असतें. रजिस्ट्रारच्या कचेरींत तें दाखल केल्याखेरीज, त्यास प्रसिद्धी देतां येत नाहीं. मंडळीतर्फे जनतेस कोणत्या सवलती व अटी सादर केल्या जातात, ह्याची नोंद व्हावी व त्यांतील विधानांसंबंधीं डायरेक्टरांवर जबाबदारी टाकतां यावी, असा तें पत्रक दाखल करावें लागण्यांत दुहेरी हेतु असतो. आपलें भाग लवकर विकले जावे, अशी प्रत्येक मंडळीची इच्छा असणें स्वाभाविक आहे. तेव्हां, लोकांस आपले भाग आकर्षक वाटावे, यासाठी मंडळीच्या कामाबद्दल व अपेक्षित नफ्याबद्दल उत्कट अपेक्षा व विश्वास उत्पन्न करणारीं विधानें करण्यांत येतात व आपली मंडळी जणूं काय सोन्याचीं अंडीं घालणारी कोंबडीच आहे, असें भासविण्याचा प्रयत्न कित्येक वेळां करण्यांत येतो. तेव्हां, लोकांनीं प्रॉस्पेक्टस अत्यंत काळजीपूर्वक वाचून आणि त्यांतील भपकेबाज विधानांत कांहीं जळ घालून नंतरच आपलें मत बनविलें पाहिजे. आपल्या खिशांतील पैसा खुबीनें ओढून घेण्याचा कोणी तरी प्रयत्न करीत आहे, ह्या जाणीवेनेंच प्रॉस्पेक्टसकडे पहावें, व नंतर शांत चित्तानें त्यांतील विधानें छेडून पहावीं व आपलें मत बनवावें, म्हणजे पुढें पश्चात्तापाचें कारण पडणार नाहीं.

## प्रॉस्पेक्टसचें रहस्य

प्रॉस्पेक्टसमधील विधानें वस्तुस्थितीशीं सुसंगत असून, सर्व गोष्टींचा त्यांत स्पष्ट खुलासा होणें अत्यंत जरूर आहे. महत्त्वाच्या बाबी झांकून ठेवणें किंवा अर्धवट खऱ्या गोष्टींस पूर्ण सत्याचा झगझगित मुलामा देणें हें जनतेची बुद्धिपुरःसर दिशाभूल करण्यासारखें आहे, म्हणून डायरेक्टरांनीं स्थापन व्हावयाच्या मंडळीविषयीं शक्यतेच्या मर्यादेंत, स्पष्ट आणि व्यावहारिक स्वरूपाचीं विधानें केलीं पाहिजेत आणि भरमसाट आश्वासनें देतां कामा नयेत. प्रॉस्पेक्टसमधील अर्धवट सत्य किंवा असत्य विधानांमुळें भागीदारांचें कांहीं नुकसान झालें, तर त्यास न्यायमंदिराचा मार्ग खुला असतो. संयुक्त

भांडवलाच्या मंडळ्यांच्या रजिस्ट्रारकडे प्रॉस्पेक्टसची नोंद झाल्याखेरीज, कंपनी-कायद्याच्या अन्वयें तीस अस्तित्त्वच प्राप्त होत नाहीं. प्रॉस्पेक्टसमध्यें मेमोरँडममधील तपशील, डायरेक्टरांच्या लायकीखातर त्यांनीं घ्यावयाचे भाग व डायरेक्टरांचें वेतन, मॅनेजर व डायरेक्टर ह्यांचीं नांवें, भागांसंबंधीं खुलासा, प्राथमिक खर्चाचा अंदाज व संस्थापकांस ( प्रमोटर ) दिलेला मोबदला, हिशेब तपासनिसांचीं नांवें, डायरेक्टरांचे हितसंबंध, वेगवेगळ्या दर्जाच्या भागीदारांचे मताधिकार, इत्यादि गोष्टींसंबंधीं खुलासा केलेला असतो. डायरेक्टर्स, बँकर्स, सॉलिसिटर्स, कायद्याचे सल्लागार, हिशेबतपासनीस वगैरेंच्या मोठमोठ्या नांवांनीं प्रॉस्पेक्टसला शोभा येत असली, तरी तेवढ्यानें लोकांनीं भुलून जातां कामा नये. मंडळीनें एका अतिशय मोठ्या बँकेंत खातें उघडलें, म्हणून तिचे पैशाचे व्यवहार चोख रहातील असें खात्रीलायक कसें म्हणतां येईल ?

## डायरेक्टर व भागीदार

भागीदार हे जरी सामुदायिक भांडवलाच्या मंडळीचे मालक असले, तरी तिचें चालू कामकाज पहाण्याकरितां त्यांस व्यवस्थापक मंडळाची नेमणूक करावी लागते. प्रत्येक मंडळीस कमींत कमी दोन तरी डायरेक्टर्स असावे लागतात, व ते भागीदारांतर्फे मंडळीचा कारभार चालवितात. नवीन मंडळीच्या पहिल्या डायरेक्टरांची नेमणूक बहुधा आर्टिकल्स ऑफ असोसिएशननेंच केलेली असते, म्हणजे जवळजवळ तेच स्वतःची नेमणूक करतात, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मंडळीच्या व्यवहारांस अनुसरून डायरेक्टरांमध्यें निरनिराळ्या कार्यांत कुशल व माहितगार असे लोक असावेत. कित्येक मंडळ्या कांहीं तज्ज्ञ लोकांस बुद्धिपुरःसर बोर्डाचे सभासद करून घेतात, तर कांहींचे डायरेक्टर केवळ बडे भागीदार असतात. कित्येक मंडळ्यांचें लक्ष, लोकांत प्रसिद्ध असलेल्या गृहस्थांचा आपणांशीं संबंध जोडण्याकडे असतें, तर कांहींचे डायरेक्टर्स तज्ज्ञ या नात्यानें मंडळीचे अधिकारी म्हणून कामें करतात. वास्तविक पहातां, डायरेक्टर्स हे भागीदारांचे प्रतिनिधी; परंतु ते निवडण्यांत भागीदारांच्या मतास विशेष मान क्वचितच मिळतो. सालोसाल तेच, तेच डायरेक्टर्स निवडून येतात, असा सर्वत्र अनुभव आहे.

## डायरेक्टरांची निवडणूक

डायरेक्टरांच्या सबंध बोर्डाची निवड एक, तीन किंवा पांच वर्षांनीं एकदम न करतां, दरवर्षी पाळीनें दोन किंवा तीन डायरेक्टरांची

निवड करण्याची पद्धत ज्यास्त श्रेयस्कर होय, कारण त्यामुळें चांगलीं माणसें नेमण्याची भागीदारांस उत्कृष्ट संधि उपलब्ध होऊन मंडळीच्या धोरणांत सातत्य व स्थैर्य रहाण्यास मदत होते. प्रत्येक भागामागें एक मत, अशा पद्धतीनें मतमोजणी होत असल्यामुळें, ज्यास्त भाग धारण करणारांच्या हातांत सत्ता एकत्रित होते, व कित्येक वेळां सभेचे वेळीं भागीदारांचें शिरगणतीनें बहुमत झालें तरी मतमोजणीचे वेळीं, विशेषतः प्रॉक्सीची पद्धति अंमलांत असल्यानें, पारडें फिरतें; कारण कित्येक डायरेक्टरांचीं व भागीदारांचीं हजारों मतें असूं शकतात. एक ते दहा रुपयांपर्यंतच्या लहान रकमांचे भाग काढण्यांत, मतांचा अधिकार एकवटण्याची इच्छाच दिसून येते. कितीहि भाग धारण केले, तरी प्रत्येक भागीदारास एकच मत प्राप्त होईल, अशी व्यवस्था फार थोड्या मंडळ्यांनीं केली आहे. तथापि, व्यवस्थापक मंडळाची नेमणूक भागीदारांच्या केवळ मताधिक्यावर सोंपवणें कितपत श्रेयस्कर आहे, हाहि एक महत्त्वाचा प्रश्न आहे. नालायक माणसें बाहेर काढणें व लायक माणसें नेमणें हें सर्वसाधारण निवडणुकींत ( मग तिची पद्धति कोणतीहि असो ), मनुष्यस्वभाव, पक्ष व गट बनविण्याची प्रवृत्ति इत्यादि गोष्टी लक्ष्यांत घेतां, हमखास घडून येणें कठिण असतें. तरीहि मंडळीचा चोख कारभार हें उद्दिष्ट पुढें ठेवून भागीदारांनीं व डायरेक्टरांनीं वागण्याचा शक्य तितका कसून प्रयत्न करणें अगत्याचें आहे. लोकशाहीचे गुणदोष मंडळ्यांच्या कारभारांत शिरत असतात; म्हणून, गुणांचें पोषण व दोषांचें निराकरण हें ध्येय भागीदारांनीं स्वतःपुढें ठेवून वागावें आणि डायरेक्टरांनीं आपल्यावरची जबाबदारी पूर्णपणें ओळखून आपलें वर्तन ठेवावें.

## डायरेक्टरांची लायकी

संयुक्त भांडवलाच्या मंडळ्यांस भागीदारांहून स्वतंत्र असें कायदेशीर अस्तित्त्व असतें, ह्याची जाणीव डायरेक्टरांचे मार्फत चाललेल्या व्यवहारांवरून होते. मंडळ्यांचे अधिकृत प्रतिनिधी ह्या नात्यानें ते त्यांचा कारभार पहातात. मंडळीतर्फे होणाऱ्या कामकाजांत त्यांनीं कांहीं करार केले तर ते अर्थातच मंडळ्यांस बंधनकारक होतात. भागीदारांनीं निवडलेले इसम ह्या दृष्टीनें ते एका अर्थी विश्वस्त समजले जाणें अपरिहार्य आहे. डायरेक्टरांनीं कोणतीं कामें स्वतः करावीं व कोणतीं कामें मंडळ्यांच्या अधिकाऱ्यांवर सोंपवावीं

हें प्रत्येक मंडळीच्या विशिष्ट कामावर व व्यवस्थेवर अवलंबून राहील. डायरेक्टरांनीं मंडळयांच्या कामकाजावर अहोरात्र आणि तपशीलवार लक्ष्य ठेवणें अशक्य आहे. कांहीं बाबी पगारदार अधिकाऱ्यांवर सोंपविणें अपरिहार्य असून त्यांचा कारभार जर नीट पार पडला नाहीं तर त्याबद्दल डायरेक्टरांस दोष देणें योग्य होणार नाहीं. तथापि डायरेक्टरांनीं कामकाजावर लक्ष्य ठेवण्यांत आळस करून लोकांच्या अविश्वासास पात्र होतां कामा नये. त्यांस त्यांच्या जबाबदारीच्या कामाबद्दल थोडाबहुत मोबदला मिळण्याची तरतूद आर्टिकल्समध्यें केलेली असते. कांहीं थोड्या डायरेक्टरांची योग्यता व त्यांच्या वेळाचें आणि सल्ल्याचें महत्त्व हीं लक्षांत घेतां, सभेस हजर रहाण्याबद्दलची त्यांस दिली जाणारी २० ते ५० रुपयांपर्यंतची रकम ही कांहींच नाहीं, असें म्हटलें पाहिजे. इतरांच्या बाबतींत हा मेहनताना त्यांच्या पात्रतेच्या मानानें फाजील आहे, असें दिसेल. पण ह्या बाबतींत डायरेक्टरांच्या लायकीप्रमाणें फरक करतां येत नाहीं. डायरेक्टर होणें ही केवळ मानाची गोष्ट नसून, त्यांत लोकसेवा आणि थोडाबहुत स्वार्थत्यागहि असतो, ह्याची जाणीव ती जागा मिळवूं पहाणारांस असली पाहिजे आणि भागीदारांनींहि ह्याच दृष्टीनें लायक माणसें निवडलीं पाहिजेत. मंडळयांच्या कारभाराची कार्यक्षमता पुष्कळशी डायरेक्टरांच्या पात्रतेवर अवलंबून असते आणि त्यांच्या नांवांवरूनच मंडळयांचा दर्जा ओळखण्याची लोकांत प्रवृत्ति असते.

## मंडळयांच्या सभा

मंडळीस कामकाज सुरू करण्यास अधिकार प्राप्त झाल्या तारखेपासून सहा महिन्यांचे आंत तिच्या भागीदारांची सभा भरलीच पाहिजे, असा कंपनी-कायद्यानें निर्बंध घातलेला आहे. ह्या सभेस ‘ स्टॅच्यूटरी ’ सभा असें म्हणतात व तीमध्यें ‘ स्टॅच्यूटरी ’ रिपोर्ट मंजूर करण्यांत येतो; त्यामुळें भागीदारांस मंडळीसंबंधीं महत्त्वाच्या गोष्टींची माहिती मिळण्यास संधि मिळते. स्टॅच्यूटरी रिपोर्टांत, भागांची विक्री किती झाली, पैसे किती जमा झाले, करारनामे कोणते करण्यांत आले, प्राथमिक खर्च किती आला, इत्यादि बाबींचा तपशील द्यावा लागतो.

प्रत्येक वर्षी मंडळीची साधारण सभा भरली पाहिजे व अशा दोन सभांमध्यें पंधरा महिन्यांहून ज्यास्त अंतर पडतां कामा नये. जरूर वाट-

त्यास, विशेष कारणासाठीं साधारण सभा बोलावण्याचा डायरेक्टरांस अधिकार आहे व भागीदारांनीं अशा सभेची मागणी केल्यास, सभा बोलावण्यास डायरेक्टर बांधलेले असतात. सभांत पास केलेल्या ठरावांचे तीन प्रकार संभवतातः (१) साधारण ठराव, (२) असाधारण ठराव आणि (३) स्पेशल ठराव. केवळ मताधिक्यानें पास होणारे ठराव साधारण ठराव होत; त्यांच्यासंबंधीं विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं. असाधारण ठराव म्हणून आपण ठराव मांडणार आहों, असें कळवून, तो ठराव मांडला व कमींत-कमी तीन चतुर्थांश मतें पडून तो पास झाला, तर त्यास असाधारण ठराव म्हणतात. स्पेशल ठराव हा दोनदां पास व्हावा लागतो; असाधारण ठरावास जरूर त्या अटी पार पडून तोच ठराव, त्या सभेनंतर पुनः दुसरी सभा बोलावून त्यांत मताधिक्यानें पास झाला, म्हणजे तो स्पेशल ठराव झाला. ह्या दोन सभांत कमींत कमी १४ दिवस व ज्यास्तींत जास्त एक महिना इतकें अंतर असावें लागतें. कोणत्याहि महत्त्वाच्या मुद्यांचा निकाल घाईनें न लागतां, त्यांचा योग्य विचार व्हावा व त्यास योग्य अवधि मिळावा, ह्यासाठीच स्पेशल ठरावांची योजना केलेली आहे. महत्त्वाच्या गोष्टींचा निर्णय करण्यास किंवा विशेष फेरफार करण्यास स्पेशल ठरावाची आवश्यकता असते.

## मंडळ्यांचें विसर्जन

मंडळ्यांची स्थापना होतांना ज्याप्रमाणें कांहीं विधि ठराविक नियमानुसार व्हावे लागतात, त्याचप्रमाणें त्यांचे व्यवहार गुंडाळावयाचे असल्यास विवक्षित ठराविक पद्धतीनेंच हें विसर्जनाचें काम व्हावें लागतें. कोर्टामार्फत किंवा मंडळीच्या आपखुषीनेंहि तिचें विसर्जन होऊं शकतें. कोणतीहि मंडळी संपुष्टांत येणें, हें एखाद्या व्यक्तीचें दिवाळें निघण्यासारखें असून दोघांच्या कारभाराची विल्हेवाट एकाच तऱ्हेनें लावण्यांत येते. मामुली परिस्थितींत मंडळ्यांच्या अंतर्गत कारभारांत हात घालण्याचें कोर्टास कांहींच प्रयोजन नाहीं, परंतु विशिष्ट कारण घडल्यास तसें करण्याचा त्यास अधिकार आहे. ( १ ) मंडळीनें स्पेशल ठराव पास करून, कोर्टा-मार्फत लिक्विडेट होण्याचें ठरविल्यास, ( २ ) स्टॅच्यूटरी रिपोर्ट नोंदला न गेल्यास किंवा स्टॅच्यूटरी सभा न भरविल्यास, ( ३ ) मंडळीची स्थापना झाल्यापासून एका वर्षांत तिच्या कामास सुरवात न झाल्यास, ( ४ ) मंड-ळीच्या सभासदांची संख्या साताचे खाली गेल्यास, (५) मंडळी आपलें कर्ज

देण्यास असमर्थ झाल्यास किंवा (६) मंडळीचा कारभार गुंडाळणें न्यायाचें ठरेल असें कोर्टास वाटल्यास मंडळीचा कारभार गुंडाळला जावा, असा निवाडा कोर्टास देतां येईल. मंडळी लिक्विडेशनमध्यें काढल्यावर, तिची चीजवस्त वगैरे, लिक्विडेटर नेमून, त्याचे हवालीं करण्यांत येते.

## विसर्जन केव्हां व कसें करावें ?

कित्येक मंडळयांचा कारभार स्वखुषीनें गुंडाळण्यांत येतो व तो तसा गुंडाळला जाणें ही मंडळयांचा शेवट होण्याची सनदशीर पद्धत आहे. मंडळीच्या आर्टिकलसमध्यें तिचें काम अमूक इतकी मुदत चालावें, अशी योजना असेल व ती मुदत भरली असेल, तर तिच्या भागीदारांच्या साध्या ठरावानें तिचा कारभार गुंडाळला जाण्याची व्यवस्था होईल. त्याचप्रमाणें, एक विशिष्ट गोष्ट घडली असतां मंडळीनें आपलें कामकाज थांबवावें, अशी आर्टिकलसमध्यें योजना असली, तरीहि साध्या ठरावानें काम भागेल. मंडळीचें देणें डोईजड झाल्याकारणानें तिचें कामकाज चालणें अशक्य झाल्यास, ती गुंडाळली जावी असा असाधारण ठराव करून, मंडळीस भागीदार असल्या संकटांतून सोडवतात. ह्याखेरीज इतर कोणत्याहि कारणासाठी मंडळी लिक्विडेशनमध्यें काढावयाची असल्यास स्पेशल ठरावानें तसें करतां येतें. कित्येक वेळां मंडळी सुस्थितींत असते, परंतु तिची पुनर्घटना करणें आवश्यक असतें. स्पेशल ठरावानें मंडळी लिक्विडेशनमध्यें काढून नवीन योजनेप्रमाणें तिचें रूपांतर करणें सोइस्कर असतें.

## हिशेब आणि ताळेबंद

प्रत्येक मंडळीनें आपले हिशेब चोख ठेविले पाहिजेत, हें सांगण्यास कायद्याचेंच कलम जरुर आहे, असें नाहीं. दरवर्षी, परंतु १५ महिन्यांहून ज्यास्त अंतर पडूं न देतां, मंडळीचे हिशेब पुरे करून ताळेबंद तयार करण्यांत आला पाहिजे. हा ताळेबंद मंडळीच्या हिशेब तपासनिसानें तपासून त्यावर आपला अभिप्राय सादर केला पाहिजे. मंडळीच्या साधारण सभेंत हा अहवाल वाचून दाखविण्यांत येतो. ताळेबंदांत मंडळीची मालमत्ता व येणें, त्याचप्रमाणें भांडवल व देणें, ह्यांसंबंधीं संक्षिप्त माहिती दिलेली असते, व त्यावरून मंडळीच्या सर्वसाधारण आर्थिक परिस्थितीसंबंधीं कल्पना येऊं शकते. ताळेबंदांतील आंकड्यांची छाननी करून त्यांतून अर्थबोध कसा काढावा, ह्याची माहिती आम्हीं आमच्या ‘बँका व त्यांचे

व्यवहार ' ह्या पुस्तकांतील ' हिशेब तपासणी आणि ताळेबंद ' ह्या प्रकरणांत विस्तारानें दिलेली आहे. बँकांचे व इतर मंडळयांचे ताळेबंद ह्यांचें स्वरूप साधारणपणें एकाच तऱ्हेचें असतें. मालमत्ता व येणीं-देणीं ह्यांचा तपशील अर्थात् प्रत्येक मंडळीच्या व्यवहारांच्या वैशिष्ट्यावर अवलंबून राहील. मंडळी ही जर बँक असेल, तर तिच्या ताळेबंदावर मॅनेजर व डायरेक्टरांपैकीं निदान तिघे ह्यांच्या सह्या असाव्या लागतात.

## ताळेबंदाची छाननी

ताळेबदांतील आंकड्यांची छाननी करतां येणें, हें मंडळयांचे भागांत रकमा गुंतवूं इच्छिणाऱ्या सर्व लोकांस अत्यंत जरूर आहे. तथापि, कित्येक मोठमोठ्या व सुस्थितींतिल मंडळयाहि ताळेबंदांत अत्यंत तुटपुंजी माहिती व त्रोटक आंकडे देतात आपल्या धंद्यांतल्या प्रतिस्पर्ध्यांस स्वतःच्या व्यवहारांतील खुब्या, क्लृप्त्या आणि व्यंगें कळूं नयेत, असा कित्येक वेळां ह्या कंजुषपणांत हेतु असतो. आपले पैसे कसे गुंतविण्यांत आले आहेत, हें विस्तारानें न सांगतां, त्याची गोळाबेरीज करून मांडण्याचें प्रयोजन तरी हेंच.

मंडळयांचे खर्च दोन प्रकारचे असतात. कायम स्वरूपाच्या सुधारणा करण्यासाठी व उत्पन्न वाढविण्यासाठी केलेला खर्च, आणि चालू खर्च, ह्यांतील भेद नीट लक्ष्यांत घेतला पाहिजे. चालू खर्च हा नफा-तोटा पत्रकांत ओढण्यांत येतो. उभारलेल्या कर्जावरील व्याज, उत्पादनाप्रीत्यर्थ खर्चीं पडलेल्या रकमा, विक्रीसाठी खर्चावी लागणारी रकम व मामुली व्यवस्थेचा खर्च, ह्या सर्व बाबींचा समावेश त्या पत्रकांत होतो. कित्येक आंकडे ताळेबंदाच्या डाव्या सदरांत कां व कित्येक आंकडे उजव्या सदरांत कां घालतात, ह्याचा उलगडा बऱ्याच जणांस लवकर होत नाहीं. मंडळी स्थापन करण्यासाठी केलेला प्राथमिक खर्च, हा जिंदगी व येणें ह्या सदरांत नमूद केलेला आढळतो. उभारलेल्या भांडवलांतून हा खर्च होतो; तथापि सुरवातीस तो येणें या सदराखाली दाखवून, हळु हळु तो कमी करीत आणण्याची सर्वमान्य पद्धति आहे. मंडळी स्थापन झाल्यानंतर चार-पांच वर्षांतहि हा प्राथमिक खर्च ताळेबंदांतून नाहींसा झाला नाहीं, तर त्याबद्दल विशेष चौकशी करणें जरूर आहे.

## मंडळयांचें भांडवल

मंडळीच्या भांडवलाचा ' देणें ' ह्या सदरांत समावेश केला जातो. मंडळी ह्या स्वतंत्र व्यक्तीनें भागीदारांकडून भांडवल घेतलेलें असतें, अशी

कल्पना करून तिचा योगक्षेम कसा चालतो हें स्पष्टपणें दिसावें हा त्यांत हेतु असतो. इतर देणीं व कर्जें आणि भरणा झालेलें भांडवल ह्यांत फरक इतकाच कीं, मंडळी लिक्विडेशनमध्यें जाऊन तिचीं इतर सर्व देणीं भागल्याखेरीज भागीदारांचा, त्यांच्या गुंतविलेल्या भांडवलावर हक्क लागू होत नाहीं. वेगवेगळे रिझर्व व गंगाजळी रकमा ह्यांचा अंतर्भावहि देणें ह्या सदरांतच कां केला जातो, ह्याचा उलगडा सहज होईल. मंडळीस झालेल्या नफ्याचा कांहीं भाग गंगाजळींत ठेवण्यांत येतो, व हा न वांटलेला नफा एका दृष्टीनें मंडळीचें देणें लागतो. वेगवेगळया कारणांसाठी निर्माण केलेले रिझर्व फंड स्वतंत्र दाखविले असतां भागीदारांस उमज चांगली पडते; त्या सर्वांची गोळाबेरीज करून मांडल्यामुळें त्याचा अर्थबोध नीट होत नाहीं. कित्येक मंडळया बँकांकडून तात्पुरतीं अल्पमुदतीचीं कर्जें घेत असतात. इतर स्वरूपानें कर्ज उभारण्यापेक्षां बँकेकडून, तिला आपली मालमत्ता तारण लावून तें घेणें सोईचें व स्वस्त पडतें. तथापि, बाजारांत कर्ज मिळण्याजोगी आपली पत नाहीं, ह्या भीतीनें जर मंडळया अशा मार्गाचा अवलंब करूं लागल्या, तर तें दृष्टोपत्तीस येणें जरूर आहे. कित्येक ताळेबंदांत घसाऱ्याची तजवीज केलेली आढळते. घसाऱ्याबद्दल दाखविलेली रकम ही स्वतंत्रपणें रोख ठेवलेली नसते. कारखान्यांतील यंत्रांची झीज किंवा इतर मालमत्तेची झालेली खराबी ह्यांमुळें जिंदगीची किंमत कमी होते. ( १ ) मालमत्तेच्या किंमतींतून ती वजा करणें, किंवा ( २ ) मालमत्तेची पूर्वींची किंमत कायम राखून, देणें या सदरांत झिजेची अंदाजी किंमत दर्शविणें, ह्यांपैकीं कोणत्याहि एका मार्गाचा अवलंब करून ताळेबंदांत मंडळीच्या मालमत्तेची, हिशेबाचे दिवशींची परिस्थिति दर्शविली जाते.

## घसारा आणि निधि

मंडळीचें, यंत्रें व इमारती ह्यांत गुंतलेलें भांडवल हळुहळु झिजत असतें; तो नाश भरून काढण्यासाठी योग्य ती तरतूद केल्याखेरीज डिव्हिडंड वांटणें उचित होणार नाहीं. ह्याकरितां डिव्हिडंड वांटण्यापूर्वीं, दरवर्षी निरनिराळया रिझर्व फंडांत पुरेशा रकमा टाकल्या पाहिजेत. भागीदारांस तात्पुरतें खुष करण्यासाठी भांडवलांतून डिव्हिडंड वांटणें ही त्यांच्या अहिताची गोष्ट आहे. कित्येक मंडळया अडचणीचे वेळीं उपयोग व्हावा म्हणून विशेष तरतूद करतात व जिंदगीची किंमत मुद्दाम कमी दाखवतात किंवा अनिश्चित

येणीं फुगवून दाखवून तीं वसूल न झाल्यास तरतूद म्हणून मोठाल्या रकमा राखून ठेवतात. कायम स्वरूपाचा खर्च चालू खर्च म्हणून नफा–तोटा पत्रकांत ओढणें हाहि असला 'गुप्त' रिझर्व्ह निर्माण करण्याचा एक मार्ग आहे. ओढघस्त मंडळयांची पद्धति ह्याचे अगदीं उलट असते, हें सांगावयास नको.

### जिंदगी

जिंदगीचे खालील चार प्रमुख प्रकार होत. ( १ ) रोख रकमा, बँकांतील ठेवी व इतर सहज उभ्या करतां येतील अशा रकमा. ( २ ) रोख रकमांत ज्यांचें रूपांतर अल्पायासें करतां येतील अशा बाबी. उदाहरणार्थ, शिलकी माल, वसूल होण्याचीं बिलें, व्यापाऱ्यांकडील येणीं, चालू काम, इ० ( ३ ) जमीन, इमारती, यंत्रें इ० कायम स्वरूपाची जिंदगी. हिच्या सहाय्यावांचून उत्पादन होऊं शकत नाहीं. ( ४ ) ज्यांची विक्री करतां येणार नाहीं व ज्यांपासून नडीचे वेळीं रकम उभी होणें अशक्य आहे, अशा अदृश्य बाबी. उ० 'गुडविल' किंवा पत, पेटंटचा मालकी हक्क, ट्रेडमार्क इ०. वरील यादींत उतरत्या महत्त्वाच्या प्रतीनें जिंदगीचे प्रकार वर्णिले आहेत.

कायम स्वरूपाच्या मालमत्तेंत जेवढें कमी भांडवल गुंतलेलें असेल, तितकी मंडळीची आर्थिक सुरक्षितता ज्यास्त; त्याचप्रमाणें, मालमत्तेच्या अदृश्य बाबींची किंमत ताळेबंदांत न दाखविलेली चांगली. इमारती किंवा यंत्रें ह्यांची खरी किंमत अजमावणें हें अत्यंत कठिण काम आहे. तेव्हां, ताळेबंदांत त्यांची किंमत जरी रुपये, आणे व पै यांत दिलेली असली, तरी ती व्यावहारिक दृष्टीनें पहातां तशीच हातीं येण्यासारखी आहे, असें कोणी समजूं नये.

खाली ताळेबंदाचे दोन नमुने दिलेले आहेत. पहिला ताळेबंद एका सुस्थितींत असलेल्या, औद्योगिक मंडळीचा असून सुव्यवस्थितपणें व तपशीलवर मांडलेला आहे व दुसरा, ताळेबंद कसा असूं नये, ह्याचा नमुना आहे. मंडळीची सांपत्तिक स्थिति चांगली आणि कारभार चोख असल्यास, ताळेबंदांत तपशीलवार माहिती, आडपदा न ठेवतां देण्यास तिच्या डायरेक्टरांस कांहींच अडचण भासत नाहीं. ज्या मंडळीची सांपत्तिक स्थिति वाईट आणि कारभार ढिला असेल, तिचे हिशेब आणि ताळेबंद लटपटीचे असतात. पण तिची सुधारणा व्हावयाची असल्यास वैगुण्यें न झांकतां ताळेबंद स्पष्ट वस्तुस्थितीचा निदर्शक असा करणेंच शहाणपणाचें असतें. खाली दिलेल्या दोन ताळेबंदांकडे ह्या तुलनात्मक दृष्टींनीं वाचकांनीं पहावें.

# नमुना १

## सुव्यवस्थित जिंदगी–कर्जपत्रक

### येणें

| | रु. | रु. |
|---|---|---|
| कारखानाः (अ, ब आणि कंपनीनें केलेल्या हिशेबाप्रमाणें किंमत ) | ४,००,००० | |
| वजा घसारा | ५,००० | ३,९५,००० |
| यंत्रेंः | १,८०,००० | |
| वजा घसारा | १२,००० | १,६८,००० |
| शिलकी मालः (मंडळीच्या अधिकाऱ्यांच्या मोजणीचें सर्टिफिकेट असलेला ) | | १,००,००० |
| किरकोळ येणींः | १,५०,००० | |
| वजा | -- | १,५०,००० |
| गुडविलः खरेदीची किंमत | १,००,००० | |
| वजा–आजपर्यंत उणे केलेले | ९०,००० | १०,००० |
| गुंतविलेल्या रकमाः रिझर्व फंड अकौंट ( खरेदीची किंमत ) | १,००,००० | १,००,००० |
| ( ताळेबंदाचे तारखेस ह्यांची बाजार–भावानें किंमत १,२०,००० रु० भरते ). | | |
| रोख व बँकेचे खात्यांत शिल्लकः | | ४६,५०० |
| | | ९,६९,५०० |

### देणें

| | रु. | रु. |
|---|---|---|
| भांडवल— | | |
| अधिकृतः | | |
| प्रत्येकीं १ रुपयाचे ६,००,००० ऑर्डिनरी भाग | ६,००,००० | |
| खपलेलें व वसूलः प्रत्येकीं १ रुपयाचे ५,००,००० ऑर्डिनरी भाग | | ५,००,००० |
| गहाणावर उभारलेले डिबेंचर्सः | | |
| १०० रुपयांचें एक याप्रमाणें २,००० डिबेंचर्स | २,००,००० | |
| त्यावरील व्याज देणें तें | २,५०० | २,०२,५०० |
| किरकोळ देणींः | | ७९,००० |
| बिलें देणेंः | | ३,००० |
| गंगाजळीः | | १,२०,००० |
| नफा–तोटा पत्रकावरूनः मागील बाकी | १५,००० | |
| चालू वर्षाचा नफा | ५०,००० | ६५,००० |
| | | ,६९५०९,० |

## ताळेबंदाचे दोन नमुने

पहिल्या ताळेबंदांत कारखान्याची किंमत स्वतंत्र तज्ज्ञांकडून करविण्यांत आलेली आहे, ह्यामुळें भागीदारांस त्याबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं. शिलकी माल हा खरोखरच मोजण्यांत आलेला आहे. किरकोळ येणीं ह्या सदराखाली डायरेक्टरांकडून रकमा येणें असतील, तर त्या स्वतंत्र दाखविणें जरूर असतें. 'गुडविल'बद्दल कित्येक मंडळ्या मोठमोठ्या रकमा येणें ह्या सदरांत दर्शवितात. वरील ताळेबंदांत, ही रकम क्रमाक्रमानें कशी कमी करण्यांत येत आहे, हें स्पष्ट दिसून येतें. गुंतविलेल्या रकमा ह्या सदरांत, ताळेबंदाचे तारखेस त्या रकमांची किंमत २० हजारांनीं ज्यास्त भरत असूनहि, रोख्यांची खरेदीची किंमत दर्शविली आहे, ह्यामुळें ताळेबंदास मजबुती आली आहे.

देणें ह्या सदरांतहि दोष काढण्यास जागा नाहीं. माफक दरानें काढलेल्या डिबेंचर्समुळें कारखान्यास स्वस्त भांडवलाचा पुरवठा चांगला होत आहे, हें उघड आहे. मंडळीची जिंदगी डिबेंचर्सच्या एकूण रकमेपेक्षां कितीतरी जास्त आहे. तिची गंगाजळी उत्तम तऱ्हेनें बाजारांत विकतां येण्यांजोग्या रोख्यांत गुंतविण्यांत आलेली आहे. ती केवळ कागदी ठेव नाहीं, हें ताळेबंदावरून स्पष्ट होत आहे. एकंदरीनें, हा ताळेबंद मंडळी सुस्थितींत असून फायदाहि पुरेसा मिळवीत आहे, असें दर्शवितो, आणि ह्या अनुमानास भरभक्कम आधार त्यांत निश्चितपणें सांपडतो.

दुसऱ्या ताळेबंदांत गुडविलची खरेदीची किंमत दर्शविली आहे व ती मंडळीच्या एकंदर परिस्थितीच्या मानानें भारी दिसते. कारखाना व यंत्रें ह्यांची किंमत कमी तर करून लिहिलेली नाहींच, परंतु ती वाढवून लिहिल्यासारखी दिसते. नवीन सुधारणांमुळें खरोखरच जिंदगींत वाढ झाली, का त्या केवळ दुरुस्तीवजा होत्या, हें स्पष्ट केलेलें नाहीं. शिलकी मालाची किंमत कशी मोजण्यांत आली, हें समजण्यास मार्ग नाहीं. गुंतविलेल्या रकमांपैकीं रोख्यांचे खरेदीसाठीं किती खर्ची पडल्या हें समजत नाहीं व इतर मंडळ्यांच्या भागांची खरेदी करण्याचा हेतु काय ह्याचाहि अंदाज करतां येत नाहीं.

# नमुना २

## सदोष जिंदगी-कर्जपत्रक

### येणें

| | | |
|---|---|---|
| गुडविलः खरेदीची किंमत | – | ६०,००० |
| कारखाना व यंत्रें: | १,२०,००० | |
| नवीन सुधारणा | ५,००० | १,२५,००० |
| शिलकी मालः | | २०,००० |
| किरकोळ येणींः | | ३५,००० |
| गुंतविलेल्या रकमाः ( ह्यांत मंडळीनें इतर मंडळ्यांच्या भागांत गुंतविलेल्या रकमांचा समावेश होतो ) | | ३३,००० |
| रोख व बँकेंत शिल्लकः | | ५,००० |
| | | २,७८,००० |

### देणें.

| | | |
|---|---|---|
| भांडवल— | | |
| अधिकृतः | | |
| प्रत्येकीं १ रुपयाचे, २,००,००० ऑर्डिनरी भाग | | |
| खपलेले व वसूलः | | |
| प्रत्येकीं १ रुपयाचे २,००,०० ऑर्डिनरी भाग | – | २,००,००० |
| किरकोळ देणींः | – | ३०,००० |
| गंगाजळीः | – | १७,००० |
| बँकेकडून कर्जः ( गुंतविलेल्या रकमा व कारखाना ह्यांच्या तारणावर ) | – | २८,००० |
| नफा–तोटा पत्रकावरूनः मागील बाकी | १,००० | |
| चालू वर्षाचा नफा | २,००० | |
| | ३,००० | ३,००० |
| | | २,७८,००० |

गुंतविलेल्या सर्व रकमा व कारखाना हीं सर्व बँकेकडे गहाण आहेत, हें देणें या सदरावरून समजेल. बँकेनें फक्त २८,००० रुपये कर्जाऊ दिले आहेत, परंतु गुंतविलेल्या ३३,००० रुपयांचें तारण तिला पुरेसें न वाटून, कारखानाहि गहाण टाकण्याची मंडळीस पाळी आली आहे. १७,००० रुपये गंगाजळींत दर्शविले आहेत, परंतु पहिल्या ताळेबंदांतील हिशेबांत ते जसे स्वतंत्रपणें गुंतविले असल्याचें दिसतें, तसें येथें केलेलें नाहीं. या ताळेबंदांत घसाऱ्यासाठी स्वतंत्र रिझर्व तर ठेवलेले नाहींतच; परंतु गंगाजळी म्हणून दाखविलेली रकम सर्व तऱ्हेच्या रिझर्वची गोळाबेरीज असून देखील नुसती झीज व घसारा भरून काढण्यासहि ती पुरी पडेल अशी खात्री वाटत नाहीं. कसें बसें करून, ओढून ताणून, मंडळीनें नफा दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे. उघड बाजारांत लोकांकडून कर्ज न घेतां बँकेकडून भक्कम तारणावर तें उभारावें लागलें, हें मंडळीच्या दुःस्थितीचें निदर्शक आहे. मंडळीची वास्तविक स्थिति असमाधानकारक असल्याचें वरील स्पष्टीकरणावरून ध्यानांत येईल, परंतु सकृत् दर्शनीं ही गोष्ट स्पष्ट कळून येत नाहीं, ही ह्या ताळेबंदांतील गोम आहे.

वरील दोन ताळेबंद हे केवळ नमुन्यादाखल दिलेले आहेत. मंडळ्यांच्या कार्याच्या स्वरूपाप्रमाणें ताळेबंदांत थोडाफार फरक पडला, तरी रकमा गुंतविणाऱ्या लोकांनीं तो कसा निरखून पहावा, हें वरील विवेचनावरून सामान्येंकरून समजून येईल. मंडळ्यांची परिस्थिति ओळखण्याचें ताळेबंद हें एक उत्तम गमक आहे; तथापि त्याचा नीट बोध होणें हें कठिण परंतु आवश्यक आहे. मंडळीच्या सबंध व्यवहारांचा त्यांत सारांश एकवटलेला असतो.

## हिशेबतपासनीस

मंडळ्यांच्या हिशेबाची तपासणी योग्य तऱ्हेनें व्हावी, व ती तशी झाली आहे, अशी भागीदारांची खात्री होऊन त्यावर लोकांचा विश्वास बसावा, ह्यासाठी कायद्यानें विशेष योजना केलेली आहे. भागीदारांनीं स्वतः हिशेब तपासावयाचें म्हटलें तरी तें शक्य होणार नाहीं. हिशेब ठेवण्याची पद्धतहि समजण्याची जेथें मारामार, तेथें त्यांतील दोष लक्ष्यांत येण्याचें नांव नको. हिशेबाची तपासणी करणें हें खरोखर तज्ज्ञांचें काम आहे व अशा तज्ज्ञांकडूनच मंडळ्यांचे हिशेब तपासले जावेत अशी कंपनी-

कायद्यामध्यें तजवीज करण्यांत आलेली आहे. धंदेवाईक व तज्ज्ञ अशा हिशेब-तपासनिसांनींच हिशेबतपासणी करावी ह्या हेतूनें, मंडळ्यांचे हिशेब तपासण्या-साठीं प्रांतिक सरकारचा दाखला ज्याचेजवळ असेल, अशा इसमासच हा अधिकार असावा, अशी कायद्याची योजना आहे; व ह्यासाठीं प्रत्येक वार्षिक साधारण सभेंत एका वर्षापुरती अशा हिशेबतपासनिसाची नेमणूक केली जाते. मंडळीचें दप्तर व हिशेब केव्हांहि पहाण्याचा हिशेबतपास-निसास अधिकार असतो. त्यास जरूर ती माहिती सढळपणानें पुरवण्यांत आली किंवा नाहीं, ताळेबंद हा कायद्यांत दाखल असलेल्या नमुन्याबर-हुकुम आहे किंवा नाहीं व मंडळीच्या खऱ्या परिस्थितीचें प्रतिबिंब ताळे-बंदांत पडलेलें दिसून येतें कीं नाहीं ह्या सर्व बाबींचा हिशेबतपासनिसाचे अहवालांत उल्लेख यावा लागतो.

## त्याचीं कर्तव्यें

हिशेबतपासनिसांनीं हिशेब तपासण्यापूर्वीं आपल्या कामाविषयीं कंपनी-कायदा व मंडळीचीं आर्टिकल्स् ह्यांमध्यें कोणत्या गोष्टी नमूद केलेल्या आहेत, ह्यासंबंधानें चौकशी करणें जरूर आहे. कित्येक वेळां मंडळ्यांचीं आर्टिकल्स् हिशेबतपासनिसांवर कांहीं विशेष कामाची जबाबदारी टाकतात; त्याची माहिती करून न घेतां हिशेब तपासले गेले तर त्याबद्दल हिशेब-तपासनिसास जाब द्यावा लागेल व गैरमाहितीची सबब चालणार नाहीं. हिशेबतपासनिसानें मंडळीच्या कारभारासंबंधानें सल्ला देण्याचें कारण नाहीं; त्यानें हिशेबतपासणीचे दिवशीं दिसून येणाऱ्या मंडळीच्या परिस्थिती-बद्दल वस्तुस्थितिनिदर्शक अहवाल सादर केला म्हणजे त्याचें काम संपलें. त्यानें काळजीपूर्वक व बारकाईनें चौकशी करणें आवश्यक असलें तरी त्याचा रिपोर्ट म्हणजे मंडळीच्या सुस्थितीचा किंवा तिच्या दप्तराच्या व हिशेबाच्या खरेपणाचा दाखला नव्हे. अर्थात् त्यानें सचोटीनें आपलें काम केलें पाहिजे. मंडळीच्या नोकरांनीं कट करून पैशाची अफरातफर केली, परंतु हिशेब-तपासनिसास त्याबद्दल शंकाहि येऊं नये, अशी खबरदारी घेतली व विशे-षतः मंडळीच्या जुन्या व विश्वासू नोकरांनीं गफलत करून डायरेक्टरांस त्याचा वासहि येऊं दिला नाहीं तर त्याबद्दल हिशेबतपासनिसास जबाबदार धरतां येणार नाहीं.

हिशेबतपासनिसांचीं कर्तव्यें सर्वसाधारणपणें निश्चित असलीं तरी त्यांच्या कामाच्या कक्षेंत कोणत्या महत्त्वाच्या गोष्टी येतात व कोणत्या

येत नाहींत, हें प्रत्येक इसमाच्या, स्वतःच्या जबाबदारीच्या कल्पनेवर अवलंबून रहातें. भागीदारांच्या हितसंबंधाचें संरक्षण व्हावें, हा त्यांची नेमणूक करण्यांत प्रधान हेतु असतो; तेव्हां, जरी कित्येक गोष्टी करण्यास तो बांधलेला नसला, तरी चाणाक्षपणानें सूचना देऊन तो सुधारणा घडवून आणूं शकतो. हिशेब ठेवण्याची पद्धत, मूल्यमापनांत गृहीत धरलेले अंदाज इत्यादि बाबींच्या तपशिलांत त्याच्या सल्लामसलतीचा परिणाम होणें गैरवाजवी नाहीं. तथापि, हें करतांना त्यानें अत्यंत हुषारीनें वागणें जरूर आहे. हिशेबतपासनिसानें ताळेबंदासंबंधीं दिलेलें सर्टिफिकेट, हें भागीदारांचे दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें असतें. मोजक्या शब्दांत कित्येक वेळां पुष्कळ अर्थ भरलेला असतो; सबब ह्या सर्टिफिकेटाची काळजीपूर्वक छाननी केली पाहिजे.

---

# प्रकरण पांचवें

## रोखे-बाजार

### रोखे आणि भाग यांची खरेदी-विक्री

आतांपर्यंत, निश्चित व्याज देणारे रोखे व अनिश्चित डिव्हिडंड देणारे मंडळयांचे भाग, ह्यांचें वर्णन झालें. त्याचप्रमाणें, मंडळयांच्या कारभाराची माहिती करून देण्यांत आली असून ताळेबंदावरून त्यांची आर्थिक परिस्थिति कशी ओळखावी, ह्याचेंहि दिग्दर्शन गेल्या प्रकरणांत करण्यांत आलें आहे. रोख्यांत रकमा गुंतविणारांनीं कोणत्या गोष्टी लक्ष्यांत ठेवाव्या, यासंबंधींहि योग्य स्थळीं आम्हीं विवेचन केलें आहे. आतां सहाजिकच असा प्रश्न उपस्थित होतो, कीं या रोख्यांची खरेदी-विक्री होते तरी कोठें व ती कशी करण्यांत येते? वर्तमानपत्रांतील रकानेच्या रकाने या रोख्यांच्या बाजारभावानें अडलेले दिसतात, परंतु त्यांचें विक्रीचें ठिकाण कोणतें? एखाद्यास रोखे किंवा भाग विकावयाचे किंवा विकत घ्यावयाचे असले, तर त्यानें काय करावें? इतर वस्तु जशा बाजारांत अगर मंडईत विकत मिळतात, तसे रोखे मिळतात का? प्रस्तुत प्रकरणांत ह्या सर्व प्रश्नांचीं सविस्तर उत्तरें देण्यांत आलीं आहेत. रोखे म्हणजे वचनचिठ्या किंवा हक्क नमूद करणारीं पत्रकें होत. सरकारी कर्जरोख्यांत, रोखेदाराचा ठराविक मुदलावरील व वार्षिक व्याजावरील हक्क नमूद केलेला असतो; तर मंडळयांचे भाग भागीदाराच्या, मंडळींतील जिंदगीच्या हिश्शाचें प्रमाण नमूद करतात. ह्या दोन्ही प्रकारच्या पत्रकांची जेव्हां खरेदी-विक्री होते तेव्हां त्या पत्रकांत नमूद असलेल्या हक्कांच्या मालकीची अदलाबदल होत असते.

प्रत्येक मंडळीचे दप्तरांत तिच्या भागीदारांची यादी ठेवलेली असते व तीमध्यें भागीदारांचीं नांवें, पत्ते इत्यादि माहिती व भागांसंबंधीं तपशील लिहिलेला असतो. भागांचे मालकींत फरक झाल्यास, भाग ज्याचे नांवें वर्ग होतात, त्यानें दप्तरांतील यादींत दुरुस्ती करून घेणें आवश्यक असतें; परंतु त्यानें तसें न केल्यास, भाग वर्ग करणारास ही दुरुस्ती करून

घेण्याचा हक्क असतो. इतर जिनसांप्रमाणें भागांची अदलाबदल व देवघेव करणें सोपें नसतें; कांहीं ठराविक गोष्टींची पूर्तता झाल्याखेरीज मंडळीच्या दृष्टीनें, मालकी हक्कांची कायदेशीर देवघेव होत नाहीं. अर्थातच, हीं सर्व तंत्रें संभाळून गिऱ्हाइकांची सोय पहाणारे मध्यस्थ उपस्थित होतात व ते खरेदी-विक्रीच्या बाजारांत दलाली करतात. सरकारी कर्जरोखे धारण करणारांच्या नांवांची नोंद सरकारी दप्तरांत नसते; तिजोऱ्यांचे मार्फत व्याज द्यावयाचें असल्यानें त्याप्रमाणें कर्जरोख्यांचे नंबर टिपलेले असतात. ह्या रोख्यांची देवघेव, चेकप्रमाणें, केवळ सहीनें होऊं शकते. मंडळ्यांचे भागांप्रमाणें या रोख्यांचीं तंत्रें फारशीं नसतात.

## हे व्यवहार कां होतात ?

पैसे गुंतविणारे लोक, रोखे व भाग विकत घेतात हें खरें; परंतु त्या रोख्यांची व भागांची मोठ्या प्रमाणावर उलाढाल व देवघेव कां होते ? रोजच्या व्यवहारांत लागणारे खाद्यपेयांसारखे पदार्थ किंवा कपडेलत्ते, ह्यांची खरेदी-विक्री व्हावी, हें सरळ दिसतें. कारण हे जिन्नस टिकणारे नसतात व ते संपले किंवा खराब अथवा निरुपयोगी झाले असतां नवे घ्यावे लागतात. एखाद्या मंडळीनें नव्यानेंच भाग विक्रीस काढले किंवा सरकारनें नवें कर्ज उभारलें, तर त्यास मागणी येईल, हें उघड आहे. त्याचप्रमाणें, कांहीं लोकांचीं बचत वाढून, त्यांस रोखे किंवा भाग खरेदी करावेसे वाटतील, किंवा कित्येकांस पैशाची निकड लागून ते आपले रोखे व भाग विकतील, यांत नवल नाहीं. आपण एखादें घर बांधलें, तर त्याचा कंटाळा येऊन तें विकून टाकीत नाहीं किंवा कर्ज काढून नवें बांधीत नाहीं; एखाद्या घरांत पैसे गुंतविले, म्हणजे तें घर विकणें कमीपणाचें वाटतें. तद्वतच, एकदा रोखे घेतले, कीं त्यांची परतफेडीची मुदत येईपर्यंत त्यांस धक्का लावावयाचा नाहीं, त्यावरील व्याज तेवढें गोळा करीत रहावयाचें, अशी कित्येकांची समाधानवृत्ति असते. परंतु, त्यांत कमाई अल्प असते. रोखे व भाग यांवर मिळणारें व्याज व डिव्हिडंड, ह्यांत संतुष्ट रहाणें कित्येकांस आवडत व पटत नाहीं. खरे व्यवहारी लोक त्यांची एकसारखी खरेदी-विक्री करीत असतात. आपल्या रोख्यांचा भाव चढला, व तो त्यापुढें उतरेल असें वाटलें, कीं ते रोखे विकून टाकून पुनः तेच कमी भावानें विकत घ्यावयाचे, असा हा व्यवहार असतो. त्याचप्रमाणें, रोख्यांचा भाव पडीचा असेल, तर भाव पडेपर्यंत वाट पहावयाची, व यापेक्षां खाली

भाव जाणार नाहीं, असें दिसतांच ते खरेदी करावयाचे व वाढलेल्या भावानें विकून नफा मिळवावयाचा, अशा रीतीनें रोख्यांची व भागांची एकसारखी खरेदी-विक्री चालू असते. ते विकत घेऊन व आपल्याजवळ बाळगून त्यांवरील व्याज मिळवावें, असा खरेदींत हेतुच नसतो. अशा पद्धतीनें व्यवहार करणारे अनेक लोक असतात व त्यांच्या मागणी-पुरवठ्याच्या अनुरोधानें भाव हेलकावे खात असतात. रोखे व भाग ह्यांच्या ह्या उलाढाली-मुळें त्यांचा एक बाजार बनतो.

## स्टॉक एक्सचेंज म्हणजे काय ?

सरकारी कर्जरोखे हा रोख्यांचा एक ढोबळ प्रकार आहे. हे रोखे वेगवेगळ्या व्याजाच्या दरांचे व परतफेडीच्या मुदतींचे असतात. रकम गुंतविणारास त्याचे पसंतीचा रोखा मिळण्यास रोख्यांच्या बाजारामुळें सोईचें पडतें. मंडळ्यांचे प्रकार कितीतरी विविध व त्यांच्या भागांवरील डिव्हिडंडचा दर तर नेहमींच अनिश्चित. कांहीं भाग आर्डिनरी तर कांहीं भागांवर डिव्हिडंड अग्रहक्कानें मिळणार. अशा विविध प्रकारच्या रोख्यांची व भागांची विक्री व खरेदी करणारें लोक एकत्र येऊन सौदे करतात. हे धंदेवाले आणि त्यांचे व्यवहार ह्यांच्या समुच्चयालाच ‘ स्टॉक एक्सचेंज ’ असें म्हणतात. ज्याप्रमाणें वेगवेगळ्या तऱ्हेचा कडबा विकण्यासाठी गाडीतळावर येतो व त्याचा भाव कडब्याची पेंडी केवढी मोठी आहे व ती पालेदार आहे किंवा नाहीं, यावर अवलंबून राहतो, त्याप्रमाणेंच या एक्सचेंजमध्यें होतें. गाडीतळावरील दलालांप्रमाणेंच येथें दलाल असतात. दोहोंमध्यें फरक एवढाच असतो कीं, दलालाचे मध्यस्थीखेरीज, खाजगी रीतीनें, कडब्याची गाडी खरेदी करतां येणें अशक्य नसतें, परंतु स्टॉक एक्सचेंजमध्यें व्यवहार करतांना दलाल हा अवश्यमेव लागतोच. अधिकृत इसमांखेरीज इतरांना ह्या बाजारांत खरेदी-विक्री करण्याचा अधिकार नाहीं. या सर्वांचें वर्णन खाली येईलच.

## एक्सचेंजचा देखावा

मोठ्या प्रमाणावर पैशांचा व्यवहार करणाऱ्या बँका अगर विमा-कंपन्या यांच्या टोलेजंग इमारती ज्याप्रमाणें लोकांच्या परिचयाच्या असतात, त्याप्रमाणें रोख्यांचे बाजारास जनतेच्या दृष्टीनें दर्शनी महत्त्व प्राप्त होत नाहीं. परंतु त्यांत उलाढाली मात्र प्रचंड स्वरूपाच्या होत असतात. स्टॉक एक्सचेंजमध्यें एखाद्या नवख्या माणसानें प्रवेश केला असतां तेथील

जनसंमर्द व गडबड पाहून त्या स्थलाचें बाजार हें नांव सार्थ आहे, अशी त्याची खात्री पटते. ह्या गजबजलेल्या बाजारांत चाललेल्या गिल्लयाचा, त्या व्यवहाराशीं अपरिचित असलेल्या माणसास कांहींच अर्थबोध होत नाहीं. तथापि, या गलबल्यांतूनहि थोड्या सरावानें तेथील भाषा समजूं लागते. एक्सचेंजच्या आवारांतील गर्दी एके ठिकाणीं केंद्रीभूत झालेली नसते; वेगवेगळे गट करून लोक उभे असतात. स्टॉक एक्सचेंज हा जरी रोख्यांचा बाजार असला, तरी त्यांतील भिन्न भिन्न प्रकारांच्या रोख्यांच्या खरेदी–विक्रीचे स्वतंत्र गट बनून, त्यांचे जणूं काय निरनिराळे बाजारच बनतात. मंडई हा भाजीबाजार असला तरी त्यांत भाज्यांच्या प्रकारांचे जसे गट पडतात, तसेंच येथेंही स्वतंत्र विभाग बनतात. सरकारी रोख्यांचा एक गट, विजेच्या कंपन्यांचा दुसरा, कापडाच्या गिरण्यांचा तिसरा, असे या बाजाराचे अनेक दुय्यम बाजार होतात. स्टॉक एक्सचेंजमध्यें काम करण्यास अधिकार असलेले ‘ जॉबर ’ हे जरी सर्व तऱ्हेच्या रोख्यांची व भागांची खरेदी-विक्री जमवून आणूं शकले, तरी साधारणपणें ठराविक जॉबर विशिष्ट जातीच्या रोख्यांचाच व्यवहार करीत असतात; त्यामुळें एका गटांतून दुसऱ्या गटांत अशी थोडी फार ये–जा होत असली, तरी प्रत्येकाचें स्वतंत्र अस्तित्व नाहींसें होत नाहीं.

## त्यांतील धंदेवाले

शेअर-बाजाराचा प्रचंड दिवाणखाना, दलाल व त्यांचे अधिकृत कारकून यांनीं नेहमीं गजबजलेला असतो. शेअर बाजर ही सरकारनें मान्यता दिलेली एक खाजगी संस्था असून, फक्त तिच्या सभासदांसच ह्या बाजारांत व्यवहार करतां येतो व सभासदांची संख्या नियमित असल्याकारणानें, वाटेल त्या इसमास वाटेल तेव्हां सभासदत्व प्राप्त होऊं शकत नाहीं. एखाद्या सभासदानें आपली जागा खाली करून अर्जदारास ती दिली, किंवा बाजाराच्या व्यवस्थापक मंडळाकडे एखादी रिकामी जागा पडून असली, तरच नवीन मनुष्यास प्रवेश मिळूं शकतो. अर्जदारांची जितकी संख्या मोठी, तितकी प्रवेशाची फी ज्यास्त. बाजारांत नफेबाजीस ऊत आला, कीं अर्थातच सभासदत्वाचें महत्त्व वाढतें व प्रवेश दुर्मिळ होतो. जितका बाजार मोठा, तितका सभासदांचा व्यवहारहि मोठ्या प्रमाणावर चालतो. न्यूयॉर्कच्या स्टॉक एक्सचेंजमध्यें रोज सुमारें २० लक्ष भागांची खरेदी-विक्री होते.

तेथील सभासदत्वाच्या कार्डाची किंमत एकदा १४ लाख रुपये, इतकी झाली होती! लंडन येथील एक्सचेंजमध्यें, तेथील सभासदांचे ब्रोकर व जॉबर, असे दोन वर्ग करण्यांत आले आहेत. ब्रोकर हा आपल्या गिऱ्हाइकांच्या ऑर्डरी गोळा करून त्यांची खरेदी-विक्री जमवून आणीत असतो, तर जॉबर हा बाजाराचे बाहेर कोणाशींहि संबंध ठेवीत नाहीं. त्याचे व्यवहार, इतर जॉबर व ब्रोकर यांचेबरोबरच फक्त चालतात.

## •ब्रोकर आणि जॉबर

मुंबईच्या नेटिव्ह शेअर अँड स्टॉक ब्रोकर्स असोसिएशनचे सभासदांनीं एकमेकांशीं व्यवहार करतांना, ते आपल्या गिऱ्हाइकांतर्फे करण्यास प्रत्यवाय नसतो. म्हणजे मुंबईचे जॉबर व लंडनचे जॉबर यांत फरक असा कीं, लंडन येथील जॉबरांस सर्व व्यवहार इतर जॉबर व ब्रोकर यांच्याशींच फक्त करतां येतात, परंतु मुंबईचे जॉबर खासगी गिऱ्हाइकांशीहि व्यवहार करतात. कित्येक ब्रोकरांच्या मोठमोठ्या भागीदाऱ्या असून, लोकांचे तर्फे त्यांचे व्यवहार चालत असतात. मुंबईस वरचेवर जाऊन शेअर बाजारांत व्यापार करणारे लोक आपण पहातों, त्यांतील कित्येकजण ब्रोकरचा किंवा सब-ब्रोकरचा म्हणजे ब्रोकराला गिऱ्हाइकें मिळवून देण्याचा धंदा करीत असतात. लोकांच्या भाग विकण्याच्या किंवा विकत घेण्याच्या ऑर्डरी गोळा करावयाच्या, त्यांच्या सूचनांस अनुसरून ठराविक किंमत येतांच खरेदी-विक्री करावयाची व मेहनतान्यादाखल आपलें कमिशन आकारावयाचें, असा हा धंदा असतो. सर्वसाधारण लोकांस बाजाराची परिस्थिति माहीत असणें शक्य नसतें व ते ब्रोकरच्या सल्ल्यावर अवलंबून राहतात. अशा तऱ्हेनें सल्ला-मसलत देणें हें ब्रोकरचें काम असून, गिऱ्हाइकांस योग्य ती माहिती पुरविण्यास त्याला जरी वेळ व पैसा खर्चावा लागला, तरी त्याची मेहनत वाया जात नाहीं व त्याला मिळणारें 'ब्रोकरेज' किंवा कमिशन यांत ह्या कामाच्या मोबदल्याचा समावेश असतोच. मुंबईच्या शेअर बाजारांत प्रत्येक व्यवहाराबद्दल किमान कमिशन एक रुपया पडतें. रेल्वेजच्या व संयुक्त भांडवलाच्या मंडळयांच्या डिबेंचर्सच्या देवघेवींवर स्टॉकच्या किंमतीवर अर्धा टक्का सामान्यपणें आकारण्यांत येतो. भागांच्या खरेदी-विक्रींत कमिशनची आकारणी, भागांची किंमत ठरेल त्यावर अवलंबून असते. प्रत्येक भागाबद्दल दहा रुपयांपर्यंत दोन आणे, दहा ते पंचवीस

रुपयांपर्यंत चार आणे, शंभर ते अडीचशे रुपयांपर्यंत १ रु. ४ आ., अशा रीतीनें भागांच्या बाजारभावांप्रमाणें दरांची आकारणी होते. भागांची किंमत २,००० ते ५,००० रुपये असेल, तर शतमानानें ¼ टक्के कमिशन पडतें व त्यांची किंमत ५,००० रुपयांचे वर असेल, तर कमिशनचा दर ⅛ टक्का असतो. मंडळ्यांच्या भागांचे बाजारभावावर ¼ टक्के इतकी स्टँप फी पडते.

## दलालांचा धंदा व त्यांतील मिळकत

रोखे व भाग ह्यांची खरेदी-विक्री जमवून देणारा ब्रोकर हा पुष्कळांच्या परिचयाचा असतो, परंतु ज्याचेमार्फत ब्रोकर हे व्यवहार घडवून आणतो त्या जॉबरची लोकांस माहिती असण्याचा सहसा संभव नसतो. जॉबरचें वर्णन करतांना, कांहीं जण त्यास व्यापारी असें संबोधतात व तें योग्य आहे. कारण, तो जे रोखे विकतो व खरीदतो, त्यांचेवर त्याची तत्त्वतः मालकी असते, आणि इतर व्यापाऱ्यांप्रमाणेंच खरेदीची व विक्रीची किंमत यांतील फरकावर तो व्यवहार करीत असतो. कांहीं लोक त्यास मध्यस्थ असें म्हणतात. दोन्हीं वर्णनें थोडींफार खरीं आहेत. प्रत्येक रोख्याची किंमत दोन आंकड्यांनीं दर्शवितां येते. ज्या दरानें जॉबर हा रोखे विकण्यास तयार असतो, त्यापेक्षां नेहेमींच त्याचा खरेदीचा दर कमी असतो. ह्या दोन दरांतील फरक, तो त्याचा नफा होय. विवक्षित रोख्यांस विशेष मागणी असून त्यांची देवघेव झपाट्यानें होत असली तर विक्री व खरेदी यांचे भावांत फारच अल्प तफावत रहाते. समजा, एका रोख्याची जॉबरनें ५० रु० ते ५१ रु० किंमत सांगितली. ह्याचा अर्थ, त्याचेजवळ ब्रोकर रोखा विकण्यासाठी गेला, तर त्यास फक्त ५० रुपयेच मिळतील, परंतु तो खरेदीदार असला, तर ५१ रुपयांचे खाली त्यास रोखा मिळणार नाहीं. जर या रोख्यांची उलाढाल मोठ्या प्रमाणार होत असेल, तर स्पर्धेमुळें तो ब्रोकर जॉबरकडून ५१ रुपयांहून कमी किंमतींत रोखा मिळवूं शकेल. समजा, त्यास ५० रु० ८ आ० किंमत पडली. अर्थात् रोखा जॉबरनें बाहेरून खरेदी करून आणल्याशिवाय तो सौदा पुरा होणार नाहीं, परंतु जॉबरला ५० रुपयांस हा रोखा उपलब्ध होणार नाहीं. ५० रु० ४ आ० इतकी त्यास किंमत पडली असें मानल्यास, जॉबरला फक्त ४ आणेच नफा उरतो. म्हणजे, जाहीर केलेल्या दरांपेक्षां फारच प्रतिकूल दरानें जॉबरला व्यवहार करणें भाग पडून त्याची मिळकत कमी होते.

## जॉबरची कामगिरी

आतां असा प्रश्न सहाजिकच उद्भवतो, कीं जॉबरला हा अल्पसा नफा तरी कां मिळावा? ब्रोकरच्या मार्फत काम भागणार नाहीं काय? यास उत्तर असें आहे कीं बाजारांत शेकडो जातींच्या रोख्यांचे व्यवहार होत असल्यानें ब्रोकरकडे लहान-मोठ्या रकमांच्या निरनिराळया रोख्यांचेसंबंधीं ऑर्डरी येणार; तेव्हां त्यास हे रोखे गोळा करून देणें फारच कठिण पडेल, यांत संशय नाहीं. सामान्यतः जॉबर हे ठराविक रोख्यांचीच खरेदी-विक्री करीत असतात; तेव्हां त्या नमुन्याच्या सर्व रोख्यांचे व्यवहार ते करूं शकतात. ब्रोकरनें निरनिराळया जॉबर्सना आपल्या मागण्या सांगितल्या, कीं काम होतें. अशा रीतीनें कामकाजास सुलभता प्राप्त झाल्याकारणानें देवघेवी सोइस्कर रीतीनें पार पडतात. दुसरें कारण असें, कीं लहान-सहान मंडळयांचे भाग बाजारांत नेहमीच येतात असें नाहीं. जॉबर्सना, त्यांच्या रोजच्या व्यवसायांत, असे फुटकळ रोखे उपलब्ध होतात व त्यांस गिऱ्हाइक मिळतें. अर्थातच, अशा रोख्यांच्या खरेदीच्या व विक्रीच्या किंमतींत चांगलीच तफावत पडते व जॉबरला नफाहि चांगला उरतो. गिऱ्हाइकांनीं मागणी केलेल्या रोख्यांची चौकशी करण्याचें, ब्रोरकला कारण नसतें. ठराविक किंमतींत मिळाले तर रोखे घ्या; ठराविक किंमत आली, तर ते विका, अशा अर्थाच्या सूचना ते गिऱ्हाइकांकडून घेत असतात. या सूचनांप्रमाणें रोखे मिळाले तर ठीक; त्यांचें कमिशन लागू झालें. जॉबर हा विशिष्ट रोख्यांचा तज्ज्ञ समजला जातो.

## करारांची पूर्तता

देण्याचे व घेण्याचे दर हे स्टॉक एक्सचेंजमधील गडबडीच्या व गोंधळाच्या गर्दींतच ठरले जातात व त्यांची नोंद जॉबरजवळ व ब्रोकरजवळ राहते. भावासाठी भांडण व गैरसमजूत झाल्याचीं उदाहरणें अपेक्षेपेक्षां फारच कमी आढळतात. एकदा सौदा ठरल्यानंतर योग्य त्या पुस्तकांत त्याची नोंद करणें इत्यादि कामें कारकुनांचीं असतात. कित्येक वकिलांचे कारकून ज्याप्रमाणें व्यवहारांत त्यांचे मालकांपेक्षांहि ज्यास्त हुषार असतात, त्याप्रमाणेंच शेअरबाजारांतील कारकून अत्यंत चाणाक्ष असे असतात व ते सर्व व्यवहार उत्कृष्टपणें पार पाडतात. जॉबरचा कारकून व ब्रोकरचा कारकून यांच्या हिशेबांची रुजवात झाली म्हणजे योग्य तीं कागदपत्रें

तयार करण्यास प्रारंभ होतो. रोखे दर्शनी असले म्हणजे त्यांची देवघेव होणें अत्यंत सोपें असतें. कारण, त्यांचे बाबतींत नांवें नोंदविणें, नांवांची अदलाबदल करून घेणें इत्यादि भानगडी उपस्थित होत नाहींत.

## एक उदाहरण

एका पेन्शनर मनुष्यास त्याच्या विमापॉलिसीचे २,००० रुपये रोख मिळाले असून, एखाद्या संयुक्त भांडवलाच्या मंडळीचे भाग खरेदी करून त्यांत ही रकम त्यास गुंतवावयाची आहे असें आपण समजूं. पाहिजे असलेले भाग त्याच्या हातांत पडेपर्यंत कोणकोणते विधी करावे लागतील हें पाहिलें, म्हणजे रोख्यांच्या खरेदी-विक्रीचें वर केलेलें वर्णन समजण्यास सोपें जाईल. रोख्यांच्या खरेदीचें काम ब्रोकरकडे सोंपविण्यांत आल्यावर, विशिष्ट रोख्यांचा व्यवहार करणाऱ्या जॉबरची गांठ घेऊन तो ब्रोकर त्याजवळ किंमतीची चौकशी करील व भाव पटल्यास तात्काळ सौदा पटविण्यांत येईल. ह्या व्यवहाराची नोंद जॉबर व ब्रोकर हे दोघेहि आपापल्या पुस्तकांत करतील व बाजाराच्या दप्तरांतहि त्याची नोंद व्हावी म्हणून व्यवस्था करण्यांत येईल. सबंध दिवसभर प्रत्येक रोख्याची किंमत एकच कायम रहात नाहीं; ती कमी-ज्यास्त होत असते. तेव्हां, तो रोखा कोणत्या वेळीं विकत घेतला असेल, यावर त्यास पडणारी किंमत अवलंबून राहील. १०० रुपयांचे रोख्याची किंमत एकाच दिवशीं ९८ होईल किंवा १०२ हि होईल; यापेक्षांहि मोठा चढउतार होणें अशक्य नसतें. गिऱ्हाइकांस ब्रोकर कोणता दर पटवून देतो, यावर सहाजिकच ब्रोकरची, त्याचे गिऱ्हाइकांवर पडणारी छाप अवलंबून रहाते. रोख्यांचा जो भाव ठरेल, त्याची रुजवात झाली, म्हणजे जॉबर व ब्रोकर ह्या दोघांचेहि पुस्तकांत त्या व्यवहाराची नोंद कायम केली जाते व दोघेहि स्वतःस काय प्राप्ति झाली, याचा हिशेब करतात. ब्रोकरला, याच प्रकरणांत वर सांगितल्याप्रमाणें, रोख्यांच्या भावावर कमिशन मिळत असतें; जॉबर हा एका तऱ्हेचा व्यापारी असल्यामुळें त्याची प्राप्ति नफा या सदराखाली येते.

## जॉबर व ब्रोकर ह्यांच्या व्यवहारांतील फरक

आपल्या गिऱ्हाइकांकरितां ब्रोकर एखादा रोखा पैदा करून देण्याचें कबूल करतो, तेव्हां तो रोखा त्याचेजवळ नसतो, ही गोष्ट गिऱ्हाइकांस माहीत असते. ब्रोकरनें केलेली खरेदी अगर विक्री ही त्याचे गिऱ्हाइकांचे

तर्फेनें होत असते. जॉबरची गोष्ट ह्याहून अगदी वेगळी असते. तो जेव्हां खरेदी-विक्रीचे व्यवहार करतो, तेव्हां रोखे घेण्यास अगर देण्यास तो स्वतः बांधलेला असतो. जॉबर हा व्यापारी असतो असें वर एके ठिकाणीं म्हटलें आहे, त्याचा तरी अर्थ हाच होय. ब्रोकरला विकलेला रोखा ठराविक वेळीं त्यास उपलब्ध करून देण्यासाठी जॉबरनें त्या वेळेपूर्वीच स्वतः तो खरेदून ठेवला पाहिजे, हें उघड आहे. प्रत्येक वेळीं सर्व तऱ्हेचे रोखे त्याचे स्वतःजवळ असणें शक्य नाहीं; तेव्हां, जरूर असलेला रोखा दुसऱ्या एखाद्या जॉबरजवळ मिळूं शकेल काय, याची चौकशी तो करूं लागतो. हाच रोखा एखाद्या ब्रोकरने कोणत्या तरी जॉबरला विकलेला असतो, व अशा जॉबरकडून गरजू जॉबर तो विकत घेऊन, त्याचा ब्रोकरशीं झालेला करार पार पाडूं शकतो. रोख्यांच्या खरेदीविक्रीचे करार ठरण्याची तारीख व रोख्यांची देवघेव करण्याची तारीख यांमध्यें नेहेमी कांहीं दिवसांची मुदत असते, व या मुदतींत रोखे वर्ग करण्यासाठीं जरूर ते विधी केले जातात. रजिस्टर्ड रोख्यांच्या मानानें दर्शनी रोख्यांची देवघेव फारच अनायासानें होऊं शकते; कारण, त्यांच्या व्यवहारांत रोखेच प्रत्यक्ष दिले अगर घेतले जातात.

## रोखीचे व वायद्याचे व्यवहार

शेअरबाजारामध्यें सर्वच व्यवहार रोखीनें होत नाहींत; महिन्यांतून ठराविक वेळां व ठराविक दिवशीं खरेदी–विक्रीच्या करारांप्रमाणें रोख्यांची देवघेव होते. जेव्हां रोखे विकणारा व विकत घेणारा ह्या दोघांचीहि इच्छा खरोखरच रोखे देण्याची किंवा ते घेण्याची असते, तेव्हां या सवलतीचा फायदा त्यांस मिळावा, ह्यांत वावगें कांहीं नाहीं. तथापि, अशा तऱ्हेनें सरळ व्यवहार करणारांची संख्या फारच अल्प असते. स्वतःजवळ आज पैसा नसतांना व विकत घेतलेला रोखा जवळ ठेऊन त्यावरील व्याज स्वतः घ्यावें अशी इच्छाहि नसतांना कित्येक लोक रोखे विकत घेतात. कराराप्रमाणें द्यावे लागणारे रोखे, ते विकणाराजवळ असतीलच असाहि संभव नसतो. म्हणजे, रोखा देणारा व घेणारा हे दोघेहि आपणांस रोखा द्यावा लागणार नाहीं, व घ्यावा लागणार नाहीं, ह्या भावनेनें व्यवहार करीत असतात, व ते पुरे पाडण्यास त्यांचेजवळ पुरेसा पैसा क्वचितच असतो. तर मग हा धंदा चालतो तरी कसा? समजा, एका कंपनीच्या भागाची आजची किंमत ५० रुपये आहे, परंतु कांहीं कारणांमुळें ती लवकरच चढेल, अशी

एखाद्याची अपेक्षा असल्यास तो आजच्या भावानें भाग घेऊन ठेवतो म्हणजे, वायद्याचे दिवशीं त्याबद्दल ठराविक रकम देण्यास तो स्वतःस बांधून घेतो; परंतु त्यापूर्वी भागांची किंमत चढली, कीं या वाढलेल्या भावानें त्यास ५० रुपयांहून जास्त रकमेस तोच भाग दुसरा करार करून, अन्य इसमास विकतां येईल. समजा, त्या भागाच्या विक्रीची किंमत ५२ रुपये ठरली. आतां वायद्याचे दिवशीं भागाच्या खरेदीबद्दल ५० रुपये द्यावे लागून ५२ रुपये विक्रीचे मिळतील; म्हणजे, ह्या व्यवहारांत २ रुपये नफा उरेल. तथापि, अपेक्षेप्रमाणें रोख्यांची किंमत वाढेलच, असें नाहीं. कित्येक वेळां खरेदीच्या किंमतीहूनहि ती कमी होईल. म्हणजे, ५० रुपयांस तो रोखा विकून नफा उरणार नाहीं. अशा परिस्थितींत, खरेदी केलेला रोखा विकावयाचा नसेल, तर दोन मार्ग मोकळे असतात. ( १ ) भागाची किंमत ( ५० रुपये ) देऊन टाकावी किंवा ( २ ) हा भाग स्वतः न घेतां, त्यास दुसरें गिऱ्हाईक पाहून देण्याविषयीं आपल्या ब्रोकरला सांगावें. स्टॉक एक्सचेंजच्या नियमांप्रमाणें प्रत्येक व्यवहार हा त्यांतील अटींप्रमाणें पार पडलाच पाहिजे. आपण जर स्वतः रोख्याची किंमत भरून त्याचा ताबा घेतला नाहीं, तर दुसऱ्याकरवीं तसें केलें तरी चालतें. फक्त, या कामाबद्दल जरूर तो मोबदला व किंमतींत पडेल तो फरक त्यास द्यावा लागेल. ह्या दुसऱ्याकडून ठराविक रकमेस वायद्यानें भाग परत विकत घेण्याविषयीं करार करण्यांत येतो व अशा रीतीनें एक वायदा टाळून, देणींघेणीं पुढें ढकलतां येतात. शेअर बाजारांत कारभार करणाऱ्या लोकांचे मनांत रोख्यांची खरेदी अगर विक्री ऐनजिनसी करण्याची इच्छा सहसा नसते, व एका मागून दुसरा ह्याप्रमाणें वायदे करीत जातां-जातां मिळेल त्या नफ्यावर अवलंबून रहाणारे अनेक लोक असतात.

### "बैल" "अस्वल" व "काळवीट"

रोख्यांची खरेदी अगर विक्री करणें ह्यास अशा रीतीनें धंद्याचें स्वरूप प्राप्त झालें, म्हणजे सहाजिकच त्यांत ज्यास्त गुंतागुंत निर्माण होते. ज्यांची खरेदी कमी भावानें झालेली असते, अशांची इच्छा रोख्यांचा भाव वाढावा अशी असते. नुसत्या इच्छेवरच कित्येक वेळां प्रकरण थांबत नाहीं; रोख्यांचा भाव वाढावा याकरितां मुद्दाम खटपटी करण्यांत आल्याचीं उदाहरणें वारंवार घडतात. विशिष्ट भावानें रोखे खरेदून, चढीच्या भावानें ते विकावे अशी ज्यांची इच्छा असते त्यांस ' बुल ' ( बैल ) असें म्हणतात. कांहीं लोक

स्वतःजवळ नसलेल्या रोख्यांची विक्री करतात. वास्तविक, ठराविक वेळीं रोखे उपलब्ध करून खरेदीदारास ते द्यावे लागतील, असें त्यांच्या स्वप्नांतहि नसतें. कांहीं कारणांमुळें या रोख्यांचा भाव उतरेल, अशी त्यांची अपेक्षा असते. या उतरलेल्या भावानें त्यांची खरेदी करावयाची, म्हणजे, विक्री व खरेदी ह्यांमधील जी तफावत, तो ह्यांचा नफा होय. स्वतःजवळ नसलेले रोखे विकून, 'सेटलमेंट' च्या ( वळण ) दिवसापूर्वी भाव उतरेल ही इच्छा करीत बसणारास 'बेअर.' ( अस्वल ) असें म्हणतात. स्टॉक एक्सचेंज-वरील 'बुल'ची सर्वसाधारण लोकांत जेवढी माहिती असते, तितकी 'बेअर'ची नसते, परंतु दोघेहि सारख्याच प्रमाणांत नफा मिळवूं शकतात. 'बुल' च्या अपेक्षेप्रमाणें त्यानें विकत घेतलेल्या रोख्यांची किंमत चढली नाहीं व फायदेशीर रीतीनें ते परत विकतां येणें अशक्य झालें, तर त्या रोख्यांच्या किंमतीची रकम देऊन टाकून व रोखे स्वतःच्या ताब्यांत घेऊन, कांहीं काळ त्यास थांबतां येतें. ह्या मुदतींत रोख्यांवरील व्याज मिळत असतेंच. 'बेअर' चें काम करण्यास जास्त धडाडी व बाजाराची पुरी माहिती पाहिजे, कारण 'बेअर' ला अपेक्षित हलक्या किंमतीनें रोखे मिळाले नाहींत, तर वायद्याच्या दिवशींची रोख्यांची रोख किंमत व त्या पुढील वायद्याची किंमत ह्यांतील फरक व रकमेवरील व्याज, हीं भरणें त्यास प्राप्त होतें व यामुळें त्याच्या नफ्याचा अंश, तो जितके दिवस वाट पहात बसेल, त्या मानानें कमी, कमी होत जातो. या उलट, 'बुल'ला त्याच्या रोख्यांवर व्याज मिळत जातें, हा ह्या दोन व्यवहारांतील फरक होय.

## आणखी एक प्राणी--काळवीट

एखादी नवीन कंपनी जेव्हां आपलें भांडवल विक्रीस काढते, तेव्हां कांहीं लोक आपणांस रोखे मिळावेत असा कंपनीकडे अर्ज करतात. त्यांची इच्छा, ते भाग स्वतःसाठी घेण्याची मुळींच नसते; चढीच्या भावानें ते विकतां येतील अशा अपेक्षेनें ते असले व्यवहार करतात. असा व्यवहार करणारांस 'स्टॅग' ( काळवीट ) असें म्हणतात. कित्येक वेळां, हे 'स्टॅग' भागांची ॲलॉटमेंट होण्यापूर्वींच ते इतरांना विकतात, व मंडळीच्या संचालकांनाच जास्त किंमत देऊन भाग विकत घेण्यास भाग पाडतात. 'बुल,' 'बेअर' व 'स्टॅग' हे रोखे बाजारांत सट्टेबाजी करणारांचे तीन

प्रकार होत. वळणाचे दिवशीं, म्हणजे रोख्यांच्या देवघेवी ज्या दिवशीं पार पडाव्या लागतात, त्या दिवशीं किंमतींतील फरकाइतकी रकम व वाढावा देऊन वायदा तसाच पुढें चालू ठेवण्याच्या सोईचा उपयोग ह्या सट्टे-वाल्यांस नेहमी होत असतो. आकस्मिक अडचणींमुळें वेळेवर पैसा उभा न करतां आल्यानें वायदा पुढं ढकलणें वेगळें व करारप्रमाणें रोख्यांची देवघेव करण्याची इच्छाच नसणें वेगळें. या दुसऱ्या प्रकारच्या लोकांनींच शेअर-बाजार व्यापलेला असतो, व त्या बाजारास सट्टेबाज़ार असें देण्यांत येणारें नांव सार्थ ठरतें.

## पैसा गुंतवणें आणि सट्टा खेळणें

रोखे विकत घेऊन त्यांवरील व्याज घेत बसण्यापेक्षां, सोईचें पड-ल्यास ते विकणारा मनुष्य, सट्टेवाला या सदरांत येणार नाहीं. तसेंच, केवळ, वळणाचे वेळीं रोख्यांचीं देणीं-घेणीं पुढें ढकलण्यानेंच मनुष्य सट्टा खेळ-णारा होणार नाहीं. पैसे गुंतविण्याची खरी इच्छा कोठें संपते व सट्टेबाज़ीस प्रारंभ कोठें होतो, हें अचुक सांगतां येणें कठिण आहे. विशेषतः हल्ली व्याजाचे दर फारच उतरलेले असल्याकारणानें केवळ व्याजावर संतुष्ट रहाण्याची पैसेवाल्या लोकांमध्यें प्रवृत्ति नाहीं. भांडवलावरील व्याज वाढत नाहीं; तेव्हां भांडवलांतच वाढ करावी, या इच्छेनें कित्येक लोक आतां वाय-द्यांचे व्यवहारांत लक्ष घालूं लागले आहेत. प्राप्तीवरील करांत झालेली विलक्षण वाढ हेंहि या प्रवृत्तीचें कारण आहे. स्वतःजवळ असलेला रोखा, चढीचा दर मिळाला असतां, विकणें हें जर गैर होत नाहीं, तर किंमत उतरली असतां तोच रोख पडलेल्या भावानें परत खरेदी करण्यास काय हरकत आहे ? आतां, एखाद्यानें स्वतःजवळ रोखा नसतांहि आजच्या भारी किंम-तीस तो विकला व पुढें भाव उतरून कमी दरानें आपणांस तो विकत घेतां येईल व करार पार पाडतां येईल या भावनेनें त्यानें व्यवहार केला, तर ह्या व्यवहारांत व पहिल्या व्यवहारांत तत्त्वाचे दृष्टीनें विशेष फरक पडत नाहीं.

रोखे विकले असतां ते देण्याचा अगर विकत घेतले असतां पैसे भरून ते स्वीकारण्याचा ज्यांचा मुळीच उद्देश नसतो, अशा लोकांस स्टॉक एक्सचेंजमध्यें व्यवहार करण्यास परवानगी कां असते, हा प्रश्न साहजिकच सुचण्यासारखा आहे. सट्टेवाल्यांच्या देवघेवींमुळें बाजारभाव विनाकारण

वर-खाली जात असतील, तर त्यास प्रतिबंध करणें, सार्वजनिक हिताचें होणार नाहीं काय ? ह्या प्रश्नांस उत्तर असें आहे कीं, मित प्रमाणांत व नियंत्रित स्वरूपांत सट्टे चालविले असतां त्यांचा परिणाम आर्थिक जीवनास पोषक असाच होतो. कित्येक कंपन्यांचे रोखे, त्यांची संख्या अत्यंत अल्प असल्याकारणानें, बाजारांत नेहमी येतातच, असें नाहीं. सट्टयांचे व्यवहारामुळें त्याच त्या रोख्यांची वरचेवर उलाढाल झाल्याकारणानें, ज्यांची संख्या लहान आहे, अशा रोख्यांसहि महत्त्व प्राप्त होतें व त्यामुळें पैसे गुंतविणारांची चांगली सोय होते. सट्टेबाजीचें प्रमाण रोख्यांच्या बाजारांत किंवा मंडळयांच्या भागांचे बाजारांत जितकें आढळतें, त्यापेक्षां तें कपाशीच्या बाजारांत अधिक असतें. तेव्हां, ह्या सट्टेबाजीचें आर्थिक व सामाजिक स्वरूप काय आहे, याचें विवेचन कपाशीच्या बाजाराचें वर्णन करतांनाच करणें जास्त सयुक्तिक होईल.

## सट्टेवाल्यांचा धंदा

स्टॉक एक्सचेंजमध्यें व्यवहार करणाऱ्या जॉबर, ब्रोकर व सट्टेबाज लोकांना, त्यांचा धंदा फायदेशीर रीतीनें चालण्यास, रोख्यांचे किंमतींत जेवढा चढउतार होईल तेवढा हवाच असतो, कारण बाजारभाव हेलकावे खात असले म्हणजे खरेदी-विक्रीच्या व्यवहारांस ऊत येऊं लागतो. भागांच्या दर्शनी किंमतीचे मानानें त्यांस बाजारभाव कांहींहि येवो, मंडळयांची खरी परिस्थिति चांगली असूनाहि केवळ सट्टेबाजीमुळें त्यांच्या भागांची किंमत कितीहि उतरो, सट्टेवाल्यांस त्याची फिकीर नसते. ज्या रोख्यांच्या खरेदी-विक्रीचा धंदा करावयाचा, त्या रोख्यांची संख्या मोठी असली व बाजारभाव अनिश्चित झाले म्हणजे त्यांच्या तोंडास पाणी सुटतें. रकमा गुंतविण्याच्या शुद्ध बुद्धीनें जेव्हां कांहीं लोक विवक्षित रोखे खरेदी करतात, तेव्हां तितके रोखे बाजाराच्या बाहेर जाऊन सट्टयांचें व्यवहारक्षेत्र आकुंचित होतें. अलीकडे शेअरबाजारांतील रोख्यांत पैसे गुंतवूं इच्छिणारा मनुष्य, रोख्यांवर नीट व्याज पडावें अशा इच्छेनें रोखे सहसा खरेदी करीत नाहीं; भांडवलाची वाढ करण्याची त्याची इच्छा असते हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां, अशा लोकांनीं, बाजारांत नेहमी जे उपलब्ध होतात, अशा रोख्यांचीच खरेदी–विक्री करणें आवश्यक आहे.

वळणाचे दिवशीं रोख्यांच्या किंमती एकमेकांस देऊन न टाकतां पुनः पुढचा वायदा करणारे अनेक लोक असतात. वायद्याचा धंदा करावयाचा असल्यास, रोख्यांच्या बाजारभावाइतकी रकम स्वतःजवळ रोख असण्याचें कारण नसतें; परंतु ज्या रोख्यांचे व्यवहार आपणांस करावयाचे, त्यांच्या चालू किंमतीच्या एक-चतुर्थांश ते एक पंचमांश इतकी रकम आपलेजवळ बाळगणें त्यांस इष्ट असतें. नाहींतर, कठिण प्रसंग ओढवल्याखेरीज रहाणार नाहीं. त्याचप्रमाणें, प्रत्येकानें आपली ऐपत पाहूनच व्यवहार केले पाहिजेत. बाजारभावांचा अंदाज करणें हें अत्यंत कठिण काम असून त्यास अनुभव व हुशारी हे दोन गुण अवश्य लागतात. ज्योतिषशास्त्राचा आधार घेऊन हे व्यवहार करण्याची पद्धत आतां बरीच रूढ झालेली दिसते. रोख्यांच्या बाजारांत होणारे चढउतार ज्योतिषशास्त्रानें कसे अंदाजतां येतात, धंदेवाल्यांनीं असल्या अंदाजांवर विश्वास ठेवणें कितीसें श्रेयस्कर आहे व त्यांत ठोकताळे कितपत येतात ह्या प्रश्नांत शिरण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

## रोखे-बाजारांतील चढउतार

रोखे बाजारांतील भागांच्या व रोख्यांच्या किंमतींत वरचेवर चढ-उतार होत असतो. एकाच दिवशीं, विशिष्ट रोख्यांची किंमत अनेकवेळां कमी-ज्यास्त झालेली आढळते. बाजार उघडण्याचे वेळीं रोख्याचा बाजार-भाव १०० असेल, तर तो मध्यंतरीं ९८ पर्यंत पडून पुनः शेवटीं १०२ पर्यंत चढणें, ह्यांत आश्चर्यकारक असें कांहीं नाहीं. किंमतींत पडणारा हा फरक, कांहीं विशेष व अनपेक्षित घटनेमुळें घडून आलेला व तात्पुरता असला, तरी सर्वसाधारणपणें रोख्यांचे भाव ज्यांमुळें निश्चित होतात, त्या सामान्य कारणांशींहि या चढउताराचा संबंध असतो. त्यांमधील प्रमुख कारण म्हणजे खुद्द पैशाची किंमत किंवा त्याचा बाजारभाव म्हणजे व्याजाचा दर, हें होय. रकम कर्जाऊ काढावयाची असल्यास ज्या दरानें व्याज द्यावें लागेल, त्यावरून पैशाची महर्घता किंवा स्वस्ताई समजून येते. हे व्याजाचे दर कमी-ज्यास्त झाले, म्हणजे त्यांचा परिणाम बाजारांतील सर्व रोख्यांवर झाल्याखेरीज रहात नाहीं. व्याजाचे दर चढले म्हणजे सहाजिकच रोख्यांचे बाजारभाव पडतात. कारण, कमी दरानें रोख्यांत गुंतविलेल्या रकमांवरील व्याजापेक्षां इतरत्र व्याज ज्यास्त मिळूं लागतें व लोक

रोखे विकून टाकतात. उलटपक्षीं, व्याजाचे दर उतरले, म्हणजे बाहेर कोठेंहि चांगलें व्याज मिळेनासें होतें, आणि रोखे खरेदी करण्याची सर्वांची गर्दी उडते. अर्थात्, हे चढउतार एकदम होत नसतात व बाजारांतील लोक दूरदर्शी असल्याकारणानें रोख्यांचे किंमतींत वाढ किंवा घट अचानक न होतां, व्याजाच्या दरांशीं त्यांचा मेळ एकसारखा बसत असतो. सरकारी व निमसरकारी कर्जरोखे, कायम व्याज देणारे प्रेफरन्स भाग, इत्यादींत पैसे गुंतविणाऱ्या लोकांचा हेतु, त्यांवरील व्याज मिळविण्याचा असतो. याच्या उलट, भाग धारण करणाऱ्या लोकांचें लक्ष बहुधा व्याजावर नसतें. पहिल्या प्रकारच्या लोकांवरच व्याजाच्या दरांतील चढ–उताराचा विशेष परिणाम होतो, व ते आपला पैसा ज्यास्त व्याज मिळेल, तेथें गुंतवतात. मंडळ्यांच्या भागांत पैसे गुंतविणारांची मनोवृत्ति थोडीशी वेगळी असते. कित्येक वेळां, कर्जाऊ पैशावर ते व्यवहार करतात आणि भागांच्या किंमतींत चढउतार होऊन पडणाऱ्या फरकावर त्यांची प्राप्ती अवलंबून असते. भांडवल जर महाग झालें, म्हणजे व्याजाचे दर चढले, तर त्यांस मिळणारी कसर कमी होते व वेळेनुसार ती नाहींशीहि होते. त्यामुळें आपला व्यवहार थांबवणें त्यांस भाग पडतें व त्याचा परिणाम बाजारावर होतो. तथापि, व्याजाच्या दरांतील चढउतार कायम व्याज देणाऱ्या रोख्यांस जेवढा भोंवतो, तितका तो इतर रोख्यांस व भागांस जाचत नाहीं, हें खास.

## व्याजाच्या दरांत चढ-उतार

पैशाचा पुरवठा व त्यास पडणारी किंमत, हें बाजारभावांच्या आंदोलनांचें प्रमुख कारण होय. पैशाची चणचण कां व केव्हां भासते, बाजारांत मुबलक पैसा केव्हां व कोठून येतो, इत्यादि प्रश्न स्वतंत्र असून त्यांत येथें शिरण्याचें कारण नाहीं. त्यांचें विवेचन पुढील प्रकरणांत आम्हीं केलें आहेच. युद्धासारख्या आपत्तीचे वेळीं एकदम पुष्कळ कर्ज उभारावें लागतें व त्यामुळें मागणीच्या मानानें पैशाचा पुरवठा चालू दरानें होणें शक्य नसतें. नवीन कर्जाच्या रोख्यांस जास्त व्याज देणें सरकारास अर्थातच जरुर पडतें व जुन्या कमी दरांच्या रोख्यांचे भाव पडतात. युद्धाच्या नुसत्या भीतीनेंहि बाजारभावांवर काय परिणाम होतो, ह्याचें प्रत्यंतर इटली-ॲबिसिनियामधील वितुष्टाचे वेळीं नुकतेंच आलें आहे. देशाच्या पतीवरही भाव अवलंबून असतात. अंतर्गत बंडाळीमुळें लोकांचा सरकारावरील विश्वास

कमी झाला, कीं त्याचें प्रत्यंतर रोख्यांचे किंमतींत तात्काळ आढळतें. देशांतील एका राजकीय पक्षानें प्रचलित राजकारणावर व धोरणावर तीव्र टीका केली, तर तिचे पडसाद रोखे बाजारांत ऐकूं येतात, इतकें बाजाराचें यंत्र नाजुक आहे. देशाची पत वाढली, व्यापारधंदे व आयात-निर्गत सुधारली तर त्याचा सुपरिणामहि झाल्याखेरीज रहात नाहीं. उद्योगधंदे ऊर्जितावस्थेंत असले, म्हणजे त्यांत व्याज चांगलें सुटतें आणि रोख्यांवरील हलक्या दरावर संतुष्ट राहण्याची लोकांची तयारी नसते. उद्योगधंद्यांची प्रगति ही एकसारखी होत नाहीं; कांहीं दिवस तेजीचे व कांहीं दिवस मंदीचे असतात. अर्थातच, भागांची किंमत ह्या बदलणाऱ्या परिस्थितीवर अवलंबून रहाते.

## बाजारांतली चलती

औद्योगिक व व्यापारी मंडळ्यांच्या भागांवर सुटणारें व्याज किंवा मिळणारें डिव्हिडंड हें त्यांच्या सांपत्तिक स्थितीवर अवलंबून असतें. त्यांच्या भागांची किंमत मुख्यत्वेंकरून तीन गोष्टींनीं निश्चित होते.– ( १ ) उद्योग-व्यापाराची परिस्थिति, (२) भागांची लोकप्रियता आणि (३) किंमतींत बदल घडवून आणणारीं तात्कालिक कारणें. ह्या कारणांचा क्रमशः विचार करूं. व्यापाराची परिस्थिति एकसारखी बदलत असते. मंदीचे काळांत पैसा पडून असतो व व्याजाचे दर फारच हलके असतात. सुस्थितीची किंचित् आशा उत्पन्न झाली, कीं आगामी तेजीचा फायदा मिळविण्यासाठी व्यापाऱ्यांची खटपट सुरू होते व बँकांकडे कर्जाची मागणी येते. उद्योगधंदे एकमेकांशीं संलग्न असल्यानें एका धंद्यांतील चुळबुळीचा परिणाम इतर धंद्यांवर होतो व पैशास चोहोंकडे मागणी उत्पन्न होऊन, बाजारभाव चढतात. उद्योगधंदे वाढले कीं बेकारांना काम मिळतें. श्रीमंत चैनींत पैसे उधळतात, तर मजूर उद्यांचा विचार न करतां व खाण्यापिण्यांत हात न आंवरतां मजूरीचे पैसे खर्च करतात. भागीदारांसहि डिव्हिडंड चांगलें मिळतें. सरकारी कर्जरोख्यांस आतां कोण विचारणार ? त्यांचे भाव पडतात व त्यांस खरेदीदार मिळेनासे होतात. बाजारांत भागांकडेच सर्व लोकांचें लक्ष लागतें.

## मंदीची छाया

कारखानदार आपलें उत्पादन वाढवूं लागतात, तेव्हां त्यांस पैसा लागतो. तो मिळविण्यासाठी बँकांकडे निकडीच्या मागण्या जातात. परतु इतक्या

रकमांची सोय करणें बँकांस अशक्य होऊन कर्जाच्या रकमांवरील व्याजाचा दर चढविण्यांत येतो. व्याजाचा दर कितीहि भारी असला, तरी स्वतःवर काढलेल्या हुंड्या स्वीकारण्याखेरीज व्यापाऱ्यांस गत्यंतर नसतें. बाजारभाव अनुकूल व चढीचे असले, म्हणजे व्यापाऱ्यांस व कारखानदारांस कोठें थांबावें, हें कळत नाहीं आणि धंदा व उत्पादन हीं सारखीं वाढविण्याकडे त्यांचें लक्ष असतें. तिकडे माल शिल्लक पडत असतो व त्याचे तारणावर बँकांकडून कर्जें घेण्यांत येतात. बँकांनीं पैशाचा तगादा केला, म्हणजे हा माल बाजारांत आणावा लागतो. अर्थातच, त्यास भाव येत नाहीं व सर्वत्र खिन्नतेची छाया पसरते. सावकार लोक व घेणेकरी एकदम सावध होऊन पैसे वसूल करूं लागतात आणि कित्येक धंदेवाल्यांचें दिवाळें निघतें. तसेंच, बेकारी माजून चोहोंकडे अस्वस्थता होते, मंदीचा काळ पुनः आपलें विक्राळ स्वरूप धारण करतो आणि भागांवर मिळणारें लठ्ठ डिव्हिडंड म्हणजे स्वप्नसृष्टींतील एक प्रसंग असें वाटूं लागतें. व्यापाराच्या व उद्योगधंद्यांच्या असल्या चक्रावर आरूढ होऊन आपला तोल संभाळण्यांतच धंदेवाल्यांचें खरें चातुर्य आहे.

बाजारभावांच्या ह्या प्रकारच्या सप्तवार्षिक किंवा दशवार्षिक आंदोलनांच्या मध्यंतरींच्या काळांत, रोख्यांच्या व भागांच्या किंमतींत चढ-उतार होतात, त्यांस कारण काय ? कांहीं विशिष्ट भाग चढतात किंवा पडतात, तें कां ? ही चढ किंवा पड प्रत्येक मंडळीच्या वैयक्तिक यशापयशावर बरीचशी अवलंबून असते, हें ध्यानांत ठेवणें आवश्यक आहे. एखाद्या लोखंडाच्या कारखान्यास रुळांचें मोठें कंत्राट मिळालें, कीं त्या मंडळीस ज्यास्त नफा मिळणार व तिचे भागांवर चांगलें व्याज सुटणार, ह्या अपेक्षेनें ते भाग कडकतात. उलटपक्षीं, एखाद्या रेल्वेवर किंवा ट्रॅम्वेवर मजूरांनीं संप पुकारला असला कीं, ताबडतोब त्या मंडळीचे भाग पडतात. ह्याचें कारण, संपामुळें मंडळीचें उत्पन्न घटण्याची भीति, हें होय. कांहीं भागांचें नांव रोज वर्तमानपत्रांतून झळकतें, एवढ्याच कारणानें ते लोकप्रिय होतात व त्यांच्या बाजारभावास नसतें महत्त्व प्राप्त होतें. इंग्लंडचे राजे सातवे एडवर्ड जेव्हां मरण पावले, तेव्हां सर्वच रोखे व भाग खाली आले, ह्याचें कारण लोकांची भावनावशता, हें होय. क्षुल्लक बातम्यांचा व अफवांचाहि बाजारावर परिणाम होतो व त्यामुळें भावांचा हिशेबीपणा एकदम नाहींसा होतो.

## बाजारांत कमाई कशी करतात ?

रोखे बाजारांत कमाई करण्यांतील मुख्य रहस्य म्हणजे, पैसे एके ठिकाणीं गुंतवून न ठेवतां ते सारखे खेळते ठेवणें, हें होय. रोख्यांवर व्याज मिळालें तरी तें किती मिळणार ? फायद्याचें प्रमुख साधन, रोख्यांच्या व भागांच्या खरेदी विक्रींत उरणारी अनुकूल तफावत, हें होय. १०० रुपयांचा भाग संग्रहीं ठेवून वर्षअखेर त्याचे ६ रुपये डिव्हिडंड मिळण्यापेक्षां तो भाग बाजाराच्या अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीस अनुलक्षून विकून व खरेदून प्रत्येक वेळीं ६ टक्के नफा मिळवणें, ज्यास्त फायदेशीर नाहीं काय ? एकाच भागाची खरेदी-विक्री अशा रीतीनें वर्षांतून पंधरा-वीस वेळां करतां येईल; म्हणजे एकूण नफा कितीतरी ज्यास्त मिळेल. मंडळ्यांच्या भागांची देवघेव करतांना, प्रत्येक मंडळीची जिंदगी किती आहे, ह्याकडे लक्ष असावें. केवळ भपकेदार वर्णनाच्या योजनांस महत्त्व देऊं नये. एखादी भक्कम मंडळी जरी डिव्हिडंड देऊं शकली नाहीं, तरी तिची मालमत्ता तरी कोठें जाणार नाहीं व तिचा कारभार जरी गुंडाळावा लागला, तरी पन्नास टक्के तरी भांडवल हातीं येईल. साखरेच्या कारखान्याच्या भागांत भांडवल गुंतविलें, तर निदान यंत्रांचा लिलांव करून पैसे वसूल होतील, परंतु पुस्तकें प्रसिद्ध करण्याचा धंदा करणारी मंडळी लिक्विडेशनमध्यें निघाली तर हातास काय येणार ? रोखे-बाजारांत व्यवहार करणारांनीं असला हिशेब आपल्या मनांत करून पाउल टाकलें पाहिजे.

## चढ–उताराचीं कारणें

भागांवर डिव्हिडंड मिळण्याची वेळ जवळ येऊं लागली कीं, त्यांचे भाव आंदोलनें खाऊं लागतात. मंडळीची वार्षिक साधारण सभा भरून, डिव्हिडंड जाहीर होण्याच्या आधीं यंदा मंडळीस नफा किती होईल व भागांवर डिव्हिडंड कोणत्या दरानें मिळेल ? असे तर्कवितर्क लोकांत सुरू होतात. जास्त डिव्हिडंड मिळण्याची आशा उत्पन्न झाली, कीं, विशिष्ट भागांस मागणी येते व त्यांचे भाव चढतात. डिव्हिडंड जाहीर झाल्यावर कांहीं दिवस त्या भागांची लोकप्रियता टिकते, परंतु नंतर ते मागें पडतात. भागांची किंमत ठरतांना, त्यांवरील डिव्हिडंड खरेदीदारांस मिळणार किंवा नाहीं व मिळणार असल्यास तें केव्हां मिळणार, हाहि एक महत्त्वाचा मुद्दा असतो. बाजारभावांत चढउतार करणारें अत्यंत व्रात्य कारण म्हटलें म्हणजे

गप्पीदासांच्या बातम्या हें होय. कित्येक बातम्यांस मुळींच आधार नसतो व त्या कोणी व कशा प्रसृत केल्या, ह्याचा पत्ताहि लागत नाहीं. कांहीं रोखे व भाग चढण्यावर किंवा पडण्यावर सट्टेबाज लोकांचा नफा अवलंबून असतो व त्यासाठीं हे लोक मुद्दाम आपणांस सोइस्कर अशा अफवांचा प्रसार करण्यास मागें पुढें पहात नाहींत. ह्या बातम्यांचा परिणाम अर्थात् फार काळ टिकत नाहीं. परंतु त्यांचे दुष्परिणाम कित्येकांस भोगावे लागतात, ते मात्र चुकत नाहींत.

## व्यवहाराचा एक महत्त्वाचा नियम

रोखे बाजारांत नफा मिळविण्याची युक्ति सर्वांसच साधते असें नाहीं. परंतु, या बाबतींतला एक नियम मात्र सर्वमान्य आहे; फक्त त्याची अंमलबजावणी योग्य समयीं करणारा चतुर मनुष्य पाहिजे. एखाद्या मजबूत मंडळीच्या भागाचा दर कांहीं विशिष्ट कारणांमुळें अगदीं खाली गेला, तरी तो पुनः सुधारण्याची खात्री असते. अशा भागांची योग्य निवड करून ते खालीं गेले असतां त्यांचा भाव चढणार, ह्या अपेक्षेनें आज ते खरेदी करावयाचे व त्यांचा भाव कालांतरानें चढला म्हणजे ते विकून टाकावयाचे, असें हें धोरण असतें. बाजारभाव कमाल मर्यादेपर्यंत खाली गेला व आतां त्याहून तो मंदावणार नाहीं, अशा वेळीं वरील तऱ्हेचे व्यवहार केल्यास त्यांत भरपूर नफा मिळतो. परंतु वेळेची निवड योग्य झाली नाहीं व विक्रीचे वेळीं भाव ज्यास्तच घसरले म्हणजे मात्र त्यांतलें सर्व गणित खोटें पडून व्यवहार आंगलट येतात. रोख्यांच्या व भागांच्या बाजारभावांत जर सारखा चढ किंवा उतार होत गेला असता, तर रोखेबाजारांत व्यवहार करणें इतकें कठिण झालें नसतें. परंतु बाजारभावांत होणारीं आंदोलनें नागमोडी स्वरूपाचीं असतात; भावांत चढ झाला, कीं, त्यांत पुनः उतार होतो व त्यांची समुद्राच्या लाटेसारखी गति होते. ह्या लाटेच्या हालचालींची मर्यादा ओळखणें, हीच रोखेबाजारांतील सर्व व्यवहारांतली मख्खी आहे. मंदीचे भाव असतांना खरेदी करावयाची, भाव वाढण्याची वाट पहावयाची व आतां भाव यापुढें वाढणार नाहींत, उलट ते खालींच येण्याचा संभव आहे, असें दिसूं लागतांच रोख्यांची विक्री करून, ज्यास्तींत जास्त नफा मिळवावयाचा, अशा तऱ्हेचा हा व्यवहार आहे.

खुद्द बाजारांत काम करणाराचे मार्गांत अडचणी अनेक असतात व त्याची दृष्टि साफ रहाणें फार कठिण असतें. आपण असें समजूं कीं, व्यापार व उद्योगधंदे ह्यांची चलती परमावधीस पोहोंचून पिछेहाट होऊं लागली आहे. कारखान्यांचें उत्पादन घटूं लागलें म्हणजे खेळत्या भांडव-लाची जरूरी कमी-कमी भासूं लागते व बँकांचा कर्जें देण्याचा दर उतरतो. अशा वेळीं लोकांचें लक्ष सरकारी रोख्यांकडे वळूं लागतें. सुज्ञ व व्यवहार-कुशल, कारवाई करणारानें प्रसंग ओळखून, योग्य रोख्यांची खरेदी कर-ण्यास प्रारंभ करावा, म्हणजे पुढें वाढ होणाऱ्या बाज़ारभावांचा त्यास पुरेपूर फायदा मिळेल. तात्त्विक चर्चेपेक्षां प्रत्यक्ष व्यवहार करणें अर्थात् शतपटीनें कठिण असतें, परंतु तत्त्वें सोडून व्यवहार करणाराचा कायमचा फायदा कधींच होणार नाहीं.

## रोख्यांवर सुटणारें व्याज

रोखे खरेदी करणारास, त्यानें गुंतविलेल्या पैशावर व्याज काय सुटेल, ह्यावर रोख्यांची किंमत मूलतः अवलंबून असते. सर्वसाधारणपणें असें म्हणतां येईल कीं, एकाच दर्जाच्या व विवक्षित टक्के व्याज देणाऱ्या रोख्यांचा बाजारभाव सारखाच रहातो. परंतु, रोख्यांचे प्रकार अनेक असल्यामुळें आणि त्यांच्या परतफेडीच्या अटींत व व्याजाच्या दरांत तफा-वत पडत असल्यामुळें, त्यांचे बाजारभाव भिन्न-भिन्न असतात. ह्यामुळें, खरेदीदारास मोठ्या काटेकोरपणानें हिशेब करून, आपल्या रकमेवर व्याज काय पडेल, हें पहावें लागतें. अब्रूदार व संपन्न राष्ट्राची पत नेहेमीच चांगली असल्यामुळें, लोकांची त्याच्या कर्जाविषयीं विश्वासाची वृत्ति असते व त्यासंबंधांतल्या रोख्यांवर व्याज अत्यंत कमी पडतें, म्हणजे त्यांचा बाजार-भाव उंचीचा रहातो. ह्या कर्जावरील व्याजाचा दर हलका असला तरी त्याबद्दल काळजी बाळगण्याचें कारण नसतें. उलटपक्षीं, उत्तम डिव्हिडंड देणाऱ्या मंडळीच्या भागांची किंमत डिव्हिडंडच्या दराच्या प्रमाणांत वाढ-लेली असतेच असें नाहीं. सरकारी रोख्यांवर तीन टक्के व्याज सुटत असलें व विवक्षित मंडळी नऊ टक्के डिव्हिडंड देत असली, तर वास्तविक पहातां तिच्या भागांची किंमत रोख्यांच्या तिप्पट असावी. पण तसें होत नाहीं. कारण, मंडळी नऊ टक्के डिव्हिडंड देत राहील ह्याची शाश्वती काय? ज़र, शंभर रुपये किंमतीच्या भागांचा बाजारभाव फक्त दुप्पटच असला,

तर २०० रुपयांच्या भांडवलावर नऊ टक्के डिव्हिडंड मिळेल; याचाच अर्थ, ४½ टक्के व्याज सुटेल.

## व्याजाचा हिशेब

१०० रुपयांचा १० टक्के डिव्हिडंड देणारा रोखा ५० रुपयांस मिळाला, तर ५० रुपयांवर १० रुपये म्हणजे २० टक्के दरानें व्याज पडतें. ह्याच्या उलट, त्याच रोख्यांची किंमत २०० रुपये झाली, तर २०० रुपये गुंतविले असतां १० रुपये मिळतील, म्हणजे ५ टक्के दरानें व्याज मिळेल. रोख्यांच्या खरेदीच्या किंमतींत, त्यांवर मिळणाऱ्या डिव्हिडंडचा अंतर्भाव केलेला असेल तर खरेदीदारास डिव्हिडंड मिळण्याचा हक्क राहील व वरील हिशेबानें पडणाऱ्या डिव्हिडंडच्या दरांत थोडासा वाढावा येईल. तसेंच, रोखा विकणाराचा डिव्हिडंडवर हक्क राहणार नाहीं, व डिव्हिडंड जाहीर झाल्यावर तें खरेदीदारास मिळेल, अशा स्वरूपाच्या मिळकतीचा अंतर्भाव ज्या किंमतींत झालेला असेल त्यास ‘ कम् डिव्हिडंड’ ( सह-डिव्हिडंड ) अशी संज्ञा आहे. खरेदीदारास हा हक्क मिळणार नसेल तर तें डिव्हिडंड ‘ एक्स डिव्हिडंड’ ह्या नांवानें ओळखलें जातें. ह्या पुस्तकाच्या २८ व्या व ४१ व्या पृष्ठांवर रोख्यांचे बाजारभाव दिले आहेत, त्यांतील कांहींच्या पुढें एक्स डि० अशीं अक्षरें आहेत, त्यांचा वरील खुलाशानें अर्थबोध होईल. रोख्यांवर सुटणारें व्याज, डिव्हिडंड कोणत्या स्वरूपाचें आहे ह्यावरहि अवलंबून असतें, हें निराळें सांगावयास नकोच.

## कर आणि मुदत

रोख्यांच्या डिव्हिडंडवर प्राप्तीवरील कर कोणीं भरावयाचा, ह्या प्रश्नाचाहि येथें विचार केला पाहिजे. कांहीं सरकारी रोखे कर-माफ असतात, तर कांहींवरील व्याजावर, त्यांचे मालकांस कर द्यावा लागतो. रकम गुंतविणारानें ह्या गोष्टीचाहि हिशेब करणें आवश्यक आहे. कराची माफी मिळणार नसेल, तर इतर सर्व बाबींच्या हिशेबानें निश्चित होणारें व्याज त्याच्या हातीं लागणार नाहीं. सरकारी तिजोरींतून, व्याज देतांनाच, प्राप्तीवरील कर कापून घेण्यांत येतो व तो भरला असल्याबद्दलचा दाखला मिळतो. प्राप्तीवरील कर बसण्याइतके रोखे धारण करणाराचें उत्पन्न नसेल, तर त्यास कराची रकम मागाहून परत मिळते. कित्येक मंडळ्या कर-माफ डिव्हिडंड जाहीर करतात, कित्येक करीत नाहींत; त्यासंबंधीं नियम असा कोणताच सांगतां

येणार नाहीं. प्रत्येक मंडळीच्या विशिष्ट परिस्थितीवर आणि धोरणावर हें अवलंबून राहील. व्याज काय सुटेल, ह्याचा हिशेब करतांना वरील बाबहि लक्षांत घेणें अगत्याचें आहे.

रोख्यांची परतफेड केव्हां होणार, हा मुद्दाहि कमी महत्त्वाचा नाहीं. समजा, एका रोख्याच्या मुद्दलाची परतफेड १० वर्षांनीं होणार आहे व त्या रोख्याची आजची किंमत १२० रुपये आहे. म्हणजे, आज १२० रुपये देऊन तो रोखा खरेदी केला, तर दहा वर्षांचे शेवटीं त्याबद्दल फक्त १०० रुपयेच परत मिळणार. हा २० रुपयांचा फरक त्या रोख्याची आजची किंमत व त्यावर पडणारें व्याज ठरतांना प्रभावी होणार, हें उघड आहे. वीस रुपयांचें नुकसान १० वर्षांनीं होणार असलें, तरी त्याचा परिणाम आजच्या बाजार-भावावर होणें अपरिहार्य आहे. खरेदीदारास ही गोष्ट हिशेबांत धरावी लागून, पुढें होणारें नुकसान ध्यानांत धरूनच आपणास व्याजाचा दर काय पडेल तें तो पहात असतो. ह्याच्या उलट, १०० रुपयांच्या रोख्याची आजची किंमत ९० रुपये असणेंहि शक्य आहे. त्याच्या परतफेडीचे वेळीं १० रुपयांचा वाढावा मिळेल, ही गोष्ट त्यावर सुटणाऱ्या व्याजाचा विचार कर-तांना हिशेबांत घ्यावी लागेल. बिनमुदत परतफेडीच्या रोख्यांस वरील विवेचन अर्थात् लागू नाहीं. जसजशी परतफेडीची मुदत जवळ येत जाईल, तसतसा, इतर कारणें प्रभावीं नाहींत असें मानल्यास, रोख्यांचा बाजारभाव मुद्दलाचे जवळ जवळ येऊं लागेल, हें उघड आहे.

## नवीन मंडळ्यांचे प्रॉस्पेक्टस

नवीन मंडळ्यांची स्थापना झाली, किंवा विद्यमान मंडळ्यांची पुनर्घ-टना झाली, म्हणजे त्यासंबंधीं संक्षिप्त माहिती वर्तमानपत्रांच्या संपादकीय विभागांत येत असते. पत्राच्या त्याच अंकांत दुसऱ्या ठिकाणीं सदरहु मंड-ळीची जाहिरात आलेली असते, तिच्याकडे वाचकांचें लक्ष वेधावें, असा ह्या संक्षिप्त आढाव्याचा हेतु असतो. म्हणजे, वाचकांप्रमाणें जाहिरात-दारांचें हित त्यांत पाहिलेलें असतें. या कारणानें, अगदीं टाकाऊ मंडळी संबंधींहि माहिती दैनिकाच्या संपादकीय किंवा संपादकीय-तुल्य विभागांत आलेली आढळते. म्हणून, ती हिशेबांत धरून वाचकांनीं त्याबद्दलची पुरी माहिती मिळवूनच मग मत बनविणें श्रेयस्कर असतें. उच्च दर्जाचीं पत्रें प्रॉस्पेक्टसच्या आढाव्यास आपलीं स्वतःचीं अशीं एक दोन वाक्यें फार तर

जोडतात; ज्यास्त तपशीलवार अभिप्राय देण्याच्या भरीस तीं पडत नाहींत. तेव्हां, अशा पत्रांत एखाद्या मंडळींविषयीं जरी वेचक शब्दांनीं अगर गर्भित सूचनांनीं मत प्रदर्शित करण्यांत आलें असेल, तर त्यास विशेष महत्त्व प्राप्त होतें. नवीन मंडळ्यांचे भागांत रकमा गुंतविणारांनीं, वर्तमानपत्रांतील तज्ञ लेखकांच्याहि शिफारसींवर विसंबून रहातां कामा नये. रोखेबाजारांसंबधीं वर्तमानपत्रांत माहिती येत असते व उपयुक्त सूचना केलेल्या असतात, त्यांतल्या सल्ल्याचा उपयोग स्वतःच्या बुद्धीस सहाय ह्या दृष्टीनें करावा. बाजारगप्पांपेक्षां जबाबदार वृत्तपत्रांतील सल्ला केव्हांहि ज्यास्त ग्राह्य ठरेल, परंतु त्याची मर्यादा मात्र ओळखली पाहिजे. बाजारांतले प्रमुख दलालहि आपल्या गिऱ्हाइकांस साप्ताहिक माहिती पुरवतात व सल्ला देतात. त्याचा अवश्य उपयोग करुन घ्यावा.

## सावधगिरीचे फायदेशीर व्यवहार

रोखेबाजार हा एक जुगारीचा अड्डाच होय, अशी कित्येक लोकांची कल्पना असते व द्यूत, शर्यत इत्यादींप्रमाणेंच रोखेबाजारांत व्यवहार करणें हें एक व्यसन आहे, असें समजण्यांत येतें. अज्ञानानें, भ्रमिष्टपणानें आणि बेहोषपणानें असल्या भानगडींत पडून स्वतःचें व त्याबरोबर इतरांचेंहि नुकसान केलेल्या लोकांचीं उदाहरणें डोळ्यांपुढें असल्यानें जनतेची अशी समजूत होणें साहजिक आहे. तें कसेंहि असो, आज जगांतील सर्व प्रमुख व्यापारी केंद्रांत असे वायद्याचे बाजार असतात व त्यांत हजारो लोक उलाढाली करीत असतात. ज्याप्रमाणें जुगारींत किंवा शर्यतींत, कित्येक लोक हुशारीनें व नफेबाजीस बळी न पडतां पैसे कमावतात, त्याप्रमाणें रोखेबाजारांतहि व्यवस्थित रीतीनें कारभार करून कायम प्राप्ती मिळविणारे लोक आहेत. त्यामध्यें दिवाळखोर बनलेल्यांचीं उदाहरणें नाहींत, असें नाहीं; परंतु सामान्य मनुष्य दिवाळखोरी जशी कमी लेखतो, तसें ती लज्जास्पद गोष्ट आहे, असें मानण्याची व्यापारी जगांत आज प्रवृत्ति दिसत नाहीं. रोखेबाजारांत पत कायम ठेवून वर्षानुवर्ष व्यवहार करणारेहि अनेक लोक आहेत.

## दलालीचा धंदा व रोखे बाजाराची उपयुक्तता

रोख्यांची विक्री व खरेदी केवळ जमवून देणाऱ्या दलालांचें स्थान नेहमींच शाबूत असतें. रोखा चढो अगर पडो, दलालाचें कामिशन

लागू झाल्याखेरीज रहात नाहीं. गिऱ्हाइकांतर्फे सौदे करतांना एक गोष्ट मात्र ध्यानांत ठेवावी लागते, ती रकम देण्या-घेण्याचा प्रश्न उपस्थित झाला असतां, केलेला सौदा गिऱ्हाइकाचे मगदुराबाहेर जाईल कीं काय ? ही होय. जर गिऱ्हाइकानें ऐपतीबाहेर व्यवहार केले असतील, व त्यास आपले करार पार पाडतां येणें अशक्य असेल, तर दलालाची मधल्यामध्यें गळचेपी झाल्याखेरीज रहात नाहीं. प्रत्येक गिऱ्हाइकाची पत ओळखूनच दलालास वागावें लागतें. इतरांना सल्लामसलत देण्याचें दलालांचें काम ते हुशारीनें पार पाडतात, परंतु आपल्या स्वतःसाठी मात्र ते कधींहि व्यवहार करीत नाहींत, हें लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे. ह्या सर्व उलाढालींमुळें सट्टेबाजी बोकाळते खरी, परंतु त्यांचें आर्थिक व सामाजिक महत्त्व त्यांपासून होणाऱ्या नुकसानीपेक्षां ज्यास्त असल्यानें, रोखेबाजार किंवा इतर तत्सम बाजार ह्यांतील व्यवहार कायद्यास संमत असतात. मर्यादेचें उल्लंघन होऊं नये, एवढी खबरदारी घेतलेली असली, म्हणजे झालें. सरकारी आणि निमसरकारी संस्थांस कर्जें व संयुक्त मंडळयांस भांडवल ह्यांचा पुरवठा रोखेबाजारामुळें सुलभतेनें प्राप्त होतो. तसेंच, भांडवल विवक्षित मंडळयांत अडकून न पडतां इच्छेप्रमाणें तें गुंतवतां येतें. नवीन मंडळया स्थापन होतांना त्या संबंधींच्या भांडवलाची हमी घेण्याचे 'अंडर रायटिंग' चे व्यवहार करणारांच्या साहसामुळें व्यापार व उद्योगधंदे ह्यांस चालना मिळते, जगांतील सर्व बाजारांचा एकमेकांशीं संबंध राहून भांडवलाची एका देशांतून दुसऱ्या देशांत आयात-निर्गत होऊं शकते व अशा रीतीनें भांडवलाचा पुरवठा मुबलक व स्वस्त होऊं शकतो. वरील फायदे हे रोखबाजारांतील रोजचें दृश्य पाहून सुचणारहि नाहींत, परंतु त्यांच्या अस्तित्वावरच रोखेबाजारास प्राप्त झालेला कायदेशीरपणा व मान्यता हीं अवलंबून आहेत.

## मुंबईची स्टॉक एक्स्चेंज

मुंबई येथील स्टॉक एक्स्चेंजचें खरें नांव 'दि नेटिव्ह शेअर ॲन्ड स्टॉक ब्रोकर्स असोसिएशन' असें असून त्याचा कारभार कायद्यानें घालून दिलेल्या व असोसिएशननें स्वतः केलेल्या नियमांप्रमाणें चालतो. ह्या संस्थेंत १६ डायरेक्टरांचें व्यवस्थापक मंडळ आहे व असोसिएशनच्या पटावर ४७८ सभासद आहेत. स्टॉक एक्सचेंजची इमारत दलाल स्ट्रीटवर आहे व तिच्या पहिल्या मजल्यांतील भव्य दालनांत दररोज कोट्यवधि रुपये

किंमतीच्या रोख्यांची व भागांची उलाढाल होते. सरकारी रोखे व निरनिराळया विभागांतील मंडळयांचे भाग ( सिमेंट, वीज, रेल्वेज इ० ) ह्यांचे व्यवहार दिवाणखान्यांतील निरनिराळया ठराविक ठिकाणीं होतात, व ह्या जागा सहसा बदलत नाहींत.

## अहवालाचा एक नमुना

या प्रकरणाची समाप्ति करतांना एका दैनिकांत प्रसिद्ध झालेला-रोखेबाजारांच्या अहवालांतील उतारा नमुन्यादाखल दिला असतां सोईचें होणार आहे. तो उतारा असा:—

"इटली—ॲबिसिनिया लढाईच्या बातम्यांमुळें युद्धास नवे फांटे फुटण्याचा व शांततेस धोका येण्याचा संभव असल्यामुळें रोख्यांतील तेजीवाले घाबरून आपले सौदे कापीत आहेत व मंदीवाले बाजार खाली जाईल या आशेनें माल विकीत आहेत. ता. १३ सप्टेंबर पासून सरकारी रोख्यांवरील वायद्याचे व्यवहार शेअरबाजाराच्या डायरेक्टरांनीं बंद केले आहेत. यानंतर कलकत्त्याकडील व्यापाऱ्यांच्या खरेदीमुळें बाजार स्थिरावला. टाटा स्टील कंपनीच्या जुन्या कामगारांपैकीं एक जण कानपूर येथें लोखंडाचा कारखाना काढण्याच्या विचारांत आहे, ह्या बातमीमुळें टाटा स्टील कंपनीचे भाग १० टक्क्यांनीं घसरले. मुंबई ट्रॅम्वे कंपनी आपले दर घटविणार असल्यामुळें, त्याचा परिणाम तिचे भाग उतरविण्याकडे झाला."

# प्रकरण सहावें

## पैशाचा बाजार, व्याजाचे दर आणि हुंडणावळ

### पैशासंबंधीं मागणी-पुरवठा

सरकारी व निमसरकारी कर्जरोखे आणि मंडळयांचे भाग व डिबें-चर्स यांसंबंधाची माहिती प्रसिद्ध होते, त्याबरोबर, बाजारांत खेळत्या भांडवलास व्याजाचे दर काय असतात आणि अंतर्गत व परराष्ट्रीय हुंडीची कोणत्या दरानें खरेदी-विक्री होते, याविषयींचे आंकडेहि दररोज प्रसिद्ध केले जातात. असल्या हालचालींचा साप्ताहिक आढावा, त्यांचें निरीक्षण करणारे लेखक तयार करतात व तो लोकांच्या माहितीसाठी वृत्तपत्रांत प्रसिद्ध होतो. येथें व्याजाच्या दराचा प्रथम विचार करूं. हा दर म्हणजे पैशाच्या वापरास द्यावी लागणारी किंमत होय; आणि ती किंमत पैशाचा पुरवठा व त्यास वेळोवेळ येणारी मागणी ह्यांवर अवलंबून रहाते. परंतु हा पैशाचा पुरवठा होतो कसा आणि त्यास मागणी कोणाची असते ? आधु-निक काळांत मालाची खरेदी-विक्री आणि इतर देणीं-घेणीं पैशाच्या सहा-यानें होत असतात, हें प्रस्तुत प्रकरणीं ध्यानांत ठेवलें पाहिजे. त्या पैशांत नाणीं, नोटा आणि हुंड्या व चेक ह्यांच्यासारखीं विनिमय-साधनें यांचा अंतर्भाव होतो. मिळकतीचा जो भाग खर्चास आवश्यक नसल्यानें अवशेष म्हणून रहातो, तो सुरक्षित व किफायतशीर रीतीनें गुंतवला जावा, अशी अलीकडे प्रत्येकाची इच्छा असते. हिंदुस्थानांत, सामान्य जनतेचें अज्ञान व योग्य सोयींचा अभाव ह्यांचे योगानें बचत झालेल्या मिळकतीचा अशा तऱ्हेनें उपयोग करण्याचा प्रघात व संवय विशिष्ट वर्गाच्या बाहेर अस्तित्वांत नाहीं, हें आमच्या देशाच्या आर्थिक मागसलेपणाचें लक्षण आहे. तथापि, मध्यम स्थितींतल्या लोकांत व औद्योगिक आणि व्यापारी महत्त्वाच्या शहरांमध्यें, बचत होणाऱ्या मिळकतीच्या भागाचा उपयोग व्यवहारांत कर-ण्याची पद्धति आतां रूढ झाली आहे.

### कमाईतली शिल्लक

पांढरपेशा लोकांपाशीच अशी शिलकी कमाई असते, असें नाहीं. व्यापार आणि उद्योगधंदे करणाऱ्या वर्गांतील मंडळीच्या हातीं वेळोवेळ,

तात्काळ ज्याचा उपयोग करतां येत नाहीं, असा पैसा असतो. मालाची विक्री, व्याज, भाडें, डिव्हिडंड, इत्यादि मार्गांनीं मिळकत येते व तात्काळ तिचा उपयोग करण्याचें प्रयोजन नसतें. आठवडा, पंधरवडा किंवा महिना असल्या मुदतींत त्या पैशाची आवश्यकता नसल्यानें तो तात्पुरता गुंतवणें इष्ट वाटतें. निरनिराळया प्रकारांच्या बँकांत चालू किंवा अल्पमुदतीची ठेव म्हणून तो जमा होतो व जरुरीप्रमाणें काढून तो खर्चेण्याची सोय असते. ठेवींच्या स्वरूपांत हातीं आलेला पैसा कर्जाऊ देणें हा बँकांचा मुख्य धंदा आहे, आणि कर्जास गिऱ्हाइकांकडून पुरेशी मागणी नसते, तेव्हां त्यांसहि शिलकी पैशाचा विनियोग करण्याचा प्रश्न सोडवावा लागतो. बँकांच्या व्यवहारांत वचनचिठ्या आणि हुंड्या ह्यांच्या आधारावर विनिमय-साधनें निर्माण होतात व त्यांच्या मार्गानेंहि समाजांत पैसा खेळतो. गिऱ्हाईकें बँकांकडून कर्जें काढतात व त्यांच्या खात्यांवरील कर्जांच्या रकमांची चेकच्या साधनानें उचल केली जाते. ह्या रीतीनेंहि पैशाचा पुरवठा होत असतो, व अनेक उगमांतून आलेल्या विनिमय-साधनांचा वेळोवेळ जमणारा संचय, व्यापार आणि उद्योगधंदे ह्यांतील व्यवहारांत वापरला जातो.

## शिलकी संपत्तीचा समुच्चय

उद्योगधंदे व व्यापार चालण्यास उपयोगी पडणारी संपत्ति पैशाच्या आणि पत-लेखांच्या द्वारें अनेक मुखांमधून भांडवलाच्या संचयांत येऊन पडत असते. भिन्न-भिन्न परिस्थितींत निर्माण केलेला माल ज्याप्रमाणें कारखानदार विक्रीसाठी बाहेर काढतात आणि बाजारांत मांडतात, त्याचप्रमाणें निरनिराळ्या वर्गांतलीं व स्थितींतलीं माणसें आणि संस्था आपली शिलकी संपत्ति, भांडवलाच्या स्वरूपांत, सुरक्षितता व व्याज ह्यांच्या उद्देशानें, कर्जाऊ देण्यास तयार असतात. पैशावरील व्याज आणि कर्जाची मुदत ह्या विषयींच्या त्यांच्या कल्पना व अपेक्षा भिन्न-भिन्न असतात. ठराविक मुदतीच्या आणि व्याजाच्या करारानें तात्काळ जरुर नसलेली आपली संपत्ति, पैशाच्या स्वरूपांत दुसऱ्यास वापरावयास देण्यास जसे कांहीं लोक नेहमी तयार असतात, तशाच रीतीनें दुसऱ्या कित्येक व्यक्तींस भांडवलाची जरूर असते आणि ते लोक पैसा कर्जाऊ मिळण्याचे मार्ग शोधीत असतात. पक्क्या मालाची विक्री होऊन त्याची किंमत हातीं पडेतोंपर्यंत कारखानदारांस आपला उद्योग चालू ठेवण्यास खेळतें भांडवल हवें असतें आणि व्यापाऱ्यांसहि

अशाच रीतीनें वापरावयास पैसा पाहिजे असतो. मुदत व द्यावयाच्या व्याजाचा दर, ह्याविषयींच्या त्या लोकांच्या अपेक्षा भिन्न असल्या तरी वर वर्णिलेल्या शिलकी संपत्तीमधूनच त्यांची गरज भागवावयाची असते. आपला पैसा गुंतवूं इच्छिणारे व त्या पैशाबद्दल कर्जाऊ मागणी करणारे, अशा दोन प्रकारच्या लोकांचा समुच्चय बनतो आणि त्यास "पैशाचा बाजार" ( मनी-मार्केट ) असें म्हणतात. विशिष्ट वेळीं आणि टापूंत, पैशाविषयींच्या पुरवठा-मागणीच्या परस्पर-संबंधास अनुसरून भांडवलाची किंमत म्हणजे व्याजाचा दर ठरतो, आणि पैशाचे बाजार आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय आणि स्थानिक अशा स्वरूपाचे बनतात.

## पैसा, सरकार व मध्यवर्ती बँका

प्रत्येक देशांत तेथील सरकार आणि मध्यवर्ती बँक ह्यांचा पैशाच्या बाजाराशीं निकट संबंध येतो. इतर संस्थांप्रमाणें सरकारांस उत्पन्न व खर्च हीं असतात आणि नडीअडीच्या प्रसंगीं जादा पैशाची तात्पुरती जरूर भासते. त्यांचा पैसा मध्यवर्ती बँकांच्या मार्फत बाजारांत येतो व त्यास त्यांची मोठी मागणीहि असते. एका बाजूनें सरकारांचा खर्च सारखा चाललेला असतो, पण त्या प्रमाणांत उत्पन्न सारखें येत नसतें. ह्यामुळें, त्यांस तात्पुरती गरज भागवण्यासाठी पैसा कर्जाऊ घ्यावा लागतो. मध्यवर्ती बँकेकडून हात-उसन्या रकमा घेणें किंवा अल्प मुदतीच्या हुंड्या ( ट्रेझरी बिल्स ) काढून तो वेळोवेळ उभा करणें ह्या मार्गांचा त्यांस अवलंब करावा लागतो. पैशाच्या बाजाराचें नियमन करणें हें मध्यवर्ती बँकेचें तर मुख्य काम आहे. व्यापारी व्यवहारांस किती पैशाची जरुर आहे आणि ती भागण्यास चलन आणि विनिमय-साधनें यांचा किती पुरवठा उपलब्ध आहे, ह्याचें सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण करून आपल्या हातांत असलेल्या साधनांच्या सहायानें पैशाच्या बाजाराचा योगक्षेम सुरळीत चालेल, अशी व्यवस्था करण्याची जबाबदारी त्या बँकेवर असते. राष्ट्रीय चलनाचा, त्याच्या कायदेशीर परिमाणाशीं ( विशिष्ट वजनाचें सोनें ) संबंध अबाधित राखणें, सोन्याची ठराविक किंमतीनें खरेदी-विक्री करणें, परराष्ट्रीय हुंडणावळीच्या दरांत विशेष चलबिचल होऊं न देणें, बाजारभावांत होणाऱ्या चढउताराचें नियमन करणें, सरकारास जरूर असलेला पैसा पुरविणें इत्यादि महत्त्वाच्या बाबी मध्यवर्ती बँकेच्या कार्यक्षेत्रांत येत असल्यानें तिच्या कारभाराचा परिणाम पैशाच्या बाजारावर सतत आणि दृश्य व अदृश्य रीतीनें सारखा होत असतो.

## अल्प आणि लांब मुदतीचीं कर्जें

बाजारांत उपलब्ध असलेल्या भांडवलापैकीं कांहीं, लांब मुदतीच्या करारानें उपयोगांत आणतां येईल, अशा रीतीनें कर्जाऊ दिलें-घेतलें जातें. उद्योगधंद्यांच्या मंडळया आणि जमीन-गहणाच्या मंडळया आणि बँका, राष्ट्रीय व स्थानिक सरकारें ह्यांस पैसा लागतो, तो थोडक्या अवधींत ( पांच-चार वर्षांत सुद्धां ) परत करतां येईल अशी त्यांची व त्यांच्या कामाची स्थिति नसते. रेलवेज, कारखाने, पाणी—पुरवठा, इमारती इत्यादि कार्यांत गुंतलेला पैसा अनेक वर्षें अडकून पडणें अपरिहार्य असतें आणि हें भांडवल लांब मुदतीच्या परत फेडीच्या करारानें कर्जाऊ घ्यावें लागतें. ह्या संबंधांतल्या पैशाचा पुरवठा व त्याबद्दलची मागणी ह्यांची परिस्थिति विशिष्ट प्रकारची असते. आपला पैसा वर्षानुवर्ष अडकून पडला तरी चालेल, त्याचें मुद्दल सुरक्षित रहावें आणि त्यावर चांगलें आणि निश्चित व्याज सुटावें अशी कित्येक लोकांची इच्छा असते. त्यांचा पैसा वरील प्रकारच्या कार्यांस उपयोगी पडतो. पैशाच्या स्वरूपांत खेळत असलेली संपत्ति, विशिष्ट टापूंत, विशिष्ट वेळीं एकवटली, असें मानलें, तर ह्या भांडवलाच्या संचयांतून अल्पमुदतीच्या करारानें किती उपयोगिली जाते व लांब मुदतीच्या करारानें किती गुंतते, हें स्थल-कालास अनुसरून निश्चित होतें. उद्योगधंद्यांची चलती असेल तर त्यांकडे पैशाचा ओघ वळतो; आणि मंदीच्या काळांत भांडवल निकामी रहातें व अल्पमुदतीच्या करारानें तें कर्जाऊ देण्यास लोक तयार होतात. भांडवला-संबंधांतल्या मागणी-पुरवठ्यास अनुसरून व्याजाचे दर निश्चित होतात, हें जसें खरें आहे, तसेंच व्याजाचे दर कमी-ज्यास्त असतील त्या मानानें पैशाचा पुरवठा कमी होतो व वाढतो हेंहि खरें आहे. मध्यवर्ती बँकेच्या कार्याचा ह्या बाबतींत कसा परिणाम घडून येत असतो, हें मागें सांगितलें आहे, तें येथें ध्यानांत बाळगणें आवश्यक आहे.

## "पैशाचा बाजार" आणि "भांडवलाचा बाजार"

'भांडवलाचा बाजार' आणि 'पैशाचा बाजार' असा फरक केला जातो, त्याच्या मुळाशीं कर्जाची मुदत मोठी कीं अल्प, हाच विकल्प असतो. 'पैशाचा बाजार' किंवा 'मनी मार्केट' ह्यामध्यें अल्प मुदतीपुरता वापरावयाचा

पैसा खेळतो. वर सांगितल्याप्रमाणें, हे दोन बाजार परस्पर-संबद्ध असतात, आणि व्याजाच्या दरास अनुसरून, एकांतून दुसऱ्यांत पैसा जातो. "पैशाच्या बाजारा"चा विचार कर्तव्य असतां, त्यांत अल्पमुदतीच्या पैशाचीच देव-घेव होते, हें लक्ष्यांत ठेवावें. बँका व त्यांचीं गिऱ्हाइकें आणि मध्यवर्ती बँक व व्यापारी बँका त्यांचे दरम्यान कर्जाच्या देण्याघेण्याचे जे व्यवहार चालतात, त्यांचे योगानें मुख्यत्वेंकरून पैशाच्या बाजारांत मागणी-पुरवठ्याचा मेळ बसतो. आमच्या "हिंदुस्थानची रिझर्व्ह बँक" ह्या पुस्तकांत "पैशाच्या बाजारा"चें सविस्तर विवेचन केलें असून, चलन, हुंड्या, सत्कारावा धंदा, डिस्कौंट, रीडिस्कौंट इत्यादि विषयांसंबंधीं तपशीलवार माहिती दिली आहे, तिकडे वाचकांचें लक्ष येथें आम्ही वेधूं इच्छितों. ह्या बाजारांत व्यवहार प्रत्यक्ष कसे चालतात हें तेथील वर्णनावरून नीट समजेल आणि त्या विषयांचा विस्तार, प्रस्तुत स्थळीं करणें शक्य आणि आवश्यकहि नाहीं. पैशाचा बाजार रोखे-बाजाराप्रमाणें विशिष्ट-स्थल-मर्यादित नसतो. इच्छित रोख्याची खरेदी-विक्री कोठें होते हें निश्चित असतें. पैशाच्या बाजारांत अनेक बँका, मंडळ्या व धंदेवाले ह्यांचा अंतर्भाव होत असल्यामुळें त्याचा विस्तार मोठा असतो. मुंबईच्या रोख्यांच्या बाजाराची इमारत आणि अनेक बँकांच्या कचेऱ्या असलेले त्याच्या आसपासचे रस्ते, हीं ध्यानांत आणलीं असतां, हा फरक तात्काळ समजेल. पैशाच्या बाजारांतील मागणी-पुरवठा आणि व्याजाचे दर ह्यांची चर्चा वर आली आहे. तथापि, येथें हें सांगणें आवश्यक आहे कीं, देशांत व परदेशांत होणाऱ्या भिन्न-भिन्न अनेक घडामोडींचा ह्या बाजारावर सतत, म्हणजे दर घटकेस, परिणाम होत असतो, इतकी नाजुक त्याची प्रकृति असते. सरकार किंवा मोठमोठ्या व्यापारी व औद्योगिक मंडळ्या ह्यांस व्याज आणि डिव्हिडंड वांटावयाचें असतें, अशा वेळीं, पैशास एकाएकीं मोठी मागणी येऊन व्याजाचे दर कडकतात. पैशाची ह्या तऱ्हेनें वांटणी झाली म्हणजे तो जनतेच्या मार्फत बँकांमध्यें पुन्हां जमा होतो व बाजारांतला त्याचा पुरवठा वाढतो. सरकार कर्ज काढण्याच्या तयारींत असतें, तेव्हां मध्यवर्ती बँकेच्यामार्फत पैशाचा पुरवठा विपुल राहील अशी व्यवस्था तें करतें, ह्याचें रहस्य निराळें स्पष्ट करून सांगण्याचें प्रयोजन नाहीं. शेतीचा माल तयार होऊन त्याचा उठाव होत असतां त्याची किंमत शेतकऱ्याच्या पदरांत टाकण्याकरतां पैसा मोठ्या प्रमाणावर लागतो व ह्या मोसमांत पैशाची चणचण होते आणि व्याजाचे दर चढतात. रोखे-बाजारांत वळणाचे

वेळीं जादा पैशाचा पुरवठा जरूर असतो. सोन्याची आयात-निर्गत आणि परदेशांतल्या पैशाच्या बाजारांची परिस्थिति ह्यांचाहि राष्ट्रीय बाजारावर परिणाम घडत असतो. कारण, पैशाचा, एक प्रकारचा, आंतरराष्ट्रीय बाजारहि बनतो.

## पैशाच्या हालचालींचा अहवाल

व्याजाचे दर आणि पैशाचा पुरवठा ह्यांविषयीं दैनिक पत्रांत रोजची बातमी प्रसिद्ध होते, आणि पैशाच्या बाजारांतील घडामोडींचें साप्ताहिक सिंहावलोकन, त्यासंबंधांतले तज्ज्ञ दर आठवड्यास करीत असतात. असल्या वृत्तांताबरोबर जरूर त्या आंकड्यांचे ठराविक रीतीचे तक्तेहि देण्यांत येतात. पैशाच्या बाजारांतील हालचालींच्या वृत्तपत्रीय लिखाणाचे पांच-सहा नमुने खालीं दिले आहेत.

## ( १ )

## लंडनमधील पैशाचा बाजार

लंडनः ता. २५—क्लिअरिंग हाउसशीं जोडलेल्या दोन बँकांनीं अत्यल्प मुदतीनें कर्जाऊ दिलेला पैसा परत घेतला, व त्यामुळें पैशास थोडी तेजी आली. एक-दिवस-मुदतीच्या कर्जांचे व्याजाचे दर १$\frac{१}{२}$ ते १$\frac{३}{४}$ टक्के ह्यांचे दरम्यान राहिले. एक दिवसाच्या बोलीनें दिलेलीं कर्जें १$\frac{१}{२}$ टक्क्यानें चालू ठेवण्यांत आलीं. हुंडी-बाजारांत विशेष हालचाल झाली नाहीं, कारण हुंड्यांस म्हणण्यासारखी मागणी नव्हती. थोड्या मुदतीच्या हुंड्यांचे कांहीं व्यवहार २$\frac{१}{३२}$ % ते २$\frac{१}{१६}$ % ह्या दरानें झाले, व त्या हुंड्यांचे डिस्कौंटचे दर २$\frac{१}{१६}$ ते २$\frac{३}{३२}$ असे होते.

| | | | |
|---|---|---|---|
| बँकरेट | ३ % | २ महिने मुदतीच्या हुंड्या | २$\frac{१}{३२}$, २$\frac{१}{१६}$ % |
| दैनिक कर्जें ,, ,, | १$\frac{१}{२}$, १$\frac{३}{४}$ % | ३ महिने ,, ,, | २$\frac{१}{१६}$, २$\frac{३}{३२}$ % |
| साप्ताहिक मुदत ,, | २ % | ४ महिने ,, ,, | २$\frac{१}{२}$, २$\frac{३}{१६}$ % |
| ठेवी, बँकांच्या | १ % | ६ ,, ,, ,, | २$\frac{३}{१६}$, २$\frac{१}{४}$ % |
| ,, दलालांच्या ( बिन-मुदत ) | १ % | ३ ,, ,, व्यापारी हुंड्या | ३, ३$\frac{१}{२}$ % |
| ,, सूचनेबरहुकुम परत व्हावयाच्या | १$\frac{१}{२}$ | ४ ,, ,, ,, | ३$\frac{१}{४}$, ३$\frac{१}{२}$ % |
| | | ६ ,, ,, ,, | ३$\frac{१}{२}$, ४ % |

## ( २ )

## जर्मनींतले बाजार

बर्लिनः १९ फेब्रुआरी— एक रोज-मुदतीच्या पैशाचा बाजार उघडला, तेव्हां सकाळीं प्रारंभास पहिल्या प्रतीच्या बँकांनीं, परस्परांपासून घेतलेल्या कर्जासाठी ६–६¼ टक्के व्याज दिलें आणि दुसऱ्या प्रतीच्या संस्थांस ७½ टक्के द्यावे लागले. बारा वाजण्याचे सुमारास दरांमध्यें ½ टक्क्याचा उतार झाला, ह्याचें कारण, सरकारी व निमसरकारी खात्यांमध्यें आदल्या दिवशीं करांच्या वसुलीचा पैसा जमला होता, तो बाजारांत जास्त प्रमाणांत आला, हें असावें असें वाटतें. प्रमुख बँकांनीं स्वीकारलेल्या हुंडया बाजारांत मोठ्या प्रमाणांत आल्यानें मध्यवर्ती बँकेनें ६ टक्क्यांपर्यंत दरानें व्यवहार केले. हा दर कां वाढवण्यांत आला, तें समजणें कठिण आहे. राइशबँकेस हुंड्यांच्या मार्गानें परदेशांत जाणाऱ्या पैशास प्रतिबंध करावयाचा होता, असा कित्येकांचा तर्क आहे. ह्या कल्पनेंत तथ्य असलें, तरी सदरहु उपाय राइशबँकेचा हेतु साध्य होण्यास कितीसा सहायकारक होईल, ह्याची शंका प्रदर्शित करण्यांत येत आहे. लंडन व न्यूयार्क येथील बाजारांतले व्याजाचे दर लक्षांत घेतां, येथील बँकांचा ५⅜ टक्क्यांचा दर योग्य नाहीं, असें मध्यवर्ती बँकेस वाटत आहे. हें कांहीं असलें, तरी जर्मनीचा पैशाचा बाजार अस्थिर आणि आकुंचित आहे, ही गोष्ट स्पष्ट दिसत आहे. गेल्या आठवड्यांत ५⅜% दरानें हुंड्या मिळत नव्हत्या; आज एक कोटि मार्क बाजारांत येऊनहि दर ६% टक्के होत आहे.

## ( ३ )

फ्रांकफूर्ट ( अ. मा. ):—एक-रोज-मुदतीचा पैसा विपुल खेळत होता. एक महिन्याच्या मुदतीचा दर कायम राहिला. हुंडी बाजारांत, मालावरच्या हुंड्या चढीच्या दरानें खरेदल्या गेल्या. कालच्याप्रमाणेंच आज एक दिवसाच्या मुदतीच्या पैशाचा दर ५% होता; महिन्याच्या बोलीच्या खुल्या पैशाचा दर ६⅜%, तारणावरच्या कर्जाचा दर ७–७½%, बँकेची सही असलेल्या मालावरच्या हुंडीचा दर ६¼, ह्याप्रमाणें बाजाराची परिस्थिति होती.

( ४ )

## लंडनचा बाजार

लंडन;—शुक्रवार संध्याकाळ, ता. २६ जुलै, १९३५.

बँकरेट २%, ३० जून १९३२.

| ठेवींचे दर | | टेंडरचे दर |
|---|---|---|
| बँका:— ... ... | ½% | ३ महिने मुदतीच्या ‘ट्रेझरी हुंड्या’: |
| दलाल:—( मागणीबरहुकूम परत-फेडीचीं कर्जें ) ... | ½% | ० पौंड, १० शि. ९·७७ पेन्स % |
| ” ( परतफेडीच्या सूचनेची शर्त ) ... | ¾% | |

आज ट्रेझरी बिलांविषयींच्या मागणीचीं टेंडरें देण्यांत आलीं, तेव्हां डिस्कौंटचा दर अनपेक्षित रीतीनें खाली आला आणि त्यामुळें सरकारला अगदी हलक्या दरानें पैसा मिळाला. परदेशांतून पैशाचा पुरवठा झाल्याची बोलवा होती व हुंड्यांस विशेष मागणी येण्यास तो कारणीभूत झाला असावा. तथापि, बाजारांत ट्रेझरी बिलांस फक्त ५ कोटि, ६८ लक्ष पौंडांची मागणी होती व हा आंकडा पूर्वीच्या आठवड्याच्या रकमेपेक्षां १ कोटि, १ लक्ष पौंडांनीं कमी होता. ४ कोटि पौंड किंमतीचीं टेंडरें शेकडा १० शिलिंग ९·७७ पेन्स ह्या भावानें स्वीकारलीं गेलीं. पूर्वीच्या आठवड्यांत हा दर १२ शिलिंग २·८४ पेन्स इतका होता.

डिस्कौंटचे दर नरम होते. ‘नवीं’ ट्रेझरी बिल्स, एक आठवड्यानें व्यवहार पुरा व्हावयाच्या बोलीनें ½ टक्क्यानें विकत घेण्यास लोक तयार होते. परंतु बाजाराची ह्या संबंधांतली गरज हवी तशी भागली असल्यानें विक्रीस कोणीहि कबूल होईना. क्लिअरिंग बँकांनीं ½% दरानें अल्प मुदतीच्या हुंड्या थोड्या प्रमाणांत खरेदी केल्या; पण आक्टोबरमध्यें फेड व्हावयाच्या हुंड्या सध्याच्या म्हणजे 9/16 टक्क्यानें त्यांस मिळूं शकल्या नाहींत.

अल्प मुदतीच्या कर्जाबाबतची स्थिति समाधानकारक होती. एक

दिवसाच्या मुदतीचीं कर्जें १/२% टक्क्यानें सहज मिळत होतीं, आणि ह्या जातीचीं जुनीं कर्जें नेहमीच्या अटींवर चालू ठेवण्यांत आलीं.

| कर्जें ( दर टक्के ) | | डिस्कौंटचा दर ( दर शेकडा ) | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | बँक हुंड्या ( बँक बिल्स ) | | | | श्रेष्ठ व्यापारी हुंड्या | |
| एक रोजा-ची मुदत. | अल्प मुदतीची | २ महिने | ३ महिने | ४ महिने | ६ महिनें | ३ महिने | ६ महिने |
| १/२ | १/२ | १/२–९/१६ | ९/१६–५/८ | ५/८ | ११/१६–१३/१६ | २–२ १/२ | २ १/२–३ |

( ५ )

## मुंबईचा बाजार

मुंबई: साप्ताहिक वृत्तांत:—स्टर्लिंग हुंड्यांचीं सर्व टेंडरें नापसंत करण्यांत आलीं, तरी गेल्या आठवड्यांत पूर्वीच्या आठ दिवसांच्या मानानें पैशाच्या बाजारांत म्हणण्यासारखा कांहींच फरक पडला नाहीं व त्यांत स्थैर्याची परिस्थिति टिकून राहिली. मागणीबरहुकूम परत द्यावयाच्या पैशाचा दर ( कॉल रेट ) ३/४% ला उघडला आणि १ १/४% पर्यंत वर जाऊन १% वर स्थिरावला. आठवड्याच्या मध्यास दर थोडा चढला, ह्याचें कारण रोखे बाजारांतील पटावटीचे वेळीं पैशास आलेली मागणी हें होय. सहा महिन्यांपेक्षां कमी मुदतीच्या ठेवी स्वीकारण्यास बँका तयार नसल्यानें व्याजाचे दर थोडे सैलावले होते. विशेषत: आठवड्याचे अखेरीस, सहा महिने किंवा अधिक मुदतीच्या ठेवींव्यतिरिक्त इतर ठेवींस १ १/२ टक्क्यांवर व्याजाचा दर मिळणें ह्यामुळें अशक्य झालें.

( ६ )

मुंबई—साप्ताहिक वृत्तांत—१९ ऑगस्ट, १९३५: सर्व आठवडाभर पैशाचा पुरवठा भरपूर होता. रोखेबाजारांतील पटावटीमुळें बँकांच्या परस्पर-कर्जांच्या व्याजाचा दर तात्पुरता १ १/२% पर्यंत चढला होता. एरव्हीं सामान्यत: तो १% च्या आसपास राहिला. अल्पमुदतीच्या ठेवी घेण्यास बँका तयार नाहींत. बँकरेट ३ १/२% कायम आहे. रिझर्व्ह बँक व इंपीरिअल बँक ऑफ इंडिया ह्यांच्या साप्ताहिक पत्रकांत फारसा फेरबदल दिसून

आला नाहीं. खेळत्या नोटांच्या किंमतींत २ कोटि रुपयांची वाढ झाली. रिझर्व्ह बँकेच्या बँकिंगच्या विभागांत रोख्यांत गुंतवलेली रकम १६ लक्ष रुपयांनीं वाढली आणि इंपीरिअल बँकेच्या गुंतवलेल्या रकमेंत ४० लक्ष रुपयांचा वाढावा झाला. हीं पत्रकें सरकारचें नवें कर्ज निघाल्यानंतर लगेच प्रसिद्ध झालेलीं असल्यानें, त्यांवरून असें दिसतें कीं, दोन्हीं बँकांस रोकडीच्या मोबदला फारच थोड्या किंमतीचे नवीन कर्जाचे रोखे मिळाले असले पाहिजेत.

## महत्त्वाचे विषय

पैशाच्या बाजारांतील हालचालींच्या वृत्तांतांचे नमुने वर उद्धृत केले आहेत, त्यांवरून असें दिसून येईल कीं, एक दिवसापासून सहा महिने मुदतीचीं तात्पुरतीं कर्जें कशीं दिलीं-घेतलीं जातात आणि त्यांच्या परिस्थितींत वेळोवेळ काय फरक घडून येतात ह्याची व त्यांतल्या कार्य-कारणपरंपरेची त्यांमध्यें हकीकत असते. त्या वर्णनांतील प्रमुख बाबींचें आतां स्पष्टीकरण करूं. ह्या अहवालांत लक्षांत ठेवण्यासारख्या गोष्टी आहेत त्या अशाः ( १ ) बँका परस्परांकडून एक दिवसाचीं कर्जें घेतात, त्यासंबंधांतल्या पैशाचा पुरवठा व त्याच्या व्याजाचा दर, ( २ ) हुंडीबाजारांत डिस्कौंटचा धंदा करणाऱ्या मंडळ्या व व्यक्ति ह्यांस, याच रीतीनें केव्हांहि परत देण्याच्या बोलीनें पुरवलेला पैसा, ( ३ ) एक आठवठा, एक महिना व त्यापेक्षां ज्यास्त मुदतीचीं कर्जें, ( ४ ) हुंड्यांसंबंधाचे डिस्कौंटचे व निरनिराळ्या प्रकारच्या व्याजाचे दर, ( ५ ) सरकारनें काढलेल्या ट्रेझरी बिलांत बँका व हुंडीबाजारांतले धंदेवाले रकमा गुंतवतात, त्यांचे दर, ( ६ ) आकर्षक व्याजाच्या दरामुळें व इतर कारणांनीं व्याजी लागण्या-साठी देशांतून बाहेर जाणाऱ्या आणि बाहेरून देशांत येणाऱ्या रकमा, ( ७ ) पैशाची आयात व निर्गत ह्यांसंबंधांत मध्यवर्ती बँकेचे बँक रेट व डिस्कौंट रेट ह्यांविषयींचें नियंत्रणकारक धोरण, ( ८ ) बँकांची, ठेवी स्वीकारणें किंवा नाकारणें ह्याबद्दलची प्रवृत्ति आणि ठेवींवरील व्याजाजे दर, ( ९ ) सरकारनें काढलेल्या कर्जाचा पैशाच्या बाजारावर परिणाम आणि ( १० ) रोखेबाजारांत होणाऱ्या घडामोडी व देवघेवी यांचा पैशाच्या मागणी-पुरवठ्याच्या परिस्थितीशीं व व्याजाच्या दरांशीं संबंध. पैशाच्या बाजारांतले रिवाज निरनिराळ्या देशांत भिन्न–भिन्न असले तरी मुळांत त्यांमध्यें महत्त्वाचें साधर्म्य असतें, त्याचें विवेचन खालीं केलें आहे.

## एक दिवसाच्या मुदतीचीं कर्जें

चोवीस तासांच्या मुदतीचीं कर्जें व्यापारी बँका एकमेकांस देतात

आणि हुंडीबाजारांत व्यवहार करणारे दलाल आणि संस्थाहि त्यांच्याकडून ह्या पद्धतीनें पैसा घेतात. प्रत्येक दिवशीं आज आपल्या हातांत किती पैसा असला पाहिजे, ह्याचा अंदाज प्रत्येक बँक करीत असते. फाजील पैसा जवळ फुकट पडूं देऊन नुकसान करून घ्यावयाचें नाहीं, ह्या धोरणानें त्या दिवसानुदिवस ह्या तऱ्हेनें पैसा व्याजी लावतात. ज्यांचेपाशी एखादे दिवशीं जरूरीच्या मानानें कमी पैसा असतो, त्या बँका दुसऱ्या कडून तात्पुरतें कर्ज घेतात. हुंडी-दलालांस हेंच करावें लागतें आणि ते पैसा कोठें मिळण्यासारखा आहे, ह्याच्या शोधांत राहून एका बँकेकडून दुसऱ्या बँकेकडे दररोज जातात. पहिल्या प्रतीच्या बँका कर्जाबद्दल एकमेकांपासून कर्जरोख्यांचें तारण घेत नाहींत आणि देण्या-घेण्याची वजावाट ‘ क्लिअरिंग हौस ’च्या मार्फत होते. इतरांस कर्जरोखे किंवा मंडळ्यांचे भाग तारण ठेवावे लागतात. त्यांवरील कर्जाचा जो व्याजाचा दर असतो त्यास ‘ कर्जाचा दर ’ ( लोन रेट ) म्हणतात. दोन—तीन महिन्यांच्या हुंड्यांच्या तारणावरील कर्जाच्या व्याजास ‘ डिस्कौंट रेट ’ म्हणतात. साप्ताहिक व अर्ध-मासिक कर्जासंबंधानेंहि वर सांगितलेल्या पद्धतीचा अवलंब करण्यांत येतो. महिन्याच्या बोलीनें कर्ज घेणारांमध्यें दुसऱ्या प्रतीचे लोक असतात, त्यांस तारण द्यावें लागून पहिल्या प्रतीच्या लोकांसारख्या सवलती मिळत नाहींत. रोखेबाजारांतील धंदेवाल्यांस आणि सट्टेबाजांस पटावटीच्या आणि बदल्याच्या वेळीं पैशाच्या बाजारांत पंधरा दिवसांच्या किंवा महिन्या-दोन महिन्यांच्या मुदतीनें कर्जें घ्यावीं लागतात.

## निरनिराळ्या हुंड्यांचे दर

ज्यांच्या संबंधांत वेळेवर बिनचुक फेड होण्याची खात्री असते, अशा हुंड्यांस ‘ पहिल्या प्रतीच्या’ हुंड्या, ‘फाइन बिलें ’ किंवा ‘ बँक बिलें ’ असें म्हणतात. त्यांस नेहमी चांगली मागणी असते व त्यांवरील व्याजाचा दर (‘ डिस्कौंट ’ रेट ) बेताचा असतो. मध्यवर्ती बँकेचा व्याजाचा दर ( बँक रेट ) असतो, त्यापेक्षां ह्या हुंड्यांचा दर हलका असतो. जर्मनींत त्यांस ‘ प्रिव्हाट डिस्कॉंटेन् ’ म्हणतात. दुसऱ्या दर्जाच्या हुंड्यांचा दर ( ट्रेड बिल्स ) जरा अधिक असतो. मालाच्या तारणावर काढलेल्या व बँकांनीं सत्कारलेल्या हुंड्यांच्या व्याजाचा दरहि बँकरेटपेक्षां हलका असतो. बाजारांत पैशाची चणचण असते, तेव्हां ह्या प्रकारच्या हुंड्यांचा दर

कित्येक वेळां बँकरेटच्या वर चढतो. बँका चांगल्या प्रतीच्या हुंड्यांच्या तारणावर दलालांस कर्जाऊ पैसा देतात, किंवा त्या स्वतःच विकत घेतात म्हणजे डिस्कौंट करतात. आपल्या गिऱ्हाइकांकरितां हुंड्या सत्कारण्याचा व्यवहार कित्येक वेळां बँका करतात किंवा हाच स्वतंत्र धंदा करणाऱ्या खाजगी पेढ्या व संस्था असतात. सत्कारलेल्या हुंड्यांस बाजारांत मान्यता असते व हुंडी-दलालांस त्यांच्या तारणावर पैसा कर्जाऊ घेणें सोपें जातें. कारखानदार आपला माल• परस्थांस विकून त्याच्या किंमतीच्या हुंड्या काढतात व त्या बँकांकडून अथवा असला धंदा करणाऱ्या संस्थांकडून डिस्कौंट करून घेतात, म्हणजे त्यांस विकतात. हुंडीच्या मुदतीचें व्याज कापून घेऊन बँका व दलाल कारखानदारांच्या व व्यापाऱ्यांच्या खात्यांस तो पैसा जमा करतात. हा व्याजाचा दर बाजारांतील पैशासंबंधांतल्या मागणी-पुरवठ्याची वेळोवेळ परिस्थिति असेल, त्याप्रमाणें कमी-ज्यास्त होतो. परदेशांत पाठवावयाच्या किंवा तिकडून देशांत येणाऱ्या मालाच्या हुंड्या दोन किंवा तीन महिने मुदतीच्या असतात. हींच मुख्यत्वेंकरून 'ट्रेड बिल्स' होत. आयात करणारा व्यापारी, परदेशांतून स्वतःकडे निर्गत करणाराची हुंडी ( जहाजाचे व इतर कागदपत्र ह्यांसह ) दाखल झाली असतां ती बँकेनें 'सत्कारावी' अशी अगाऊ व्यवस्था करतो, आणि ह्या सत्कारलेल्या हुंडीस बाजारांत हमखास मागणी असते, हें वर सूचित केलेंच आहे. त्या व्यवस्थेनें माल निर्गत करणाऱ्या व्यापाऱ्याच्या हुंडीचा पैसा डिस्कौंटच्या पद्धतीनें स्वदेशांत उभा करण्याची सोय होते आणि आयात करणाऱ्या व्यापाऱ्यासहि मालाच्या किंमतीची तरतूद करण्यास सवड मिळते. वर दिलेल्या तक्त्यांमध्यें निरनिराळ्या प्रकारांच्या व मुदतींच्या हुंड्यांचे व त्यांच्या डिस्कौंटचे दर नमूद केले आहेत, त्यांचें रहस्य काय आहे, ह्याची फोड प्रस्तुत विवेचनानें होईल.

## हिंदुस्थानांतील हुंड्यांचे दर

हिंदुस्थानांतील अंतर्गत व्यापारांत उद्भवणाऱ्या हुंड्यांचा व्यवहार मुख्यत्वेंकरून सराफांच्या ( श्रॉफ ) हातांत आहे. पैशाची चणचण झाली असतां व्यापारी बँकांकडून ते पैसा उचलतात. व्यापारी बँका ( इंपीरिअल बँक ऑफ इंडिया देखील ) हुंडीचा धंदा करतात. परराष्ट्रीय ( आयात-निर्गत ) व्यापारास पैसा पुरवणें, त्यांतल्या हुंड्या देणें व घेणें, हा

व्यवहार,त्यांचा धंदा सर्व जगभर चालत असल्यानें, बहुतेक सर्वस्वी एक्सूचेंज बँकांचे हातांत आहे. या परिस्थितीमुळें हिंदुस्थानांतला पैशाचा बाजार अत्यंत विस्कळित असून व्याजाच्या दरांत एकसूत्रीपणा येणें येथें अत्यंत कठिण आहे. एकमेकांपासून अलग असलेले निरनिराळे पैशाचे बाजार ह्या देशांत चालतात आणि डिस्कौंटचे व व्याजाचे दरहि भिन्न-भिन्न असतात. ह्या विषयाचें विस्तृत विवेचन आमच्या ‘ हिंदुस्थानची रिझर्व्ह बँक’ ह्या पुस्तकांत केलें आहे, तें पहावें, अशी वाचकांस सूचना आहे. राष्ट्राची मध्यवर्ती बँक ह्या नात्यानें, देशांत पैशाचा म्हणजे भिन्न-भिन्न स्वरूपांतील विनिमय-साधनांचा पुरवठा, त्याचें प्रसरण आणि आकुंचन जरूरीप्रमाणें होईल, अशा रीतीनें नियंत्रित करणें, ही रिझर्व बँकेची मुख्य कामगिरी समजली पाहिजे; आणि आमच्या पैशाच्या बाजारांतील प्रांतिक व स्थानिक तुटकपणा लक्षांत घेतां, ती त्या संस्थेच्या हातून कशी पार पडेल, हा प्रश्न आज चिंतनीय झाला आहे. १९३३-३४ सालांतील परिस्थिति येथें उदाहरणार्थ घेऊं. ह्या वर्षी बँकरेट ( रिझर्व्ह बँक त्या वेळीं अस्तित्वांत आली नसल्यानें, सरकारी कर्जरोख्यांच्या तारणावर द्यावयाच्या कर्जाचा इंपीरिअल बँकेचा व्याजाचा दर ) ३$\frac{1}{2}$ टक्के बाराहि महिने कायम होता. मागणीबरहुकूम परतफेडीच्या करारानें दिलेल्या कर्जाचा दर ( कॉलमनीरेट ) कलकत्त्याच्या बाजारांत $\frac{1}{2}$ ते $\frac{3}{4}$ टक्का कमीजास्त होत होता; परंतु मुंबई बाजारांत कधीं $\frac{1}{2}$ टक्का, कधीं $\frac{3}{4}$ टक्का, तर कधीं २ आणि कधीं २$\frac{3}{4}$ टक्के ह्याप्रमाणें वरखाली जात-येत होता. तीन महिने मुदतीच्या पहिल्या प्रतीच्या हुंड्या डिस्कौंट किंवा रीडिस्कौंट करण्याचा इंपीरिअल बँक ऑफ इंडियाचा दर ३$\frac{1}{2}$ टक्के अबाधित राहिला. लहान-सहान व्यापाऱ्यांच्या हुंड्या डिस्कौंट करण्याचा सराफांचा दर ( बझार बिल-रेट ) कलकत्त्यांत वर्षभर ६–७ टक्के होता; पण मुंबईच्या बाजारांत कधीं २$\frac{1}{4}$ टक्के, कधीं ४$\frac{1}{2}$ टक्के व कधीं ६ टक्के ह्याप्रमाणें तो हेलकावे खात राहिला. एक्सूचेंज बँकांचे हुंड्यांचे दर अगदीं स्वतंत्र असतात, हें येथें नमूद केलें पाहिजे.

## ट्रेझरी बिलें

तिजोरींत जमा होणारें उत्पन्न व खर्चाकरितां बाहेर जाणारा पैसा ह्यांचा सारखा मेळ बसवण्यासाठी सरकारास ‘ ट्रेझरी बिल्स ’ च्या साधनानें तीन महिन्यांच्या मुदतीनें लोकांकडून तात्पुरता कर्जाऊ पैसा घ्यावा

लागतो, याचा उल्लेख वर आलेला आहे. ट्रेझरी-बिलांचे पैसे दर आठवड्यास टेंडर मागवून घेणें व मुदत संपतांच परत करणें ह्या सरकारी उलाढालीचा, पैशाच्या बाजारावर महत्त्वाचा परिणाम घडून येत असतो. रिकामा पैसा गुंतवण्यास बँकांस ट्रेझरी-बिलें हें उत्तम साधन होतें. पैशास अलीकडे दुसरीकडे वाव नसल्यामुळें सरकारास अत्यंत अल्प दरानें ट्रेझरी बिलें विकतां आलीं आहेत. १९३३–३४ सालाचें उदाहरण पुन्हां घेतल्यास असें दिसून येतें कीं, त्या वर्षांत हिंदुस्थान सरकारनें एकूण ११२ कोटि रुपयांचीं ट्रेझरी बिलें विकलीं व सुमारें १०५ कोटि रुपयांच्या बिलांचा पैसा मुदतअखेर परत केला. वर्षाचा सरासरीचा व्याजाचा दर द. सा. द. शे. १·६२ टक्के पडला. एप्रिल ते जुलै, १९३३ मध्यें व्याजाचा दर १ ते १¼ टक्का होता आणि नोव्हेंबर, १९३३ ते मार्च, १९३४ या अवधींत २ ते २½ टक्के ह्यां सुमारास कमी-जास्त होत होता. चालू सालचा दर पुन्हां फारच हलका आहे, कारण पैशाचा पुरवठा भरपूर आहे. सरकारास मुदतीचें कर्ज काढावयाचें असतें, तेव्हां ट्रेझरी बिलांची विक्री कांहीं आडवडे बंद ठेवून व्यवहारांत पुष्कळसा पैसा खेळूं देतात. अशा स्थितींत व्याजाचा बाजारी दर हलका रहातो आणि सरकारास अनुकूल अटींवर लोकांकडून कर्ज मिळण्यास मदत होते. ट्रेझरी बिलांची विक्री जरूरी प्रमाणें आठवड्यांतून एक पेक्षां अधिक वेळांहि केली जाते आणि टेंडरें मागविण्याऐवजी ठराविक दर जाहीर केले जातात. बाजारांत पैसा कमीजास्त खेळवणें आणि व्याजाच्या दराचें नियमन करणें हें कार्य ट्रेझरीबिलांच्या मार्फत कसें चालतें, ह्याची कल्पना वरील विवेचनावरून सहज येईल.

## आंतरराष्ट्रीय देणीं-घेणीं

पैशाचा बाजार आणि त्यामधील व्याजाचे व डिस्कौंटचे दर, ह्यांचा निकट संबंध आणखी एका महत्त्वाच्या व्यवहाराशीं येतो, तो परराष्ट्रीय हुंडणावळीच्या देवघेवीबाबतचा असतो. हुंड्यांच्या साधनानें परदेशांशीं पैसे देण्याघेण्याचे व्यवहार होतात, त्या संबंधांतले दर वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होतात. त्यांचें रहस्य लक्ष्यांत यावें म्हणून त्यांच्या मुळाशीं असलेल्या तत्त्वाचें त्रोटक विवेचन येथें करणें आवश्यक आहे. मालाच्या खरेदीचे, कर्जफेडीचे किंवा इतर कारणांसाठी स्थानिक व्यक्तीस किंवा संस्थेस पैसे द्यावयाचे असतात, तेव्हां आपण स्वतः किंवा नोकराच्या हस्तें रुपये,

नोटा, चेक किंवा हुंडी ह्यांच्या स्वरूपांत तें देणें देतों. देण्याची रकम पराठिकाणीं पाठवावयाची असल्यास आपण मनीऑर्डरीचा आश्रय करतों किंवा नोटा, चेक अथवा हुंडी पोस्टानें रवाना करतों. देणें-घेणें दोन भिन्न राष्ट्रांतील व्यक्तींमध्यें व्हावयाचें असल्यास मात्र रुपये व नोटा ह्यांचा उपयोग होत नाहीं, कारण हीं चलनें परराष्ट्रांत प्रचलित नसल्यानें तेथें स्वीकारलीं जात नाहींत. मनीऑर्डर, बँकेवरचा चेक अथवा हुंडी ह्या साधनांनीं आंतरराष्ट्रीय देणीं-घेणीं भागवतां येतात. तथापि, एकाच देशांतले अंतर्गत व्यवहार आणि देशां-देशांमधलीं देणीं-घेणीं ह्यांच्यामध्यें एक अत्यंत महत्त्वाचा फरक असतो, त्याकडे लक्ष्य वेधणें आवश्यक आहे.

## राष्ट्रीय चलनाचें सुवर्ण-परिमाण

प्रत्येक देशांत अनेक विनिमय-साधनें वापरांत असलीं तरी कर्ज-फेडीचें कायदेशीर साधन निश्चित असतें आणि इतर चलनें केवळ प्रातिनिधिक किंवा प्रतीकरूप असतात. शंभर रुपयांची नोट व्यवहारांत चालते, तरी तिची किंमत रुपयांत व्यक्त केलेली असते, आणि स्वतः रुपयाचें मोल विशिष्ट वजनाच्या सोन्याइतकें असल्याचें कायद्यानें ठरविलेलें असतें. देशांत खेळणारें नाना प्रकारांचें चलन आणि त्याचा राष्ट्रीय, कायदेशीर किंमतीच्या अंतिम परिमाणाचा संबंध काय असतो, सुवर्ण परिमाण चलन व्यवस्था कशी असते, चलन व बाजारभाव ह्यांचा परस्पर-संबंध काय असतो आणि व्यवहारांत उपयोजिल्या जाणाऱ्या विनिमयसाधनांचें परिमाणभूत सोन्याशीं असलेलें कायदेशीर प्रमाण स्थिर कसें ठेवण्यांत येतें, ह्याविषयाचें सविस्तर विवेचन आमच्या ‘हिंदुस्थानची रिझर्व बँक’ ह्या पुस्तकांत वाचावें, अशी सूचना येथें करणें आवश्यक आहे. प्रस्तुत लक्षांत ठेवावयाचें आहे तें थोडक्यांत हें कीं, प्रत्येक राष्ट्राचें सर्व किंमतींचें, मोलाचें व बाजारभावांचें कायदेशीर, अखेरचें व खरें माप विशिष्ट वजनाचें सोनें असतें (चीनमध्यें चांदीचें परिमाण आहे); आणि जरूर पडल्यास, कायद्यानें ठरलेल्या दरानें सोनें आणि अंतर्गत चलन ह्यांचा विनिमय अप्रतिहत करण्याची जबाब-दारी सरकारवर किंवा मध्यवर्ती बँकेवर टाकलेली असते. सध्याच्या आर्थिक गोंधळाच्या परिस्थितींत हें सोन्याचें माप प्रभावी होऊं शकत नाहीं, म्हणून सोनें व राष्ट्रीय चलन ह्यांच्या मोबदल्याविषयींचा नियम अनेक राष्ट्रांमध्यें शिथिल करण्यांत आला आहे. तथापि, राष्ट्रीय चलनाचा अंतिम आधार व

परिमाण म्हणून विशिष्ट वजनाचें आणि कसाचें सोनें हें कायद्यानें निश्चित केलेलें असतें आणि त्याच्या प्रमाणांत किंमत असलेल्या सर्व विनिमय-साधनांचा कायदेशीर, मुख्य व प्रमाणभूत अशा सोन्याच्या नाण्याशीं किंवा सोन्याच्या तुकड्याशीं असलेला संबंध अबाधितपणें कायम ठेवण्यावर चलनव्यवस्थेची यशस्विता अवलंबून असते.

## राष्ट्रीय नाण्यांचा विनिमय-संबंध

चीनमध्यें चांदीचें नाणें राष्ट्रीय चलनांचें परिमाण आहे आणि अमेरिका, एशिया व आफ्रिका ह्या खंडांतील कांहीं देशांतली चलनव्यवस्था अनिश्चित प्रकारची आहे. हे अपवाद सोडून दिले आणि सध्याच्या धामधुमीच्या काळां-तली परिस्थिति अल्पकालिक विघ्नांच्या स्वरूपाची आहे, असें मानलें, तर जगांतील सर्व प्रमुख राष्ट्रांत, निरनिराळ्या वजनांचीं सोन्याचीं नाणीं, तीं प्रत्यक्ष वापरांत असोत वा नसोत ) बाजारभाव आणि मोल ह्यांचीं निर्णायक आहेत, असें समजण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. प्रत्यक्ष व्यवहारांत चांदीचीं नाणीं, नोटा अथवा चेक चालोत; आपणांस प्रमाणभूत सोन्याचें नाणें किंवा ठराविक वजनाचें सोनें, त्या विनिमयसाधनांच्या मोबदला मिळेल, मिळण्याचा निदान कायदेशीर हक्क आहे, ह्या भावनेनें प्रत्येक देशांत लोक व्यवहार करीत असतात. देवघेवीचें काम चांदीच्या किंवा कागदाच्या तुकड्यांनीं भागत असतां आपणांस सोनेंच पाहिजे असा आग्रह कोण धरील ? आणि कांहीं अडचणीच्या कारणांमुळें मध्यवर्ती बँकेस किंवा राष्ट्रीय सरकारास सामान्य चलनाच्या मोबदला सोनें देतां आलें नाहीं, म्हणून तक्रार कोण करील ? हीच स्थिति सध्या आर्थिक मंदीमुळें व जाग-तिक व्यापाराचें यंत्र नादुरुस्त झाल्याकारणानें सर्व देशांत झाली आहे. राष्ट्रीय चलन स्वीकारून त्याच्या मोबदला लोकांस ठराविक सोनें देण्याची जबाबदारी पार पडणें आज अशक्य झालें आहे, म्हणून तें चलन, त्याच्या सोन्यांत व्यक्त होणाऱ्या किंमतीच्या दृष्टीनें, नरमलें आहे. ह्याचाच अर्थ, चलन स्वस्तावलें आणि सोनें महागलें, असा असून त्याचा अनुभव सर्व देशांमध्यें प्रत्येकास येत आहे. प्रचलित मंदीच्या काळांत सोन्याचा चढलेला भाव म्हणजे राष्ट्रीय चलनाची उतरलेली किंमत कोठेंतरी स्थिर करून सर-कारें आणि मध्यवर्ती बँका तूर्त काम भागवीत आहेत आणि चलन व सोनें ह्यांचें परस्पर-प्रमाण पुन्हां कायद्यानें निश्चित व स्थिर करणें शक्य होईल अशा रीतीनें एकंदर परिस्थिति सुधारण्याची वाट पहात आहेत.

## राष्ट्रांचें परस्पर देणें-घेणें

कोणासहि परदेशांत देणें द्यावयाचें असेल किंवा परदेशांतून घेणें घ्यावयाचें असेल, तर त्याबद्दल स्वदेशाच्या चलनांत किती रकम खर्चावी लागेल किंवा किती पैसा हातीं येईल, ह्याचा मुख्यत्वेंकरून विचार करावा लागतो. एकाद्या हिंदी व्यापाऱ्यानें इंग्लंडला माल पाठवला असतां, त्याचे तेथील बाजारांत किती पौंड येतील ह्यापेक्षां त्या पौंडाचे किती रुपये येथें हातीं लागतील ही गोष्ट त्यास अधिक महत्त्वाची असते. त्याचप्रमाणें, लंडन-मध्यें एखाद्यास शंभर पौंडांचें देणें असल्यास त्याची भरपाई व्हावी म्हणून येथें किती रुपये भरावे लागतील ह्याचा हिशेब त्यास हवा असतो. इंग्लंड व हिंदुस्थान ह्या दोन्ही देशांत सोन्याचें चलन प्रचारांत असलें किंवा ब्रिटिश व हिंदी चलन ह्यांचें प्रत्येकी सोन्याशीं काय प्रमाण आहे, हें निश्चित असलें, म्हणजे रुपयांचे किती पौंड व पौंडाचे किती रुपये मिळतील किंवा पडतील, हें तेव्हांच ठरवतां येईल. एका पौंडांत ११३ ग्रेन वजनाचें सोनें आहे आणि एका चांदीच्या रुपयाचें परिमाण ७½ ग्रेन वजनाचें सोनें आहे, तर एका पौंडाचे १५ रुपये होतील किंवा १ रुपयाचे १६ पेन्स होतील. ह्यासच हुंडणावळीचा दर म्हणतात. दोन निरनिराळ्या राष्ट्रांतील चलनांचें परस्पर प्रमाण म्हणजे त्यांचीं जीं सोन्याचीं कायदेशीर परिमाणें असतात, त्यांची एकमेकांशीं केलेली तुलना होय. परराष्ट्रांतील देणें देण्याकरितां राष्ट्रीय चलनाचें मिळणारें सोनें विकत घेऊन तें तिकडे पाठविलें असतां त्याच्या किंमतीचें तिकडे जें तेथील चलन मिळेल त्याची रकमहि वर सांगितल्याप्रमाणेंच हुंडणावळीच्या दराची निदर्शक होईल. मात्र, ह्या दरांत सोनें पाठवण्यास किंवा आणण्यास जो खर्च येतो, त्याचा, अर्थातच अंतर्भाव करावा लागतो व नेहमीं केलेला असतो.

राष्ट्रीय चलनांच्या सुवर्ण-परिमाणांचें परस्पर प्रमाण जर ह्या दरानें निदर्शित होतें, तर त्यास हुंडणावळीचा दर कां म्हणतात? ह्या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, आंतरराष्ट्रीय देण्या-घेण्यांत प्रत्यक्ष सोन्याचा उपयोग फारच थोडा होतो आणि बहुतेक कार्यभाग हुंड्यांच्या मार्फत उरकला जातो. परदेशांत माल पाठवणारा व्यापारी आपल्या परराष्ट्रीय गिऱ्हाइकावर हुंडी काढतो, म्हणजे मालाचे पैसे देण्याविषयींचा हुकूम लिहितो. त्याची हुंडी हा, विकलेल्या मालाबद्दल, परराष्ट्रीय चलनांत मिळावयाच्या रकमे-

वरचा हक्क असतो. आतां, निर्गत व्यापारांत ज्याप्रमाणें मालाच्या किंमतीच्या रकमा घेण्याचे हक्क उद्भवतात, त्याप्रमाणें आयात व्यापार करणारांच्या बाबतींत, विकत घेतलेल्या मालाबद्दल परदेशांत द्यावयाच्या रकमांबद्दलच्या जबाबदाऱ्या म्हणजे कर्जें निर्माण होतात. ह्या रीतीनें, परराष्ट्रीय व्यापाराच्या व्यवहारांत, दुसऱ्या देशांतून मिळावयाचीं तेथील चलनांतलीं 'घेणीं' आणि त्याचप्रमाणें परदेशांत तेथील चलनांत द्यावयाचीं 'देणीं' हीं सतत उपस्थित होत असतात. प्रत्येक वेळीं देणें आणि घेणें, सोनें पाठवून आणि तें परदेशांतून आणवून भागवणें निष्कारण खर्चाचें व गैरसोयीचें होईल. म्हणून परदेशांत ज्यास देणें द्यावयाचें आहे असा व्यापारी तेथून घेण्याचा हक्क असलेल्या व्यापाऱ्याकडे जाऊन म्हणेल, "तुझी परदेशीय हुंडी मला विकत दे म्हणजे तुझे यावयाचे पैसे तुला येथल्या येथें मिळतील आणि मी ती हुंडी माझ्या स्वतःच्या घेणेदाराकडे परदेशांत पाठवून माझें देणें भागवीन. माझा घेणेदार तुझ्या देणेदाराकडून तिचे पैसे उगवील." ह्या प्रकारानें हुंड्यांची खरेदी-विक्री देशांतल्या देशांत झाली असतां बाहेरून पैसा ज्यांस घ्यावयाचा असतो असे व्यापारी आणि ज्यांस बाहेर पैसा पाठवावयाचा असतो असे धंदेवाले ह्या दोघांची सोय होते आणि सोन्याच्या जाण्यायेण्याची आवश्यकता रहात नाहीं, कारण त्याची वजावाट होते. ज्याप्रमाणें हिंदुस्थानांत हुंड्या विकणारे व विकत घेणारे असतात, त्याचप्रमाणें दुसऱ्या देशांतहि असणार, कारण येथून बाहेर माल पाठवणारा धनको बनतो, त्याचबरोबर तो घेणारा परदेशांत ऋणको बनतो. परदेशांतील ह्या ऋणकोवर काढलेली हुंडी विकत घेऊन ह्या देशांतील ऋणको आपल्या परदेशीय धनकोकडे पाठवितो. हा तेथील धनको ती हुंडी येथून निर्गत करणाराच्या वरील परराष्ट्रीय ऋणकोकडे नेऊन तिचे पैसे वसूल करतो. अशा रीतीनें, ह्या देशांतील घेणें आणि देणें असलेल्या व्यापाऱ्यांचें काम होतें, त्याबरोबरच त्यांचे परदेशीय देणेकरी व घेणेकरी ह्यांचें, परस्पर-व्यवहारानें त्यांच्या स्वतःच्याच देशांत काम भागतें.

## राष्ट्रांच्या व्यापाराचा ताळेबंद

बहिर्गत किंवा आंतरराष्ट्रीय व्यापार वस्तुतः भिन्न-भिन्न व्यक्तींच्या हातून तुटकपणानें होत असला, तरी प्रत्येक राष्ट्राचें चलनविषयक व

आर्थिक वैशिष्ट्य स्वतंत्र असल्यानें, निर्गत व आयात आणि त्यांपासून उद्भवणारीं घेणीं व देणीं समुच्चयत्वानें राष्ट्रीय अशीं समजलीं जातात. ह्या आवक-जावकाचा वार्षिक ताळेबंद तयार करतां येतो व त्यावरून कोणत्याहि देशाची परदेशांशीं देण्या-घेण्याचे बाबतींतली परिस्थिति अजमावतां येते. परदेशांत माल पाठविणारे किंवा त्यांमधील लोकांसाठी कामगिरी करणारे धंदेवाले धनको बनतात व त्यांस मिळावयाचा मोबदला आणि मेहनताना राष्ट्रीय ताळेबंदांत 'येण्या'च्या सदरांत पडतो. ह्याच्या उलट, परदेशांतून आयात करणारांच्या व्यवहारांमुळें ताळेबंदांत 'देणें' उत्पन्न होतें. पहिल्या वर्गांतील लोक परदेशांवर हुंड्या काढणारे असतात व ते परराष्ट्रीय चलन मिळण्याच्या हक्काचा हुंडीच्या बाजारांत पुरवठा करतात. दुसऱ्या वर्गांतल्या मंडळींची ह्या हुंड्यांस मागणी असते आणि त्यांस परराष्ट्रीय चलन खरेदी करावयाचें असतें. म्हणजे, परराष्ट्रीय हुंड्यांच्या बाजारांत परराष्ट्रीय चलनाचे विक्रेते आणि खरेदीदार एकत्र येतात, आणि त्यांच्या पुरवठा-मागणीच्या परिस्थितीस अनुसरून चलनांचे म्हणजे हुंड्यांचे दर ठरतात. ह्या दरांची वरची आणि खालची मर्यादा सोनें आयात व निर्गत करण्यास येणाऱ्या खर्चानें निश्चित होत असते. परदेशांत पैसा धाडण्याचे दोन मार्ग उपलब्ध असतात; एक प्रत्यक्ष सोनें विकत घेऊन तें पाठविणें व दुसरा, परराष्ट्रीय चलनाच्या मालकीचा हक्क म्हणजे परदेशांतील व्यापाऱ्यांवरील हुंडी खरेदून अप्रत्यक्ष रीतीनें देणें मिटवणें. ह्या दोहोंपैकीं जो मार्ग कमी खर्चाचा असेल, तोच कोणीहि अवलंबील, हें उघड आहे. परराष्ट्रीय हुंड्यांच्या पुरवठ्याच्या मानानें त्यांबद्दलची मागणी अधिक असेल तर ज्यास्त चलन देऊन परराष्ट्रीय हुंडी किंवा सोनें विकत घ्यावें लागेल, म्हणजे परराष्ट्रीय चलनांत व्यक्त होणारा हुंडणावळीचा दर उतरेल आणि तो 'प्रतिकूल' व 'नरम' होईल. ह्याच्या उलट, आयातीपेक्षां निर्गत अधिक असेल तर परराष्ट्रीय हुंड्या स्वस्त होऊन हुंडणावळीचा दर चढेल आणि तो 'अनुकूल' व 'मजबूत' होईल. राष्ट्राचें परदेशांतलें देणें व त्यांच्याकडून येणें ह्यांचेमध्यें मोठी तफावत पडल्यास तेवढ्यापुरती सोन्याची निर्गत व आयात होऊन हुंडणावळ म्हणजे राष्ट्रीय चलनाचें सुवर्ण परिमाण स्थिर रहातें.

## परराष्ट्रीय हुंड्यांचा बाजार

देशाची परराष्ट्रीय देण्या-घेण्याची परिस्थिति निरीक्षून सोन्याच्या निर्गत-आयातीचें नियमन करणें, पैशाचा पुरवठा कमी-जास्त करणें व त्यासाठी व्याजाचा दर चढवणें व उतरवणें ही कामगिरी मध्यवर्ती बँकेची असते. हुंडणावळीचा दर उतरून सोन्याची निर्गत प्रमाणाबाहेर होऊं लागली, तर मध्यवर्ती बँक आपला व्याजाचा दर चढवते आणि बँकांनीं आपल्या गिऱ्हाइकांस द्यावयाच्या कर्जावरील व्याजाचे दर चढण्यास अनु-कूल प्रवृत्ति निर्माण करते. ह्याचा परिणाम असा होतो कीं, बँकांकडे ठेवींचा पैसा परत ओढला जातो, खेळत्या विनिमय-साधनांचा पुरवठा मर्यादित होतो आणि सोन्यांत व्यक्त होणारी चलनाची किंमत वाढते, म्हणजेच हुंडणावळीचा दर उतरत होता, त्यास आळा बसून तो स्थिरावतो. देशांतील व परदेशांशीं होणाऱ्या व्यापारी व्यवहारांत खेळणारा पैसा, प्रचलित व्याजाचे दर, सोन्या-ची आयात-निर्गत इत्यादि घडामोडी एकमेकांशीं संबद्ध असतात. पैशाच्या बाजारांतली परिस्थिति सारखी बदलत असते, तिच्या हकीकती वर्तमान-पत्रांमध्यें येतात, त्यांत देशी आणि विदेशी हुंड्यांच्या दरांचा उल्लेख केलेला असतो, ह्याचें कारण वरील विवेचनावरून ध्यानांत येईल. परराष्ट्रीय हुंड्या विकत घेण्याचा आणि विकण्याचा धंदा विशिष्ट पेढ्या व बँका मुख्यत्वेंकरून करतात. हिंदुस्थानांत हा उद्योग अनेक वर्षें एक्सूचेंज बँका करीत आल्या आहेत. परराष्ट्रीय हुंडणावळीच्या बाजारांत मुदतीनें हुंड्या देण्याघेण्याचे करार होतात, हें येथें सांगणें जरूर आहे. परराष्ट्रांतून यंत्रसामुग्री खरेदी करून आणणाऱ्या कारखानदारांस ती स्वदेशांत कोणत्या किंमतीस येऊन पडेल आणि राष्ट्रीय चलनांत केवढी रकम द्यावी लागेल, ह्याचा अंदाज करावा लागतो व त्या संबंधांत हुंडणावळीच्या दराबाबत बँकेशीं करार करावा लागतो. निरनिराळ्या देशांतील राष्ट्रीय चलनांचे परस्पर संबंध, म्हणजे हुंडणावळीचे दर, आर्थिक व पैशाच्या बाजारांतील परिस्थितीप्रमाणें बदलत असतात. ह्या फेरबदलाचा फायदा घेऊन एका चलनाचें दुसऱ्या चलना-मध्यें रूपांतर करण्याचा उद्योग कित्येक धंदेवाले करतात. परराष्ट्रीय हुंडणा-वळीच्या दरांबाबत वृत्तपत्रांत माहिती दिली जाते, तिचे कांहीं निवडक नमुने खाली दिले असून त्यांचें स्पष्टीकरण पुढें केलें आहे. हुंडणावळी-संबंधाचे तक्ते प्रसिद्ध होतात, त्यांत विशिष्ट राष्ट्रांच्या चलनांचें अन्य

राष्ट्रांच्या चलनांशीं असलेलें मूलभूत प्रमाण दिलेलें असून तें व्यक्त करण्याचा रिवाज दिग्दर्शित केलेला असतो, आणि त्यांचें प्रचलित स्वरूप म्हणजे चालू हुंडणावळीचा दर आंकड्यांत दर्शविलेला असतो.

## परराष्ट्रीय हुंडणावळीचे दर

### ( १ )

### लंडनचा परराष्ट्रीय हुंड्यांचा बाजार

| लंडनची इतर बाजारां-वरची 'हुंडी : एक पौंडास किती परराष्ट्रीय नाणें ? | परराष्ट्रीय चलना-शीं मामुली व कायदेशीर प्रमाण | ९ ऑगस्ट, १९३५ चा सरासरी दर | १५ ऑगस्ट, १९३५ चा सरासरी दर |
|---|---|---|---|
| न्यूयार्क ( डॉलर ) | ४·८६$\frac{२}{३}$ (फेब्रुआरी, १९३४ पासून=८·२३$\frac{२१}{३२}$) | ४·९६$\frac{१}{४}$–९६$\frac{३}{४}$ | ४·९८–९८$\frac{५}{८}$ |
| पॅरिस ( फ्रँक ) | १२४·२१ | ७४$\frac{७}{८}$-७५ | ७४$\frac{३१}{३२}$–७५$\frac{३}{३२}$ |
| ब्रुसेल्स ( बेल्गा ) | ३५·०० ( एप्रिल, १९३५ पूर्वींचा दर ) | २९·३५–४० | २९·४३–४७ |
| मायलन् ( लायर ) | ९२·४६ | ६०$\frac{१}{४}$–$\frac{१}{२}$ | ६०$\frac{५}{१६}$–$\frac{९}{१६}$ |
| झुरिच् ( फ्रँक ) | २५·२२$\frac{१}{२}$ | १५$\frac{१५}{१८}$ | १५$\frac{१९}{२२}$ |
| बर्लिन ( मार्क ) | २०·४३ | १२$\frac{२६}{३१}$ | १२$\frac{२९}{३४}$ |
| मुंबई ( दर रुपयास किती पेन्स ) | १८ | १८$\frac{३}{३२}$–$\frac{५}{३२}$ | १८$\frac{३}{३२}$–$\frac{५}{३२}$ |
| कोब ( येनला किती पेन्स ) | २४.५८ | १४$\frac{१}{८}$–$\frac{५}{१६}$ | १४$\frac{१}{२}$–$\frac{१}{४}$ |

## मुदतीचे दर

तयार हुंडीच्या मानानें मुदतीच्या हुंडीस परराष्ट्रीय चलनांत रकम किती कमी किंवा जास्त मिळेल, हें दर्शविणारे दर.

| लंडनची हुंडी | ९ ऑगस्ट १९३५ | दर पौंडास | शेरा |
|---|---|---|---|
| न्यूयॉर्क ( सेंट ) | १ महिना | $\frac{९}{१६}-\frac{७}{१६}$ | 'प्रिमिअम'चे दर |
| | २ महिने | $१\frac{१}{८}-\frac{७}{८}$ | |
| | ३ ,, | $१\frac{५}{८}-१\frac{३}{८}$ | |
| पॅरिस ( फ्रँक ) | १ महिना | $\frac{१}{४}-\frac{३}{८}$ | डिस्कौंटचे दर |
| | २ महिने | $\frac{५}{८}-\frac{७}{८}$ | |
| | ३ ,, | $१\frac{७}{१६}\,१\frac{९}{१६}$ | |
| ॲम्स्टरडम् ( सेंट ) | १ महिना | $४\frac{१}{२}-६\frac{१}{२}$ | डिस्कौंटचे दर |
| | २ महिने | ११–१३ | |
| | ३ ,, | १६–१८ | |
| जिनीव्हा ( सेंट ) | १ महिना | ९–११ | डिस्कौंटचे दर |
| | २ महिने | २१–२४ | |
| | ३ ,, | ३०–४० | |

( २ )

## साप्ताहिक अहवाल

लंडनः २४ ऑगस्ट, १९३५:—लंडनच्या बाजारांत स्तब्धता आहे. गेल्या आठवड्याच्या अखेरीस, जनरल इलेक्ट्रिक कंपनीचे भाग अमेरिकन धारण करणारांकडून येथें परत खरेदी केले गेल्यामुळें डॉलरला थोडी तेजी येऊन पौंड-डॉलर हुंडीचा दर ४·९६$\frac{५}{८}$ डॉलरवर चढला आणि आंतर-राष्ट्रीय राजकीय भानगडीमुळें चालू आठवड्यांत गुरुवारीं पुन्हां डॉलर अधिक मजबूत झाला व दर ४·९७$\frac{३}{४}$ पर्यंत वर गेला. एरव्ही न्यूयार्कचा दर ४·९८ डॉलरच्या आसपास टिकून राहिला आहे. फ्रेंच फ्रँक सुमारें ७५ फ्रँकला चिकटून बसला आहे. हा दर स्थिर राखण्यास मध्यवर्ती बँकेस खटपट करणें जरुर पडलें नाहीं. तीन महिने मुदतीची फ्रँक हुंडी जरा नरम असून $१\frac{१}{२}$ फ्रँक डिस्कौंटचा तिचा नरमाईचा दर आहे. तीन महिने

मुदतीचा स्विस् हुंडीच्या डिस्कौंटचा दर ३५ सांतीम कायम आहे. इटालियन अधिकाऱ्यांनीं तयार लायर हुंडीचा दर ६०$\frac{१}{२}$ लायरवर स्थिर केला आहे, परंतु तीन महिन्यांच्या लायर हुंडीस ७ लायरचें म्हणजे दरसाल दर शेकडा ४६ इतकें डिस्कौंट आहे.

( ३ )

## मुंबई बाजाराचा अहवाल

मुंबईः १४ सप्टेंबर, १९३५:—सोन्याची निर्गत मर्यादित प्रमाणांत झाल्यामुळें स्टर्लिंग ( ब्रिटिश चलन ) हुंडीचा दर पूर्वींच्या मानानें मंदींत होता. तथापि, मार्चपर्यंतच्या मुदतीचा दर १ शिलिंग ६$\frac{७}{६४}$ पेन्सच्या मर्यादेंत प्रचलित असून, अखेरीस डिसेंबर-जानेवारीच्या मुदतीच्या हुंड्यांचा व्यवहार १ शि. ६$\frac{१}{८}$ पेन्स ह्या दरानें झाला.

**हुंड्यांचे दर** ( लंडन, १२ सप्टेंबर, १९३५ )

( टेलिग्रॅफिक ट्रॅन्स्फर = टी. टी. )

| | | | |
|---|---|---|---|
| तारेचा दर | लंडनची हुंडी | न्यूयॉर्कवर | ४·९३$\frac{१३}{१६}$ |
| ” ” | ” ” | पॅरिसवर | ७४·९४ |
| ” ” | ” ” | बर्लिनवर | १२·२७$\frac{१}{२}$ |
| ” ” | ” ” | मॅड्रिडवर | ३६·१६ |
| ” ” | ” ” | ॲमस्टरडमवर | ७·३१$\frac{१}{४}$ |
| ” ” | ” ” | ब्रुसेल्सवर | २९·२५$\frac{१}{२}$ |
| ” ” | ” ” | मायलन्वर | ६०·५० |
| ” ” | ” ” | बर्नवर | १५·१८$\frac{१}{४}$ |
| ” ” | ” ” | प्रागवर | ११९·४३ |

खाली दिलेले दर दुपारीं २–३० वाजतांचे आहेत. कंसांतला आंकडा पूर्वींच्या दिवसाचा आहे.

लंडन–मुंबई ( १/६$\frac{१}{८}$ ) १/६$\frac{१}{८}$
पॅरिस–मुंबई ( ५·६५$\frac{७}{८}$ ) ५·६५$\frac{७}{८}$
न्यूयॉर्क–मुंबई ( २७·३० ) २७·३५
बर्लिन–मुंबई ( ०·९३$\frac{१}{३}$ ) ०·९३$\frac{१}{३}$

## मुंबई : सप्टेंबर, १०, १९३५

बँकांचा चालू दर ( टी. टी. डी. डी. ) = १–६ १/३२

( टी. टी. = तारेची हुंडी व डी. डी. = दर्शनी हुंडी )

बँकांचा विक्रीचा दर ( टी. टी. डी. डी. ) = १–६ ३/३२ सप्टेंबर–एप्रिल

” ” ” ” ” = १–६ १/१६ मे–डिसेंबर

बँकांचा खरेदीचा दर ( टी. टी. ) १–६ ५/३२

” ” ” ( डी. डी. ) १–६ ३/१६

” ” ” ( ३ महिने मुदत ) १–६ ७/३२ फेब्रुआरी

” ” ” ( ” ” ) १–६ ३/१६ मार्च–डिसेंबर

**न्यूयॉर्कः—**

बँकांचा चालू दर ( टी. टी ) २७१ १/२

” विक्रीचा ” ” २६९ १/२

” खरेदीचा ” ” २६६ ३/४

**पॅरिसः—**

बँकांचा विक्रीचा दर ( डी. डी. ) ५६२

” खरेदीचा दर ” ” ५७२

**ॲम्स्टरडम्ः—**

बँकांचा विक्रीचा दर ( डी. डी. ) ५४ ३/४

**जपानः—**

बँकांचा विक्रीचा दर ( टी. टी. ) ७८ ३/४

” खरेदीचा दर ( ” ” ) ७६ ७/८

**बर्लिनः—**

बँकांचा विक्रीचा दर ( डी. डी. ) ९० १/२

( ४ )

लंडनः १४ सप्टेंबर, १९३५— फ्रान्स सारख्या देशांतील चलन सोन्यावर आधारलेलें आहे, त्याच्या मानानें ब्रिटिश स्टर्लिंग चलनाची किंमत वाढल्यानें चलनाधिकाऱ्यांस मध्यें हात घालून ह्या प्रवृत्तीस आळा घालावा लागला. इटली-ॲबिसीनियाच्या वितुष्टासंबंधानें अनुकूल बातमी आल्यामुळें स्टर्लिंगला मजबुती प्राप्त झाली असली, तरी नेदर्लँड्सच्या कायदे मंडळांत

आर्थिक पुनर्घटनेविषयीं तेथील सरकारनें सुचविलेले उपाय अमान्य होण्याची भीति, हेंहि त्या मजबुतीस महत्त्वाचें कारण झालें असलें पाहिजे. नेदर्लंडसचें चलन गिल्डर हें आहे, तें एकदम नरमलें व अमेरिकेकडे बरेंच सोनें निर्गत झालें. गिल्डरच्या तयार हुंडीचा भाव उतरला आणि तीन महिने मुदतीच्या गिल्डरच्या हुंडीस ३० सेंट्स् पर्यंत डिस्कौंट आलें. हा डिस्कौंटचा दर द. सा. द. शे. १६·३ इतका होतो आणि गिल्डर पुढें आणखी नरमणार, ह्या भीतीचें वरील डिस्कौंट हें स्पष्ट असें निदर्शक आहे. सोन्याशीं आपल्या चलनाचा संबंध टिकवून धरणाऱ्या इतर राष्ट्रांच्या परराष्ट्रीय हुंड्यांच्या दरांची अशीच अवस्था झाली आहे.

( ५ )

कलकता: ३१ ऑगस्ट, १९३५— मुंबईहून सोनें व चांदी यांची निर्गत झाल्याकारणानें आणि तागाचा पक्का माल व चहा ह्यांच्या विक्रीच्या हुंड्या कलकत्त्याच्या बाजारांत आल्यामुळें परराष्ट्रीय हुंडणावळ गेल्या आठवड्यांत स्थिर राहिली. स्टर्लिंग हुंड्यांचीं टेंडरें १ शि. ६$\frac{१}{८}$ पेन्स ह्या भावानें आलीं व त्यांपैकीं ५२ टक्के स्वीकारलीं गेलीं. अखेरचे दर १ शि. ६$\frac{३}{३२}$ पेन्स, ऑगस्ट–मे टी. टी. आणि १ शि. ६$\frac{१}{१६}$ पेन्स, जून-ऑक्टोबर टी. टी. असे होते. हुंड्यांचे दर १ शि. ६$\frac{७}{३२}$ मार्च पर्यंत आणि १ शि. ६$\frac{३}{१६}$ एप्रिल–ऑक्टोबर.

## महत्त्वाचे मुद्दे

तीन–चार महत्त्वाच्या गोष्टी येथें लक्ष्यांत ठेवण्याजोग्या आहेत, त्यांचा आतां खुलासा करूं. हुंडणावळीच्या दराची मांडणी करण्याची पद्धति सर्व देशांत एकच नसल्यानें समजुतींत घोटाळा होण्याचा संभव असतो. आपल्या स्वतःच्या देशांतील प्रचलित प्रमुख नाण्याच्या बदला इतर देशांतलें तसलेंच चलन किती मिळेल असें म्हटलें काय किंवा परराष्ट्रीय चलनाच्या मोबदला स्वतःचें राष्ट्रीय चलन किती द्यावें लागेल अथवा मिळेल असें म्हटलें काय, दोहोंचा आशय वस्तुत: एकच आहे. रिवाजांतच काय तो फरक असतो. एका ब्रिटिश पौंडाबरोबर परराष्ट्रीय किती चलन, असा हिशेब इंग्लंडमध्यें मांडण्यांत येतो, आणि न्यूयॉर्कचा दर ४·९० डॉलर व पॅरिसचा दर ७५ फ्रँक असें म्हणण्याचा तेथें प्रघात आहे. हिंदुस्थानचा व इतर कांहीं देशांचा मात्र त्या नियमास अपवाद आहे.

एका पौंडास १३ रुपये ४ आणे अशा रीतीनें हिंदुस्थानावरील हुंडीचा दर व्यक्त करण्यांत येत नसून १ शिलिंग ६ पेन्सांस १ रुपया असें कोष्टक प्रचारांत आहे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें व युरोपांतील दुसरीं कित्येक राष्ट्रं ह्यांमध्यें परदेशी चलनाच्या एका किंवा शंभर घटकांस स्वदेशांत राष्ट्रीय चलन किती मिळेल अथवा द्यावें लागेल हें सांगण्याची रीत प्रचलित आहे. मुंबईच्या बाजाराचा अहवाल वर दिला आहे, त्यांतहि १०० डॉलरला किती रुपये आणि १०० रुपयांस किती फ्रँक असल्याच हिशेबाचे हिंदी परराष्ट्रीय हुंडणावळीचे दर नमूद आहेत. जपान व जर्मनी ह्या देशांविषयींच्या हुंडणावणीची मांडणीहि ह्याच तऱ्हेची आहे, असें तेथें दिसून येईल.

## हुंड्यांचे व्यवहार.

दोन राष्ट्रांमधील हुंडणावळीचे दर कमी-ज्यास्त होणें हें, त्यांमधील खेळत्या पैशाचा पुरवठा आणि प्रचलित व्याजाचे दर ह्यांच्या परस्पर-संबंधावर अवलंबून रहातें, ही गोष्टहि बाजाराच्या अहवालांवरून निदर्शनास येईल. हुंडणावळीचा बाजार रोख्यांच्या व भागांच्या बाजारासारखाच असून त्यांत दलाल आणि प्रत्यक्ष गिऱ्हाइकें गांठणारे व्यवहारी धंदेवाले असतात. त्या बाजारांत निरनिराळ्या देशांवरील हुंड्यांचे विभाग आणि गट असतात. तसेंच, वायद्याचा धंदा नसला तरी त्यांत तयार हुंडीप्रमाणें मुदतीच्या हुंड्यांचे सवदेहि होतात. बँकांच्या गिऱ्हाइकांस निरनिराळ्या देशांवरच्या हुंड्या ठराविक मुदती नंतर मिळण्याच्या करारानें निश्चित मिळवून ठेवाव्या लागतात आणि त्या संस्थांमध्यें गिऱ्हाइकांची ही गरज भागविण्याकरितां स्वतंत्र खातीं चालविण्यांत येतात. गिऱ्हाइकास मुदतीची हुंडी विकली असतां, तो व्यवहार योग्यवेळीं पुरा पाडतां यावा म्हणून बँक त्याच वेळेस त्याच मुदतीची हुंडी दलालामार्फत खरेदी करून ठेवीत असते. हुंड्यांच्या बाजारांत सट्टेबाजीस रोखेबाजाराइतका वाव नसतो, हें खरें आहे. तथापि, पॅरिसमधला धंदेवाला फ्रँक-स्टर्लिंग हुंडीचाच व्यवहार करतो असें नाहीं; तर तो कोणत्याहि देशावरची हुंडी कोठेंहि खरेदी करून, फायदेशीर रीतीनें दुसऱ्या एखाद्या देशांत विकूं शकतो. ह्या व्यवहारास 'आर्बिट्रेज' म्हणतात. 'एका बाजारांत रोखे खरेदी करून ते दुसऱ्यांत विकावयाचा धंदा' अशी ह्या व्यवहाराची व्याख्या केलेली आहे आणि त्यांत बाजारभावांच्या सूक्ष्म फर-

कांचा फायदा घ्यावयाचा असल्यानें तो टेलिफोनच्या व तारेच्या सहाय्यानेंच करावा लागतो. परराष्ट्रीय हुंडीचा व्यवहार हिंदुस्थानांत एक्स्चेंज बँकांचे हातांत आहे, हें मागें सांगितलेंच आहे. हिंदुस्थान सरकारचे 'होमचार्जेस' चे पैसे लंडनला पाठवावयाचे असतात, त्यासाठीं स्टर्लिंग बिलांचीं टेंडरें मागवून व्यवस्था केली जाते. हें काम आतां रिझर्व बँकेकडे आलें असून, ह्या खरेदी केलेल्या हुंड्यांची रकम व त्यांचा दर इत्यादि संबंधांतला तपशील वेळोवेळ प्रसिद्ध करण्यांत येतो.

---

# प्रकरण सातवें

## मालाचे बाजार

### बाजारांचें वैशिष्ट्य

आतांपर्यंत आम्हीं सरकारी रोखे व मंडळ्यांचे भाग ह्यांचे बाजार आणि पैशाचे व हुंड्यांचे व्यवहार ह्यांचें विवेचन केलें आहे. आतां, वरील बाजारांप्रमाणेंच, अनेक प्रकारांच्या मालाचे बाजार असतात व त्यांत खरेदी-विक्रीचे रोखीचे व मुदतीचे व्यवहार होतात, त्यांचें वर्णन करावयाचें आहे. किरकोळ वस्तूंची देवघेव आणि कपास, ताग, चहा, गहूं, इत्यादि माल किंवा सोनें, चांदी इत्यादि धातु ह्यांच्या मोठ्या प्रमाणावरच्या उलाढाली, ह्यांमध्यें फरक असा आहे कीं, लहान बाजारांत माल थोडा येतो व त्यांतील भाव शेजारच्या बाजारांतील भावांप्रमाणें असतातच, असें नाहीं. पुण्याच्या मंडईत भाजीचा जो दर असेल, त्याचा मुंबईच्या दराशीं विशेष संबंध असत नाहीं. परंतु वर निर्दिष्ट केलेलीं पिकें आणि धातु ह्यांचे बाजार फार मोठ्या प्रमाणावर असतात व ह्या जिनसांस जगभर मागणी असल्याकारणानें व ते न नासतां कोठेंहि पाठवितां येणें शक्य असल्यानें, त्यांस एक 'जागतिक' किंमत येत असते. कोणत्याहि व्यापारी केंद्रांत ह्या वस्तूंचा भाव चढला किंवा पडला, कीं त्याचा परिणाम तात्काळ इतर ठिकाणच्या बाजारांवर होतो. मोठें उत्पादन व त्यास प्रचंड मागणी, ह्या खेरीज वरील 'प्रोड्यूस मार्केट्स' अस्तित्वांत येण्यास तिसरें एक कारण आहे. नमुन्याप्रमाणें किंवा केलेल्या वर्णनाप्रमाणें कपास, गहूं, चांदी, सोनें ह्यांसारखा माल मिळूं शकेल, ही खरेदीदाराची खात्री असते व सौदा करतांना प्रत्यक्ष माल पहाण्याची जरुरी भासत नाहीं. ग्रामोफोनची तबकडी विकत घेतांना, तिचा नुसता नंबर सांगितला, म्हणजे हवी असेल ती 'प्लेट' मिळूं शकते आणि कापडाच्या ताग्याचा नंबर कळविला कीं, विशिष्ट तऱ्हेचें कापड मिळतें. त्याचप्रमाणें, वर उल्लेख केलेल्या मालाचें वर्गीकरण होऊन प्रत लावलेली असल्यामुळें, त्याच्या

खरेदी–विक्रीस सहाय होतें. उदाहरणार्थ, ‘ कुमठा धारवाड ’ ही कपास आपण घेतली तर धाग्याची लांबी ⅞ इंच असणार व जिनिंगचें प्रमाण २६ आणि गांसडीचें वजन ४०० पौंड राहील असें गृहीत धरण्यास कांहींहि हरकत नसते. किंवा, कराची येथील गव्हाच्या बाजारांतील ‘ व्हाइट ’ गहूं म्हटला कीं, त्यांत शेकडा ५ बार्लीचें प्रमाण असून ३ टक्के माती व ३० टक्के तांबडे दाणे असणार, हें ठरलेलें असतें. निर्गत होणाऱ्या गव्हाचा भाव, ४९२ पौंड वजनास काय किंमत, ह्या हिशेबानें सांगण्यांत येतो. अशा रीतीनें, ‘ प्रोड्यूस मार्केट ’ मधील माल वर्गीकृत, प्रतवार आणि समान-जातीय असल्यामुळेंच त्यास व्यापारांत विशिष्ट महत्त्व प्राप्त होतें.

## निरनिराळ्या प्रकारचा माल

ह्या मालाच्या बाजारांत, कपाशीचे गठ्ठे किंवा तांदुळाचे ढीग असावे लागत नाहींत. मंडईमध्यें बटाट्यांचे ढीग दिसतात, त्याप्रमाणें येथें ढीग नसतात; मालापेक्षां माणसांचीच गर्दी तेथें जास्त असते. कपास बाजारांत कपाशीचे नमुने तरी आढळतील, परंतु सोन्या–चांदीच्या बाजारांत प्रत्यक्ष धातूंचें दर्शनहि होणार नाहीं ! मग ही खरेदी-विक्री होते तरी कशी ? “बाजारांत तुरी,आणि भट भटणीला मारी,”अशापैकींच येथें परिस्थिति असते. कपाशीची लागवड होते न होते तोंच किंवा त्याच्यापूर्वीहि तिच्या खरेदी-विक्रीचे वायदे ठरतात व पीक बरें-वाईट येण्यासंबंधींच्या बातम्यांस अनुसरून बाजारभाव हेलकावे खात असतात. दक्षिण आफ्रिकेंत सोनें सांपडण्याचा संभव आहे, ह्या बातमीचा परिणाम आजच्या सोन्याच्या भावावर होतो, हें असल्या बाजाराच्या वैशिष्ट्याचें निदर्शक आहे. व्यापारी उलाढालींत, मुंबईच्या बाजूस कपास, पंजाबांत गहूं व बंगालमध्यें ताग ह्यांचें महत्त्व विशेष आहे. कपाशीस सव जगभर मागणी असल्यामुळें व न्यूयॉर्क, लिव्हरपूर ह्यांसारख्या केंद्रांत आंतरराष्ट्रीय व्यापार एकत्रित झालेला असल्यामुळें, मुंबईच्या बाजाराचें लक्ष्य नेहमीं पश्चिमेकडून येणाऱ्या विद्युत् संदेशांवर असतें. कपाशीच्यासारखा बाजार आणि रोखे व मंडळ्यांचे भाग ह्यांचा बाजार ह्यांमध्यें पुष्कळ साम्य आहे. रोख्यांच्या किंमतींत होणाऱ्या चढ-उताराचा फायदा घेण्याच्या हेतूनें ज्याप्रमाणें धंदेवाले रोखेबाजारांत व्यवहार करतात, त्याचप्रमाणें कपाशीचें एक बोंडसुद्धां ज्यांस द्यावयाचें-घ्यावयाचें नाहीं, असे लोक कपाशीच्या गांसड्यांची लक्षावधि रुपयांची उलाढाल करतात. कपाशीच्या गांठीचा जणू

काय सरकारी कर्जरोखाच बनतो. रोखे व भाग ह्यांच्या बाजारभावांतील आंदोलनाचे परिणाम मुख्यतः शहरी लोकांच्या संचित संपत्तीच्या वाढ-घटीवर होत असतात; परंतु पिकांच्या बाजारभावांवर, तीं पिकें करणाऱ्या शेतकऱ्यांचें जीवित अवलंबून असतें. मुंबई येथील ब्रॉडकास्टिंग स्टेशनमधून दररोज हे बाजारभाव रेडिओच्या द्वारा सांगण्यांत येतात, त्यांचा उपयोग परठिकाणीं रहाणाऱ्या लोकांस पुष्कळ होतो. 'प्रोड्यूस मार्केट्स' मधील व्यवहारांचा एकंदर जनतेशीं विशेष जिव्हाळ्याचा संबंध येतो; परंतु हा संबंध व त्याचें स्वरूप ह्याची माहिती फारच थोड्यांस असते.

## कपाशीचें पीक

कपाशीच्या खरेदी–विक्रींतील पुढारीपणाचा मान न्यूयॉर्कच्या बाजारास प्राप्त झालेला आहे. लिव्हरपूल येथील बाजार हाहि कमी महत्त्वाचा नाहीं, परंतु अमेरिकेंत कपाशीची लागवड फार मोठ्या प्रमाणावर होत असल्यानें, तेथील बाजार मोठा आहे. न्यूयॉर्क बाजारांतील दरांवर अखिल जगांतील बाजारभाव अवलंबून असतात. आमच्या 'अर्थ' साप्ताहिकांत, जगांतील कपाशीच्या पिकांचा उठाव कसा होतो, ह्यासंबंधीं माहिती ता. २१ व २८ ऑगस्टच्या अंकांत दिली आहे, तिकडे वाचकांनीं जरूर लक्ष द्यावें, असें आम्ही सुचवितों. तेथील हकीकतीची द्विरुक्ति करण्याचें कारण नाहीं. अमेरिका, हिंदुस्थान, चीन, रशिया व इजिप्त हे कपाशीची लागवड करणारे प्रमुख देश आहेत. शेतकऱ्यांनीं पीक काढलें, म्हणजे मोठमोठ्या व्यापारी संस्थांचे प्रतिनिधी तें विकत घेण्यासाठी येतात. खरेदीचा करार करतेवेळींच, दुसरा एक स्वतंत्र विक्रीचा करार करून, नुकसान येण्याची शक्यता टाळण्यांत येते. शेतकऱ्यांस रोकड रकम द्यावी लागते, ती कर्ज काढून उभारावी लागते. खरेदीदारावर व्यापारी हुंडी काढतो व ती सत्कारून घेतो. बँक ती हुंडी विकत घेऊन डिस्कौंट करते, म्हणजे व्याज कापून पैसे देते व हुंडीची मुदत भरली, म्हणजे तिची दर्शनी रकम खरेदीदाराचे नांवें मांडून वसूल करते. परदेशीं निर्गत होणाऱ्या कापसाचे बाबतींत हीच व्यवहार-पद्धति अवलंबण्यांत येते. इजिप्तमध्येंहि विक्रीची पद्धत अशाच प्रकारची आहे. अमेरिकेंत १९३४–३५ मध्यें २ कोटि ८० लक्ष एकर जमीन कपाशीखाली होती. त्या सालीं दर एकरीं १७१ पौंड वजनाची कपास पदरांत पडली व एकूण उत्पादन ९६ लक्ष गांसड्या झालें. हिंदुस्थानांतील कपाशीच्या पिकानें

ह्याच मुदतींत, २ कोटि ४० लक्ष एकर क्षेत्र व्यापलें व दर एकरी सरासरीनें ८१ पौंड कपास हातीं आली. एकूण उत्पादन ४८ लक्ष गासड्या भरलें. हिंदी कपाशीची प्रत हलकी व दर एकरीं उत्पादन अल्प, ह्या कारणांमुळें तेवढ्याच क्षेत्रांत लावलेल्या कपाशीपासून मिळणाऱ्या उत्पन्नांत विलक्षण तफावत पडते. १९२८ सालीं हिंदुस्थानांत २ कोटि ८४ लक्ष एकर कपाशीची लागवड झाली होती, म्हणजे आतां लागवडीचें क्षेत्र, बाजारभाव उतरल्यामुळें, आकुंचित करण्यांत आलेलें आहे, असें दिसून येईल. भडोच कापूस हा हिंदी बाजारांत प्रातिनिधिक समजला जातो व त्याचा भाव, ७८४ पौंडांच्या खंडीच्या हिशेबानें दर खंडीस अमूक किंमत असा ठरविला जातो. मे १९३४ ते मे १९३५ ह्या मुदतींत, ह्या जातीच्या कपाशीचा कमाल भाव दर खंडीस २५९ रु. १२ आ. होता व किमान भाव १९० रु. होता.

## मुंबईचा कपास-बाजार

हिंदी कपाशीच्या पिकापैकीं सुमारें ४० टक्के कपास निर्गत होते. अर्थात्, ह्या कारणानें तिला 'जागतिक' बाजारभाव प्राप्त होतो. कपास निर्गत करणारें प्रमुख बंदर, पश्चिम हिंदुस्थानाचें औद्योगिक केंद्र व कापडाच्या गिरण्यांचें आगर, ह्या दृष्टींनीं मुंबई हें कपास बाजाराचें केंद्र झालें आहे. लँकेशायरच्या गिरण्यांत हिंदी कपाशीचा फारसा खप होत नाहीं, परंतु अलीकडे ही कपास वाढत्या प्रमाणावर वापरण्याचा तेथें प्रयत्न चालू आहे. जपानमध्यें हिंदी कपाशीस अनेक वर्षें जोराची मागणी आहे. हिंदी उत्पादनापैकीं सुमारें तिसरा हिस्सा कपास मुंबई येथें येते, व शिवरी येथील डेपोमध्यें ती साठवण्यांत येते. मुंबईच्या कपास बाजारावर देखरेख ठेवण्याचें काम ईस्ट इंडिया कॉटन असोसिएशनकडे आहे. मुंबईजवळच शेवरी येथें असोसिएशनची ' कॉटन एक्सचेंज ' आहे, ती बांधण्यास १८ लक्ष रुपये खर्च आला. तेथें बहुतेक प्रमुख कपास-व्यापाऱ्यांच्या कचेऱ्या आहेत. जवळच अधिकृत लवादांचीं दालनें आहेत व वायद्याचे सवदे ठरविण्याची ' रिंग ' आहे. कॉंक्रीटचें बांधलेले, कपास सांठविण्याचे १७८ गाळे आहेत, त्यांत ५ लक्ष गांसड्या राहूं शकतात. प्रत्येक गाळा १११ फूट लांब, ४३ फूट रुंद व ३० फूट उंच आहे. ह्या संस्थेची स्थापना १९२१ सालीं झाली आणि तिच्याकडे कॉटन एक्सचेंज चालविणें, खरेदी-

विक्रीच्या करारांवर देखरेख ठेवणें, इत्यादि कपाशीच्या धंद्यासंबंधींचीं कामें सोंपविण्यांत आलेलीं आहेत. इंडियन सेंट्रल कॉटन कमिटी ही मध्यवर्ती संस्था, कपाशीचें उत्पादन कसें सुधारेल, दर एकरीं उत्पादन कसें वाढेल, शेतकऱ्यांस त्यांच्या श्रमाचा मोबदला कसा मिळेल, धाग्याच्या लांबींत इष्ट ती वाढ कशी घडवून आणतां येईल, इत्यादि प्रश्नांचा विचार करण्यासाठी व त्यासंबंधीं प्रयोग करण्यासाठी, कायद्यानें स्थापण्यांत आलेली आहे. कपाशीच्या उत्पादनावर ,लहानशी पट्टी असून तिच्या उत्पन्नांतून ह्या कमिटीचा खर्च चालतो.

मुंबई येथील सर्व व्यवहार ७८४ पौंडांच्या खंडीच्या हिशेबानें होतात. ४० घनफूट कपास १ टन भरते, असें प्रमाण ठरलेलें आहे. मुंबई बंदरांतून निर्गत होणारी कपास ३९२ ते ५०० पौंड वजनाच्या गासड्यांतून होते. कराची, कलकत्ता किंवा मद्रास येथील पद्धतींत वेगळें परिमाण आढळून येईल. ईस्ट इंडिया कॉटन असोसिएशनच्या नियमानुसार खालील प्रकारच्या कपाशीचे व्यवहार करतां येतातः—

| कपाशीचा प्रकार. | धाग्याची लांबीः इंच. | जिनिंगचें प्रमाण. | लागवडीचा प्रदेश. |
|---|---|---|---|
| १ बंगाल | ४/८ | ३५ | मध्यप्रांत, राजपुताना, सिंध, पंजाब. |
| २ भडोच | ७/८ ते १ | ३१ | गुजरात. |
| ३ उमरा ( फाइन फुल्लीगुड ) | ५/८ ते ६/८ | ३५ | वऱ्हाड, मध्यप्रांत, मध्य-हिंदुस्थान, खानदेश. |
| ४ सदर्न्स, वेस्टर्न्स, नॉर्दर्न्स | ६/८ | २५ | मद्रास, विजापूर, मिरज. |

## कपाशीचे मुख्य बाजार

कपास बाजारांत कपाशीची किंमत, रोखे बाजारांतील रोख्यांप्रमाणेंच क्षणोक्षणीं बदलत असते. सुरवातीचे वेळेस भाव तेजीचा असेल, तर मध्यंतरीं तो पडून पुनः चढेल व पुनः उतरेल, अशीं बाजारभावांत सारखीं स्थित्यंतरें होत असतात. पिकांसंबंधीं माहिती, हवा व पाऊस ह्यांचा पिकांवर काय परिणाम होत आहे ह्याबद्दलच्या ताज्या बातम्या, राजकीय घडामोडी, खरेदी-विक्रीमधील चढाओढ इत्यादि गोष्टी ह्या आंदोलनास कारणीभूत

होतात. न्यूयॉर्क येथील बाजाराचें महत्त्व किती आहे, हें वर सांगितलेंच आहे. न्यूयॉर्क, लिव्हरपूर, मुंबई ह्यांच्या वेळांत फरक असल्याकारणानें न्यूयॉर्क येथें सकाळचे १० वाजले म्हणजे लिव्हरपूल येथें दुपारचे ३ वाजण्याची वेळ असते व मुंबई येथील घड्याळांत रात्रीचे पावणेआठाचा सुमार असतो. असतात. न्यूयॉर्कचा बाजार उघडला, कीं सुरवातीचे बाजारभाव विद्युत्-संदेशानें जगभर पसरतात व त्याच्या अनुरोधानें इतर बाजारभाव हेलकावे खातात. सर्व बाजारांचा अशा तऱ्हेच्या संदेशांमुळें एकमेकांशीं निकट संबंध राहतो. एका बाजाराच्या ठिकाणाहून दुसऱ्या बाजाराकडे कपास पाठविण्यास जी वहातुक पडेल व विम्याचे पैसे द्यावे लागतील, त्यामानानें दोन बाजारांतील भावांत कांहीं विशिष्ट अंतर राहील. स्थानिक परिस्थितीचाहि बाजारभावांवर तात्पुरता परिणाम होईल. कित्येक व्यापारी, ही निरनिराळ्या कारणांनीं घडून येणारी तफावत कमी-जास्त होईल त्याप्रमाणें, एका बाजारांत विकत घेणें व दुसऱ्या बाजारांत विकणें, असे 'स्ट्रॅडल' चे व्यवहार करतात व त्यावर नफा मिळवतात. अमेरिकन कपाशीच्या मानानें हिंदी कपास महागली किंवा स्वस्त झाली, कीं हे व्यवहार करण्यास संधी मिळते. लिव्हरपूल कपाशीची एका पॉइंटनें ( $\frac{1}{100}$ पेनी ) किंमत वाढली, कीं १०० गांसड्यांच्या किंमतींत २ पौंडांचा फरक पडतो, असा हिशेब करण्यांत आलेला आहे.

## वायद्याचे करार

रोखे बाजाराचें वर्णन करतांना 'बैल' (बुल्) व 'अस्वल' (बेअर) ह्यांच्या व्यवहारांची माहिती दिलेलीच आहे. भाव वाढेल अशा अपेक्षेनें वायदे करणारांस 'बुल' असें म्हणतात; ह्याच्या उलट, 'बेअर' हे बाजारभाव पडण्याची वाट पहात असतात. अमूक इतके रोखे, कपास किंवा इतर जिनसा विकण्याचा अगर विकत घेण्याचा करार केला असतांना, करार केलेला दिवस व ऐनजिनसी विक्री किंवा खरेदी करण्याचा दिवस ह्यांमध्यें बराच काळ लोटत असला, तर ह्या व्यवहारास 'फ्यूचर' किंवा 'वायदा' असें म्हणतात. कपाशीचे वायदे कित्येक महिन्यांचे असूं शकतात. देणें किंवा घेणें ताबडतोब ऐनजिनसी पार पाडलें पाहिजे, अशी करारांत अट असेल, तर त्या व्यवहारांस 'स्पॉट' असें म्हणतात. कराराप्रमाणें जिनसा घेण्याची किंवा देण्याची फारच थोड्या धंदेवा-

त्यांची इच्छा किंवा तयारी असते; कराराची पूर्तता करण्याऐवजी देणीं-घेणीं टाळून केवळ बाजारभावाच्या आंदोलनांवर पैसे मिळविण्याची सर्वांची खटपट असते. ह्याची सोय, ' पुट, ' ' कॉल ' व ' स्प्रेड ' किंवा ' स्ट्रॅडल ' च्या द्वारें उत्तम होते. दुसऱ्या इसमांस ठराविक वेळीं व ठरलेल्या दरानें रोखे किंवा माल विकण्याचा हक्क, म्हणजेच ' पुट '; व ' कॉल ' म्हणजे, वरीलप्रमाणेंच परंतु माल विकत घेण्याचा हक्क होय. ह्या हक्कांची खरेदी-विक्री करतां येते. रोखा किंवा माल विकणें किंवा विकत घेणें ह्यांपैकीं कोणतीहि गोष्ट करण्याच्या विकल्पाच्या अधिकारास ' स्प्रेड ' किंवा ' स्टॅडल ' अशी संज्ञा आहे. ह्या हक्कांच्या खरेदी-विक्रीस पडणारी किंमत व त्या हक्कांची बजावणी अर्थातच बाजारांतील परिस्थितीवर अवलंबून असते.

## ' हेजिंग ' किंवा ' कव्हरिंग '

आपण करीत असलेल्या व्यवहारांत खोट येऊं नये, ह्यासाठी वायदेवाले काळजी घेत असतात. लांब मुदतीचे वायदे करतेवेळीं, ते पार पाडण्याची पाळी येईल तेव्हां काय परिस्थिति निर्माण होईल ह्याचा बिनचुक अंदाज करतां येणें शक्य नसतें. तेव्हां, स्वसंरक्षणार्थ 'हेजिंग'चे व्यवहार करण्याची पद्धत आहे. एका गिरणीवाल्यानें मे महिन्यांत करार करून दिवाळीचे वेळीं विशिष्ट भावानें घाउक व्यापाऱ्यांस कापड विकण्याचें कबूल केलें, असें आपण समजूं. जर त्या सुमारास कपाशीचे बाजारभाव चढले, तर त्यामुळें कारखानदाराचें नुकसान होईल, हें उघड आहे. परंतु, मे महिन्यांत करार करून त्यानें सप्टेंबरमध्यें घ्यावयाच्या कपाशीचा दर अगाऊ ठरवला, तर वाढलेल्या भावाचा परिणाम त्याचे व्यवहारावर प्रतिकूल होणार नाहीं व कापडाची विक्रीची किंमत आणि कपाशीचा भाव हीं त्यास सोइस्कर रीतीनें कराराचे वेळींच ठरवितां येतील. ' तयार ' कपास खरेदी केली तरी ती विकण्याच्या वायद्याचा करार त्याच वेळीं करणें दूरदर्शीपणाचें असतें आणि अशा व्यवहारांत नफा-नुकसानीची वजावाट होते. रोखीनें कपास विकत घेतां येणें शक्य असलें, तरी त्यामुळें भांडवल गुंतून पडत असल्याकारणानें तसें करणें काटकसरीचें होणार नाहीं; हेजिंगच्या पद्धतीनें ठराविक वेळीं होणाऱ्या व्यवहारांतील उद्भवणाऱ्या नफा-नुकसानीची तरतूद अगाऊच केलेली असते. ही कारखानदार-खरेदीदाराची सोय झाली. कपास विकणाऱ्या व्यापाऱ्यास, त्यास जर आज भाव

आला नाहीं व भाव जर पडूं लागले, तर वायद्याच्या व्यवहारांचे योगानें पडत्या बाजारापासून होणारें नुकसान थोडेंफार टाळतां येतें. केवळ व्यापारी हेतूनें व्यवहार करणारांस सट्ट्यांच्या योगानें बाजारभावांच्या हेलकाव्यांपासून संरक्षण मिळतें. कपास किंवा इतर पिकें ह्यांचें वर्षभर एकसारखें उत्पादन होत नसतें. सर्व पीक एकदम तयार होतें. मालाचे बाजार व त्यांत चालणारे सट्टे ह्यांच्या योगानें पिकाची किंमत एकदम चढत किंवा उतरत नाहीं; ती वर्षभर कमी-अधिक स्थिर रहाते. थोडेफार हेलकावे तिला बसतात, परंतु वायद्याच्या बाजारांचे अभावीं किंमतींत भयंकर चढ-उतार होतील व त्या आंदोलनांचा अदमास न लागल्याकारणानें कपास ज्या पक्क्या मालाच्या उत्पादनांत वापरण्यांत येते, अशा जिनसांच्या किंमतींतहि स्थैर्य रहाणार नाहीं आणि व्यापारी जगांतील सर्व व्यवहार चाचपडत करावे लागून, भवितव्याबद्दल नेहेमीं काळजी करीत बसावें लागेल. सट्ट्यांचे योगानें बाजारांस स्थैर्य प्राप्त होतें, नफ्या-तोट्याची जबाबदारी घेणारा सट्टेवाल्यांचा विशिष्ट वर्ग निर्माण होतो आणि मामुली आर्थिक व्यवहार सुरळीतपणें चालण्यास त्यांचें सहाय होतें. बाजारभावांतील पुढें होणाऱ्या चढ-उतारामुळें प्रत्यक्ष खरेदी-विक्रीचे वेळीं नुकसान होऊं नये म्हणून खरेदीबरोबर विक्री व विक्रीबरोबर खरेदी मुदतीच्या करारानें अगाऊ करून ठेवणें ह्यास ‘हेज’ म्हणतात; भिन्न भिन्न बाजारांतील किंमतींमध्यें वहातुक व विमा वगैरेंचा खर्च लक्षांत घेतला जाऊन विशिष्ट प्रकारचें परस्पर-प्रमाण किंवा मेळ बसतो ही त्यांच्या-मधली ‘पॅरिटी’ होय. कांहीं कारणांमुळें हा मेळ बिघडल्यास स्वस्त दिसणाऱ्या बाजारांत खरेदी करून महागाईच्या बाजारांत त्याच वेळीं विक्री करणें हा ‘स्ट्रॅडल्’चा व्यवहार होऊं शकतो.

## सट्टेबाजी ( स्पेक्युलेशन )

आपले व्यवहार सुव्यवस्थित चालावे ह्यासाठी व्यापारी व कारखान-दार ह्यांनीं सट्टे करावे, हें रास्तच आहे. परंतु, बाजारांत ‘सट्टेबाजी’ या नांवानें ओळखले जाणारे जुगारी प्रवृत्तीचे व्यवहार व्हावे, हें योग्य नाहीं. तथापि, खरेदी किंवा विक्री करण्याचा यत्किंचितहि हेतु नसतांना, कित्येक लोक वायद्याचा धंदा करतात व बाजारास सट्ट्यांच्या अड्ड्याचें स्वरूप आणतात. कपाशीच्या गासड्यांचा ज्यांस उपयोग होणें शक्य नाहीं

व त्या कित्येकांनीं डोळ्यांनीं पाहिल्याहि नसतील असे ब्रोकर व कारकून— कित्येक अगदी सामान्य अनभिज्ञ माणसें—सट्ट्यांचे व्यवहार करून, कंड्या पिकवून, उचापती काढून, हरएक मार्गांनीं पैसा मिळवूं पहातात. ह्यामुळें, वायद्यांवर नियंत्रण ठेवणें जरूर झालें असून, 'सेटलमेंट' किंवा देणीं-घेणीं मिटविणें महिन्यानें, आठवड्यानें, शक्य असल्यास दररोज, करणें सट्टेवाल्यांच्या कारवाईस आळा घालण्यासाठी आवश्यक झालें आहे. न्यूयॉर्क व लिव्हरपूल येथें हे व्यवहार रोज व साप्ताहिक पटावटीच्या (सेटलमेंटच्या) मार्गांनीं नियंत्रित केलेले आहेत. मुंबईच्या बाजारांत अशा नियंत्रणाची आवश्यकता कित्येक वर्षें भासत होती, ती आतां दूर झाली आहे. ईस्ट इंडिया कॉटन असोसिएशनचा सौदा १५ दिवसांत व महाजन असोसिएशन ह्या कपास बाजारांतील दुसऱ्या एका संस्थेचा सौदा ८ दिवसांत पटवला जातो. सौदा करण्यासाठी गासड्यांचा किमान आंकडा ठरलेला असतो, त्याखाली व्यवहार करतां येत नाहीं. गिऱ्हाइकांतर्फें सवदा करतांना दलालाजवळ कांहीं किमान रकम अमानत ठेवावी लागते. मुंबई येथें कपास बाजार केंद्रीभूत झाला आहे, परंतु कलकत्ता, इंदूर, अमरावती, बिकानेर व खुद्द मुंबई येथें 'कच्चा खंडी' व 'अमेरिकन फ्यूचर्स,' ह्या नांवानें ओळखले जाणारे व्यवहार प्रचलित आहेत. ह्या व्यवहारांत देण्या-घेण्याचा कधीं प्रश्नच उपस्थित होत नाहीं. फक्त तफावतीची देवघेव होते. जुगारीचाच हा एक प्रकार आहे.

## उपपत्ति आणि समर्थन

कोणत्याहि वस्तूची किंमत तिला येणारी मागणी व त्या वस्तूचा पुरवठा, ह्यांच्या मेळावर अवलंबून असते. कपास, ताग इत्यादि पिकांचा पुरवठा, कारखान्यांत तयार होणाऱ्या मालाप्रमाणें, एकजात वर्षभर होत नसतो. पिकें तयार होण्याचा हंगाम ठरलेला असतो व नेहमींच्या अनुभवाप्रमाणें मोसमांत भाव कसे रहातील ह्याची साधारण कल्पना असते. वायद्यांच्या व्यवहारांमुळें पुढें उपस्थित होणाऱ्या गोष्टींचा परिणाम आजच्या बाजारभावावर होतो. ह्यामुळें, कांहीं महिन्यांनीं बाजारांत येणारें पीक चांगलें असण्याचा संभव नसेल, तर आजच भाव वाढतील व पिकाचें उत्पादन वाढेल अशी अपेक्षा असेल, तर भाव उतरतील. अशा रीतीनें, पिकांसंबंधांतल्या अंदाजांचा परिणाम रोजच्या बाजारभावांवर होतो व त्यामुळें ते स्थिर

रहातात. सट्ट्यांची ही आर्थिक उपपत्ति व प्रयोजन लक्ष्यांत येणें जरूर आहे. कपाशीच्या पिकानें एकंदर किती क्षेत्र व्यापिलें आहे ह्याचा प्रत्येक ऑगस्ट, ऑक्टोबर, डिसेंबर, फेब्रुवारी व एप्रिल ह्या पांच महिन्यांत अंदाज प्रसिद्ध करण्यांत येतो. १५ फेब्रुवारी रोजीं जाहीर होणाऱ्या अंदाजांतील आंकडे ज्यास्त विश्वसनीय असण्याचा संभव असतो. तांदूळ, गहूं, गळिताचीं धान्यें, तीळ, भुइमूग, ऊंस व ताग ह्या सर्व पिकांचे बाबतींतील अंदाज प्रसिद्ध होण्याच्या तारखा ठरलेल्या असतात व हंगामाप्रमाणें प्रत्येक पिकाचे संबंधांत त्या वेगवेगळया असतात.

## व्यवहारांतील कांहीं कल्पत्या

रोखे बाजारांत काय किंवा कपास बाजारांत काय, इतरांस आपलें मनोगत न समजूं देतां व्यवहार करणारा चतुर मनुष्यच फायदेशीर रीतीनें धंदा करूं शकतो. सर्वजण जेव्हां विकत असतील तेव्हां आपण खरेदी करावयाची, ते खरेदी करूं लागले कीं आपण विक्री करावयाची; थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे बाजाराच्या कलाविरुद्ध व्यवहार करावयाचे, असें हें तंत्र असतें व त्यांत नफा मिळण्याचा संभव बराच असतो. तोटा होऊं लागल्यास, तो वाढूं न देतां कापून टाकावा व चलती असली तरी भारून जाऊं नये, हें येथें शहाणपणाचें धोरण ठरतें. सट्टेवाल्यांच्या अंगीं असाव्या लागणाऱ्या गुणांत, आत्मविश्वासास प्रमुख स्थान दिलें पाहिजे. वेगवेगळया गोष्टी ताडून पाहून तात्काल निर्णय करण्याची कला, धारिष्ट्य, हुशारी, मतांत जरूरीप्रमाणें बदल करण्याची तयारी, इत्यादि गुणांखेरीज सट्टेवाला यशस्वी होणार नाहीं. ह्या सर्वांचा समुच्चय त्याचे अंगीं असला पाहिजे. निरनिराळ्या प्रकारच्या मालाच्या बाजारांसंबंधांतील बातम्या व अहवाल ह्यांचे नमुने व त्यांचें स्पष्टीकरण हीं खाली दिलीं आहेत.

## कपास बाजाराची बातमी

२२ सप्टेंबर, १९३५.

## लिव्हरपूल व न्यूयॉर्क कॉटन

### न्यूयॉर्क

युरोपांतील बिघडलेल्या राजकीय परिस्थितीमुळें मागणी जास्त आली व त्या कारणानें भाव तेजीचे राहिले. डॉलरची मजबुती हें सुद्धा एक प्रभावी कारण होतें. संध्याकाळीं मात्र हेजिंगच्या व्यवहारामुळें सुरवातीची चढीची

प्रवृत्ति मंदावली व भाव पडले. इटली व ॲबिसिनिया ह्यांचा लढा मिटणार, अशा बातमीमुळें आशेस पुनः जागा उत्पन्न झाली. शेवटीं तीन ते सहा पॉइंट्सनीं ( दोकडे ) सर्व भाव खाली आले. शेतकरी आपली कपास बाहेर काढीत नाहींत व त्यांस विक्रीची घाई दिसत नाहीं. बाजाराचे सुरवातीस ऑक्टोबर ऑप्शनची किंमत १०·७२ होती, म्हणजे आदल्या दिवशींच्या अखेरच्या भावापेक्षां किंमतींत १० पॉइंट्सचा वाढावा झाला. लढाईच्या भीतीमुळें खरेदीस जोर येऊन भाव तेजींत राहिला. अखेरीस विक्रीवाल्यांची संख्या वाढून भाव १०·६७ वर घसरला. स्पॉटचा दर १०·९५–०५ असा होता.

## लिव्हरपूल

ऑक्टोबर ऑप्शन्चा भाव ५·९५ वर चालू झाला. न्यूयॉर्कमधील खरेदी सांभाळण्यासाठी स्ट्रॅडलनें विक्री करणारांच्या व्यवहारामुळें सुरवात मंदीची झाली. एका पॉइंटनें भाव पुढें उतरला. मुंबईकडील व युरोपमधील मागणीमुळें नंतर बाजार सुधारला आणि तो ६·०५–९ इतक्यावर स्थिरावला. ऑक्टोबरचा दर अखेर ५·९६ वर स्थिर झाला.

( बाजारभावांत ‘ पॉइंट ’चा उल्लेख असतो, तो शंभर सेंट किंवा पेन्स ह्यांमध्यें एक भाग म्हणजे $\frac{१}{१००}$ हिस्सा समजावा. न्यूयॉर्कमधील भाव एक पौंड कपाशीस किती सेंट ? ह्या दरानें आकारण्यांत येतात. १०० सेंट = १ डॉलर असें चलनाचें प्रमाण आहे. लिव्हरपूल येथील भाव पेन्सांत दिलेले आहेत. १२ पेन्स = १ शिलिंग व २० शिलिंग = १ पौंड असें चलनाचें प्रमाण आहे. ह्यावरून खालील कोष्टकांचा अर्थबोध होईल. )

## न्यूयॉर्क

सप्टेंबर २०.

| आदल्या दिवशीचा अखेरचा भाव | वायदा | सुरवात | शेवट | फरक |
|---|---|---|---|---|
| १०·६२ | ऑक्टोबर | १०·७२।७२ | १०·५७ | –०५ |
| १०·६५ | डिसेंबर | १०·७५।७३ | १०·६१ | –०४ |
| १०·६८ | जानेवारी | | १०·६५ | –०३ |
| १०·७६ | मार्च | | १०·७२ | –०४ |
| १०·८३ | मे | | १०·७७ | –०६ |
| १०·८९ | जुलै | | १०·८४ | –०५ |

न्यूयॉर्कः ऑक्टोबर कमाल दरः १०·७४ ( सकाळीं १० वाजून ४ मिनिटांनीं ); किमान दर : १०·५६ ( दुपारीं २ वाजून ५७ मिनिटांनीं ); न्यू यॉर्क स्पॉट : १०·९५– ०५; न्यू ऑर्लिअन्स स्पॉट : १०·८३ – ०३.

## लिव्हरपूल कपास

लिव्हरपूल, सप्टेंबर २१.

| | |
|---|---|
| आदले दिवशींचा बंद भाव ... ... ... | ५·९६ |
| आजचा अंदाज ... ... ... ... | ५·९३ |
| तफावत ... ... ... ... ... | –३ |
| आजची सुरवात ... ... ... ... | ५·९२ |
| तफावत ... ... ... ... ... | –४ |

बाजाराचा कलः स्थिर

## लिव्हरपूल

| आदल्या दिवसाचा अखेरचा भाव | वायदा | सुरवात | शेवट | फरक |
|---|---|---|---|---|
| ५·९६ | ऑक्टोबर | ५·९५ | ५·९६ | = |
| ५·८७ | जानेवारी | | ५·८८ | +०१ |
| ५·८९ | मार्च | | ५·९० | +०१ |
| ५·९० | मे | | ५·९१ | +०१ |
| ५·८९ | जुलै | | ५·९१ | +०२ |
| ५·८१ | ऑक्टोबर | | ५·८३ | +०२ |

ईस्ट इंडियन फ्यूचर्सचा बाजार स्थिर होता. ऑक्टोबर व जानेवारी वायद्यांचे बंद भाव ५·१७ + ०२ व ४·९६ + ०२ असे होते.

## मुंबई : सप्टेंबर २१, ( २ वाजतां )

भडोच कपाशीचा एप्रिल–मे १९३६ वायद्याचा दर २०५ रु० ४ आ० होता, त्यांत चार आण्यांनीं वाढ होऊन तो २०५ रु० १२ आण्यां-पर्यंत चढला.

| | | |
|---|---|---|
| भडोच : | एप्रिल–मे : | २०५ रु० १२ आ० |
| उमरा : | डिसेंबर–जानेवारी : | १८७ रु० |
| बंगाल : | डिसेंबर–जानेवारी : | १३९ रु० १२ आ० |

दि इंडियन कॉटन कं० लि० ह्या कपासबाजारांतील दलालांच्या फर्मला त्यांच्या न्यूयॉर्कमधील मित्रांकडून २० तारखेची खालीलप्रमाणें तार आली आहेः—

" इटालियन स्पॉटवाल्यांच्या मागणीमुळें बाजारास चालना मिळून 'बुल्स'चें फावलें आहे. व्यापारामुळें भावास तेजी आहे. कोरड्या मालाचा उठाव उत्तम आहे "

वर निर्दिष्ट केलेले मुंबईतील बाजारभाव एका खंडीस किती रुपये, ह्या हिशेबाचे आहेत. १ खंडी = यंत्रानें जिन केलेली ७८४ पौंड कपास.

न्यूयॉर्क, लिव्हरपूल इत्यादि ठिकाणांहून येणाऱ्या बातम्यांचा स्थानिक बाजारावर परिणाम होत असतो. त्याचप्रमाणें, कपाशीच्या चांगल्या-वाईट प्रतीवर तिला येणारी किंमत अवलंबून असते. वरील कोष्टकांतील दर हे एका दिवसांतील व्यवहारांचे आहेत. वेगवेगळ्या तुलनात्मक बाबी आंत दाखल असलेलीं अशीं अनेक प्रकारचीं कोष्टकें कपाशीसंबंधानें तयार करण्यांत येतात, त्यांचा उपयोग व्यवहार करणारांस अदमास बांधण्याच्या कामीं होतो. कपाशीच्या जागतिक उत्पन्नाचा व पुरवठ्याचा अंदाज, कपाशीची बाजारांत झालेली आयात, त्यांत शिल्लक असलेला माल, निर्गत, अमेरिकेंतलें हवापाणी, सूत व कापड ह्यांच्या बाजारभावांतील चलबिचल, व्यापारावर ज्यांचा परिणाम होण्याचा संभव आहे, अशा राजकीय घडामोडी, इत्यादि बाबतींतली महत्त्वाची माहिती वृत्तपत्रीय अहवालांत प्रसिद्ध केली जाते. तिच्याकडे धंदेवाल्यांचें सतत लक्ष्य असतें.

## चहा.

चहाच्या व्यापारांत हिंदुस्थान देश अग्रेसर असून कलकत्ता शहर हें चहाच्या व्यापाराचें केंद्र होय. तेथें 'चहाचा बाजार' असून लिलाव होत असतात. आंतरराष्ट्रीय करारांचे योगानें आतां चहाच्या निर्गतीचें नियमन करण्यांत आलें आहे. १९३३ सालीं हिंदुस्थानांत एकूण सुमारें ४३ कोटि पौंड चहाचें उत्पादन झालें; त्यांपैकीं एकट्या आसाम प्रांताचा वांटा २६ कोटींचा होता. चहाचें क्षेत्र दिवसेंदिवस वाढत आहे. इतर पिकांचे बाजार व चहाचा बाजार ह्यांमध्यें फरक असा आहे कीं, चहाची विक्री फक्त मर्यादित मोसमांत, मे ते जानेवारी-फेब्रुवारीपर्यंत होत

असते. विक्रीची पद्धतहि विशिष्ट तऱ्हेची आहे. दरवर्षीं चहाचे अनेक लिलाव होतात; १९३३ मध्यें असे एकंदर ३४ लिलाव झाले.

मर्यादित अवधींत तयार होणारा चहा एकदम बाजारांत येऊं देणें अनिष्ट असल्यामुळें, साप्ताहिक लिलाव करून त्याची विक्री व्हावी, ह्या संबंधांत त्या धंद्यांतील लोकांचें ऐकमत्य आहे. लंडन हें चहाचें जागतिक केंद्र आहे व तेथील बाजारभावांप्रमाणें येथील भाव हेलकावे खात असतात. चहाचे जे लिलाव होतात, त्यांत विक्रेते दलाल हे मळ्यांच्या मॅनेजिंग एजंट्सतर्फे विक्री करतात व घाऊक खरेदीदारांचे दलाल लिलाव बोलतात. चहाचे अनेक नमुने तपासले जाऊन त्यांसंबंधीं माहितीपत्रकें छापून प्रसिद्ध करण्यांत येतात व चहाच्या मालकांकडून, कोणत्या किंमतीस चहा विकावा, ह्यासंबंधीं हुकूम येईल, त्याप्रमाणें दलाल चहाची विक्री करतात. अमूक एक दर आला, तरच विका किंवा येईल त्या दरानें विका, अशा स्वरूपाच्या सूचना मळेवाल्यांतर्फे दलालांस मिळत असतात.

१९३२–३३ च्या मोसमांतील लिलावांचा बारकाईनें विचार केला, तर असें आढळून येतें कीं, पुरवठ्यांत वाढ झाल्यामुळें मध्यंतरीं २३ सप्टेंबर रोजीं भाव घसरून ४ आणे ३ पैवर आले, परंतु पुढील वर्षी उत्पादनास मर्यादा घालण्यांत येणार, ह्या बातमीमुळें ५ आणे ५ पैपर्यंत भाव चढले. त्यांत पुनः उतार झाला व नंतर पुनः वाढ झाली. निर्गतीच्या व्यापारांत कलकत्त्याचा हिस्सा सुमारें ६० टक्क्यांचा आहे. चितगांव ( २४ टक्के ) व मद्रास ( १४ टक्के ) हे त्याच्या खालोखाल येतात. ग्रेट-ब्रिटन हें हिंदुस्थानाच्या चहाचें प्रमुख गिऱ्हाइक होय.

### चहाचा साप्ताहिक बाजार

कलकत्ता, सप्टेंबर १२, १९३५

निर्गतीसाठी एकूण १४,७०० पेट्या चहा बाजारांत आला (१ पेटी= ८० ते १२० पौंड ), त्यांपैकीं १४,१०० पेट्या सरासरी ९ आणे २ पै दरानें विकल्या गेल्या. गतसालांतील ह्याच आठवड्याचे मानानें भाव ८ पेनी जास्त आला. मागील आठवड्यांतील चहाच्या दर्जाचाच हा चहा होता. पत्ती व ब्रोकन ऑरेंज पीको खेरीज बाकी सर्व तऱ्हेच्या चहास चांगली मागणी होती. खालच्या दर्जाच्या ब्रोकन्स व फॅनिंग्ज ह्यांच्या दरांत ६ पै वाढ झाली.

अंतर्गत खप व्हावयाच्या चहाच्या २३,५०० पेट्यांपैकीं ९,६०० पेट्या डस्ट चहाच्या व उरलेल्या पत्ती व ब्रोकन चहाच्या होत्या. सव तऱ्हेच्या डस्टला मागणी चांगली होती. ऑगस्ट अखेरची एकूण उलाढाल १७·२ कोटि रुपयांची झाली. ह्याच मुदतींत गेल्या सालीं १८ कोटींची उलाढाल झाली होती.

**१४ व्या लिलावासंबंधीं तपशील**

( ९ सप्टेंबर, १९३५ )

**निर्गतीसाठी**

| | पत्ती | |
|---|---|---|
| | १९३५ | १९३४ |
| बाजारांत आला | १४,६६५ पेट्या | १७,२८४ पेट्या |
| विकला गेला | १४,१३२ ,, | १५,०२७ ,, |
| सरासरी दर | ०–९–२ | ०–८–६ |

**अंतर्गत उठाव**

| | डस्ट | | इतर प्रती | |
|---|---|---|---|---|
| | १९३५ | १९३४ | १९३५ | १९३४ |
| बाजारांत आला | ९,६५७ | ७,४२८ | १३,९०९ | १६,८७२ |
| विकला गेला | ९,४५९ | ७,३९१ | १२,६७३ | १५,५२१ |
| सरासरी दर | ०–४–११ | ०–५–५ | ०–४–८ | ०–५–१ |

**निर्गतीसाठी**

| | १० सप्टेंबर १९३५ | ११ सप्टेंबर १९३४ |
|---|---|---|
| कॉमन ब्रोकन पिको सुचांग | ८–३ ते ८–६ | ८ |
| कॉमन ब्रोकन पिको | ८–६ | ८–३ |
| कॉमन ब्रोकन पिको | ८–३ | ८–६ ते ८–९ |

**अंतर्गत उठाव**

| | १० सप्टेंबर १९३५ | ११ सप्टेंबर १९३४ |
|---|---|---|
| कॉमन ब्रोकन् पिको सुचांग | ४–३ ते ४–६ | ४–६ ते ४–९ |
| ,, पिको | ४–६ ते ४–९ | ४–९ ते ५ |
| ,, पिको | ५ | ४–९ ते ५ |

---

१७ व्या.

## ताग

तागाचे उत्पादनांत व व्यापारांत बंगाल प्रांताचें वर्चस्व अबाधित आहे. गंगा आणि ब्रह्मपुत्रा ह्यांचे दुआबांत, बंगाल, आसाम, बिहार आणि ओरिसा व कुचबिहार हीं लागवडीचीं प्रमुख क्षेत्रें होत. मार्च ते मे पेरणी होऊन पिकांचा उठाव जुलै ते सप्टेंबरमध्यें होतो. सरासरीनें २० ते २५ लक्ष एकर जमीन तागाखाली असते व तीवर ३० लक्ष लोकांचें पोट अवलंबून आहे. तागास मुख्यतः कलकत्ता येथील गिरण्यांकडून मागणी येते. ह्या गिरणीवाल्यांत जूट असल्यामुळें त्यांस फारच सोईचे भाव मिळवतां येतात. सट्टेवाल्यांच्या दृष्टीनें तागास एक विशिष्ट महत्त्व आहे, कारण त्याची लागवड फक्त बंगाल्यांत व त्याच्या आसपास होते; जगांत इतरत्र कोठेंहि होत नाहीं. मुंबई येथील ईस्ट इंडिया कॉटन असोसिएशनच्या धर्तीवरच कलकत्ता येथील ईस्ट इंडिया जूट असोसिएशनचें काम चालतें. ४०० पौंड वजन तागाची एक गासडी असते. रंग, तकाकी व लांबी ह्यांवर तागाचा भाव अवलंबून असतो. उत्तरीय, देसवाल, देशी, देवरा इत्यादि नांवांनीं वेगवेगळया प्रती ओळखल्या जातात व नारायणगंज, सेराजगंज इत्यादि गांवांच्या नांवावरूनहि कांहीं तागाचें वर्गीकरण झालें आहे. रिजेक्शन्स म्हणजे अगदी हलक्या दर्जाचा ताग होय आणि कटिंग्ज हीं झाडांचे कठिण शेंडे होत. तागाच्या अत्युत्कृष्ट धाग्यास हेसिअन असें म्हणतात. ह्या नांवाचा उगम डंडी ह्या तागाच्या कारखान्याच्या व्यवहारांत आहे. हेसिअनचेच उभे-आडवे धागे विणून ‘हेसिअन्स’ तयार होतात. एरव्हींच्या तागाच्या कापडांत वापरण्यांत येणाऱ्या उभ्या धाग्यांस ‘पोर्टर’ व आडव्या धाग्यांस ‘शॉट’ असें म्हणतात. पोतीं विणण्यांत वापरतात तें ‘कॉर्नसॅक’ हलक्या दर्जाचें, मंद रंगाचें व चमक नसणारें सूत असतें.

## कलकत्त्याचा बाजार

### कच्चा ताग

कलकत्ता, सप्टेंबर १९३५.

अहवालाचे मुदतींत तागाचा बाजार स्थिर होता. पूजा सणाचे पूर्वी खेड्यांतून कलकत्त्यांत होणाऱ्या आयातींत व्हावयाची अपेक्षित वाढ अजून घडून आलेली नाहीं. शेतकरी लोक भाव सुधारण्याची वाट पहात आहेत. खरेदीदार मात्र सप्टेंबरमध्यें व्हावयाच्या निर्गतीसाठी केलेल्या खरेदीचें संरक्षण करूं पहात आहेत.

## कलकत्ता

| सप्टेंबर | फर्स्ट्स (नवीन पीक) रु० | आ० | पै | लाइटनिंग्ज रु० | आ० | पै | ई. इं. ज्यू० वायदा. सप्टेंबर रु० | आ० | पै |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १३ | ३२ | ८ | ० | | | | ३० | ४ | ० |
| १४ | ३२ | ८ | ० | | | | ३० | ६ | ० |
| १६ | | | . | | | | ३० | ८ | ० |
| १७ | ३२ | ८ | ० | २६ | ० | ० | ३० | ४ | ० |
| १८ | ३० | ० | ० | | | | २९ | १४ | ० |
| १९ | – | | | – | | | – | | |

## ताग ( सूत )

## कलकत्ता

| | ९ पोर्टर्स तयार रु० | आ० | पै | ११ पोर्टर्स तयार रु० | आ० | पै |
|---|---|---|---|---|---|---|
| सप्टेंबर १३ | ७ | ६ | ६ | ९ | ११ | ६ |
| १४ | ७ | ८ | ० | ९ | १४ | ० |
| १६ | ७ | ९ | ० | ९ | १४ | ० |
| १७ | ७ | ९ | ० | ९ | १२ | ० |
| १८ | ७ | ७ | ६ | ९ | ११ | ० |
| १९ | ७ | ६ | ६ | ९ | ११ | ० |
| ऑक्टोबर–डिसेंबर | ७ | ७ | ० | ९ | १३ | ० |
| जानेवारी–मार्च | ७ | ७ | ६ | ९ | १३ | ० |
| एप्रिल–जून | ७ | ७ | ६ | ९ | १३ | ० |

## सोनें व चांदी

सोनें व चांदी ह्यांतील उलाढालीमुळें त्यांच्या बाजारभावांत होणारी घट-वाढ आतां लोकांच्या परिचयाची झाली आहे. २१ सप्टेंबर, १९३१ रोजीं ग्रेट ब्रिटननें सुवर्णचलनाचा त्याग केला, तेव्हांपासून दर आठवड्यास सुमारें एक कोटि रुपये किंमतीचें सोनें बाहेर जाऊं लागलें आहे व त्यामुळें हुंडणावळीस स्थैर्य प्राप्त झालें आहे. जागतिक उत्पादनापैकीं शेकडा २ इतकें

देखील सोनें आपल्या देशांतील खाणींतून निघत नाहीं, तरी सोन्याचें उत्खनन करणाऱ्या देशांत हिंदुस्थानाचा सातवा नंबर लागतो. हिंदी उत्पादनापैकीं शेकडा ९८ वा हिस्सा सोनें कोलारच्या खाणींतून निघतें. मद्रास इलाख्यांत अनंतपूर येथें एक सोन्याची खाण आहे, परंतु त्यांतील उत्पादन फार अल्प आहे. उत्तर ब्रह्मदेशांतील शान संस्थानांत थोडी-फार चांदी सांपडते, परंतु हिंदी मागणीच्या मानानें ती अगदींच अपुरी पडते. चांदीच्या खपाचे दृष्टीनें हिंदुस्थानाचा नंबर फार वर लागेल.

## लंडन चांदी

लंडन, सप्टेंबर १९

बाजार बंद होतांना भाव स्थिर होते.

| | आदले दिवसाचा भाव | आजचा भाव |
|---|---|---|
| स्पॉट ( रोखीनें ) | २९ ३/१६ | २९ ३/१६ |
| वायदा | २९ ५/१६ | २९ १/४ |

वरील दर हे एक औंस चांदीस पडणाऱ्या पेन्सांत दिलेले आहेत.

## न्यूयॉर्क चांदी

न्यूयॉर्क, सप्टेंबर १८

| | मंगळवारचा भाव | बुधवारचा भाव |
|---|---|---|
| तयार | ६५ ३/८ | ६५ ३/८ |

वरील दर सेंट्समध्यें दिलेले आहेत.

## मुंबई सोनें व चांदी

मुंबई, सप्टेंबर २० ( दुपारीं २–४० वाजतां )

### सोनें

| | रु० | आ० | पै० |
|---|---|---|---|
| चार्टर्ड बँक बार | ३५ | ४ | ० |
| नॅशनल बँक | ३५ | १२ | ० |
| मिंट तयार | ३५ | ० | ६ |
| मिंट १ ला वायदा | ३५ | ० | ९ |
| मिंट २ रा वायदा | ३५ | १ | ३ |

**चांदी**

| | | | |
|---|---|---|---|
| इंडियन मिंट तयार | ६७ | २ | ० |
| १ ला वायदा | ६७ | २ | ० |
| २ रा वायदा | ६७ | ४ | ० |

मुंबई, सप्टेंबर १९ ( ५–३० वाजतां )

| | | | |
|---|---|---|---|
| १ ला वायदा | ६६ | ८ | ० |
| २ रा वायदा | ६६ | १२ | ० |

मुंबई, सप्टेंबर १९

**चांदी**—ऑक्टोबर वायदा : सुरवात : ६६ रु. १२ आणे. कमाल : ६६ रुपये १४ आ. ६ पै. किमान : ६६ रु. १० आ. ६ पै. बंद : ६६ रु. ११ आ. ६ पै.

**सोनें**—ऑक्टोबर वायदा : सुरवात : ३४ रु. १५ आ. ३ पै. बंद : ३४ रु. १४ आ. ९ पै.

| | रु० | आ० | पै |
|---|---|---|---|
| मिंट तयार | ३४ | १४ | ६ |
| तयार गिनी | २२ | ३ | ० |
| तयार चांदी | ६६ | ९ | ० |

वरील कोष्टकांत सोन्याचा दर प्रत्येक तोळयास किती रुपये, ह्या हिशेबानें असून, चांदीचा दर १०० तोळयांस पडणारी किंमत दर्शवितो. १ ला वायदा म्हणजे भाद्रपद व २ रा वायदा म्हणजे आश्विन समजावा.

**इतर मालाचे बाजार**

मालाच्या बाजारांतील मुख्य मालाच्या व किंमतवान धातूंपैकीं सोन्याचांदीच्या व्यवहारांची मोडणी समजावून सांगितल्यानंतर आतां इतर मालाच्या बाजारांसंबंधीं संक्षेपानें माहिती दिली तरी पुरे होईल. ‘ जागतिक ’ महत्त्वाच्या दृष्टीनें गव्हाचा नंबर जरी बराच वर लागला, तरी हिंदुस्थानांतील त्याच्या एकूण उत्पादनाच्या मानानें निर्गतीचें प्रमाण शेकडा आठाचे वर नव्हतेंच, परंतु आतां तर निर्गत फारच रोडावली आहे. कराची हें गव्हाच्या व्यापाराचे दृष्टीनें महत्त्वाचें बंदर आहे. मुंबईची खंडी ७५६ पौंडांची आहे, परंतु कराची येथील व्यवहार ६५६ पौंडांच्या खंडींचे हिशेबानें होतात. साखरेचें महत्त्व मात्र आतां अतिशय वाढलें असून ह्या

धंद्यास हिंदी औद्योगिक क्षेत्रांत दुसऱ्या प्रतीचा उच्च दर्जा प्राप्त झाला आहे. अंतर्गत उत्पादन एकूण मागणीस मागें टाकील, इतकी ह्या धंद्याची प्रगति झाली आहे. संयुक्त प्रांत व बहार हे उत्पादनाचे बाबतींत अग्रेसर आहेत आणि पंजाब, मद्रास, मुंबई, बंगाल व ब्रह्मदेश ह्या प्रांतांतील उत्पादन अल्प प्रमाणावर आहे. हंड्रेडवेट व मण हीं त्या धंद्यांतील निर्णायक वजनें आहेत. सिमेंटच्या धंद्यानेंहि आतां चांगलें मूळ धरलें असून, परदेशी सिमेंटची आयात बसली आहे. सिमेंट कंपन्यांच्या भागांस अलीकडे चांगली तेजी आली आहे. लोखंड व पोलाद हे जिन्नस सुद्धा व्यापारी उलाढालीचे दृष्टीनें महत्त्वाचे आहेत. भात, आळशी, शेंगदाणा, एरंडी ह्या पिकांस मालाच्या बाजारांत बरेंच महत्त्व आहे. तांबें, पितळ इत्यादि धातूंचेहि बाजारभाव वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होत असतात. प्रत्येक प्रकारच्या मालाचे वैशिष्ट्यावर त्यासंबंधींचा तपशील अवलंबून राहील. तथापि सर्व बाजारांची व्यवस्था साधारणपणें सारखीच असते हें सांगावयास नको.

वेगवेगळ्या रेलवेजवरील मालाची वहातुक, त्यांचें चालू उत्पन्न व त्यासंबंधीं तुलनात्मक आंकडे, उतारूंच्या वहातुकींत झालेली घट-वाढ, कारखान्यांच्या उत्पादनांचे अहवाल, आयात-निर्गतीचे आंकडे, वेगवेगळ्या क्षेत्रांतील पिकांच्या उत्पदानाचे अंदाज व अहवाल, बँकांचीं साप्ताहिक पत्रकें, ‘ क्लिअरिंग हौस ’ मध्यें झालेली चेक्स्ची उलाढाल, मजूरांच्या चळवळी, संपांची परिस्थिति, ह्या सर्वांचा संबंध बाजाराभावांशीं कमी ज्यास्त येत असतो. रेल्वेजवरील वहातुक व कारखान्यांचें उत्पादन ह्यांसंबंधाच्या आंकड्यांवरून त्यांस नफा किंवा तोटा किती होईल, हें अंदाजतां येतें. पिकांच्या अंदाजावरून त्यांचे भाव कसे रहातील व त्यांवर सट्टे कसे करावे ह्याचा कयास बांधतां येतो. तसेंच, त्यांवरून रेल्वेजना काम किती मिळेल हें कळतें व बँकांच्या पत्रकांवरून व ‘ क्लिअरिंग हौस ’ मधील चेक्स्च्या आंकड्यांवरून औद्योगिक व व्यापारी क्षेत्रांत वारा कोणत्या दिशेनें वहात आहे, हें समजतें. मजूरांच्या चळवळीमुळें व संपांमुळें कारखान्यांस ठोकर लागण्याचा संभव असतो, तर पिकांच्या परिस्थितीवर त्यांस पुढें येणारी किंमत अवलंबून रहाते. आगबोटींची वहातुक, मालाची ये-जा व त्यासंबंधांतली तारीखवार माहिती, वहातुकीस पडणारे दर, विम्याचा आकार इत्यादि वृत्तपत्रांत येणारा मजकूर व्यापारी वर्गास उपयुक्त असतो

व त्यांकडे त्यांचें लक्ष्य असतें. मोठ्या व्यवहारांवर होणारा बरा-वाईट परिणाम लहान व्यवहारांपर्यंतहि पोंचतो, ह्या दृष्टीनें सदरहु बातम्यांचें महत्त्व सर्वांसच आहे. अनेक प्रकारांच्या राजकीय व सामाजिक घडामोडींचा परिणाम व्यापार व उद्योगधंदे यांच्या परिस्थितीवर होतो, ह्यासाठी त्या सर्वांचें सूक्ष्म अवलोकन करणें आवश्यक असतें.

---

# पारिभाषिक शब्दांचा कोश



**अलॉटमेंट—** नवीन कर्ज किंवा भांडवल उभारण्यांत आलें असतां अर्ज मागविण्यांत येतात, तेव्हां जरूर रकमेपेक्षां जास्त रकमेचे अर्ज आल्यास, अर्जदारांत त्याची प्रमाणबद्ध वांटणी ( अलॉटमेंट ) करण्यांत येते, ती अलॉटमेंट होय.

**अंडर-रायटिंग—** नवीन विक्रीस काढलेलें भांडवलाच्या स्वरूपांतलें कर्ज त्याच्या दर्शनी किंमतीपेक्षां कमी किंमतीस विकत घेणें. हा धंदा करणाऱ्या 'अंडररायटर्सना' ह्या दोहों-मधल्या तफावतीइतका फायदा मिळतो. केव्हां, केव्हां हा व्यवहार अंगावरहि येतो.

**आर्बिट्रेज—** दोन बाजारांत विशिष्ट वेळीं असलेल्या रोख्यांच्या किंमतींतील तफावतीचा फायदा घेण्यासाठी एका ठिकाणीं विकणें व दुसऱ्या ठिकाणीं खरेदी करणें, इ० व्यवहार.

**आर्टिकल्स ऑफ असोसिएशन—** मंडळ्यांच्या अंतर्गत व्यवस्थेसंबंधाचे नियम. मेमोरँडममधील कलमांस ह्यांनीं बाध येत नाहीं.

**ऑप्शन—** ( अ ) 'कॉलः': विशिष्ट माल, रोखे किंवा भाग विशिष्ट दरानें व विवक्षित मुदतींत मिळण्यासंबंधीं 'अ' नें 'ब' शीं केलेला करार. ( ब ) 'पुटः': वरील-प्रमाणेंच, परंतु विक्रीचा करार.

**एक्सचेंज—** रोखे किंवा माल ह्यांच्या खरेदी–विक्रीचा बाजार. परराष्ट्रीय हुंड्यांच्या दरास 'फॉरिन एक्स्चेंज' म्हणतात.

**एक्स-डिव्हिडंड—** रोखा किंवा भाग ह्यावर जाहीर झालेल्या डिव्हिडंडवर खरेदीदाराचा हक्क असेल तर तें डिव्हिडंड एक्स-डिव्हिडंड होय.

**कम्-डिव्हिडंड**— रोखा एक्स-डिव्हिडंड आहे, असें जाहीर होण्याच्या दिवसापर्यंत होणारे सर्व व्यवहार कम-डिव्हिडंड असतात; म्हणजे खरेदीदारांचा रोख्यांवरील व्याजावर किंवा डिव्हिडंडवर हक्क असतो.

**कर-माफ व्याज- किंवा डिव्हिडंड**— मंडळीनें डिव्हिडंड वांटण्यापूर्वीं प्राप्तीवरील कर भरला असेल तर त्याबद्दल भागीदारावर पुनः कर बसत नाहीं. स्वतःच्या कर्जरोख्यांवर कित्येक वेळां सरकार कराची अगाऊ माफी देतें.

**कॅरी-ओव्हर**— भाग व रोखे ह्यांच्या खरेदी-विक्रीचे व्यवहार पुरे न करतां एका मुदतीवरून पुढच्या मुदतीवर ढकलण्याची केलेली व्यवस्था. ‘ कान्टँगो ’ पहा.

**काफीर्स**— दक्षिण आफ्रिकेंतील खाणींच्या मंडळयांचे भाग.

**कॉन्टँगो(बदला)**—रोख्याची किंमत वाढेल, ह्या अपेक्षेनें ‘ बुल ’ नें तो खरेदी केला असतां सेटलमेंटच्या वेळीं व्यवहार पुढें ढकलण्याकरितां द्याव्या लागणाऱ्या व्याजाचा दर. वायद्याची मुदत वाढवून घेऊन त्याबद्दल तो ‘ कॉन्टँगो ’ देतो.

**कॉल**— भागाच्या दर्शनी किंमतीइतके पैसे भागीदारानें सबंद भरले नसले, म्हणजे उरलेल्या रकमेची मंडळीनें केलेली मागणी.

**कॉलमनी**— मागणी बरहुकूम परत करावयाचें कर्ज.

**क्लिअरिंग हाउस**— परस्परांवर निघालेल्या चेक्ससंबंधांतल्या बँकांच्या देण्या-घेण्यांची वजावाट करण्याची व्यवस्था.

**कोरम**— मंडळीची सभा भरण्यास कायद्यानें जरूर असलेली गणसंख्या.

**गिल्ट एज्ड् सिक्युरिटीज**— सुवर्ण-वेष्ठित रोखे. कमालीची सुरक्षितता असलेले रोखे, उ० सरकारी कर्ज रोखे.

**ट्रेझरी बिल**— सरकार अल्प मुदतीचें कर्ज काढतें, त्यासंबंधांतला रोखा.

**गुडविल—** एकाद्या धंद्याची, फायदेशीर व्यवसाय ह्या दृष्टीनें पैशाच्या स्वरूपांत मोजलेली किंमत.

**डॉलर—** अमेरिकन (संयुक्त संस्थानें) राष्ट्राचें कायदेशीर चलन.

**डिबेंचर्स—** मुद्दलाबद्दल व व्याजासाठी आपली जिंदगी तारण लावून देऊन मंडळीनें उभारलेलें कर्ज. डिबेंचर्स धारण करणारांचेसाठी ट्रस्ट डीड बहुधा करण्यांत येतें. रजिस्टर्ड डिबेंचर्सची वर्गावर्गी, ते बेअरर असल्यास, परस्पर होऊं शकते; परंतु ते रजिस्टर्ड असल्यास तिची मंडळीच्या पुस्तकांत नोंद व्हावी लागते.

**डिस्कौंट—** ( १ ) हुंडीच्या रकमेवरील तिच्या मुदतीचें कापून घेतलेलें व्याज.

( २ ) रोख्याची, त्याच्या दर्शनी किंमतीपेक्षां कमी असलेली शेकडेवारीनें किंमत. एखाद्या रोख्याची दर्शनी किंमत १०० रुपये असेल व त्याची बाजारभावानें ९५ रुपये किंमत भरत असेल तर, तो रोखा ५ टक्के डिस्कौंटला आहे, असें म्हणतात.

**डिव्हिडंड—** मंडळ्यांनीं आपल्या भागांवर वेळोवेळ जाहीर केलेला भागीदारांच्या वांट्यास येणारा नफा.

**पटावट (वळण)—** वायद्याच्या सौद्यांतलें देणें-घेणें पार पाडणें ह्यास ‘ सेंटलमेंट ’ किंवा पटावट म्हणतात.

**पार—** भाग किंवा रोखे, त्यांच्या दर्शनी किंमतीस मिळत असले, म्हणजे त्यांची किंमत ‘ पार ’ समजली जाते. परराष्ट्रीय हुंडणावळीचा दर चलनांच्या परिमाणांस धरून असला म्हणजे तो ‘ पार ’ ला आहे, असें म्हणतात.

**प्रॉक्सी—** मंडळीच्या सभेस भागीदार हजर न राहिल्यास दुसऱ्या करवीं मत देण्याचा त्यास अधिकार असतो, तो.

**प्रॉस्पेक्टस—** मंडळ्यांच्या नवीन भांडवलांत रकमा गुंतविण्याविषयीं सूचना देणारें उत्पादकांचें जाहीर पत्रक.

**प्रीमियम—** रोख्याची अगर भागाची बाजारांतील किंमत दर्शनी किंमतीपेक्षां अधिक असेल तर त्यास प्रीमियम आहे, असें म्हणतात.

**पूल—** एखाद्या रोख्याची किंमत चढवून अगर पाडून, ते विकण्यासाठी किंवा विकत घेण्यासाठी कांहीं लोकांनीं केलेला गट.

**फ्रँक—** फ्रान्सचें कायदेशीर चलन.

**बकेट शॉप—** स्टॉक एक्सचेंजशीं संबंध नसलेल्या सट्टेवाल्यांस तुच्छतेनें लेखण्याचा शब्द. येथें जुगारीचे सौदे होतात.

**बदला—** ' कॉन्ट्रँगो ' पहा.

**बेअर—** विक्रीच्या वायद्याचा करार कमी किंमतीच्या खरेदींतून पार पाडण्यासाठी बाजारभाव उतरण्याची वाट पहात बसणारा सट्टेवाला.

**बेअर मार्केट—** बाजारांत बेअर लोकांचें प्राधान्य होऊन भाव खाली पाडण्याचें त्यांचें धोरण प्रभावी होऊं लागलें म्हणजे निर्माण झालेली परिस्थिति.

**बेअरर बॉंड—** वर्ग करण्याची जरुरी न रहातां, देवघेव होऊं शकणारे ठराविक दर्शनी किंमतीचे रोखे.

**बँक रेट—** मध्यवर्ती बँकेचा व्याजाचा दर.

**बुल—** वायद्यानें रोखा विकत घेतल्यानंतर त्याबद्दल किंमत न देतां, नफ्यानें तोच रोखा पुनः विकूं इच्छिणारा सट्टेवाला.

**मेमोरँडम ऑफ असोसिएशन—** मंडळीच्या स्थापनेसंबंधांतले करार-मदार.

**येन—** जपानचें कायदेशीर चलन.

**लॉंबर्ड स्ट्रीट—** पैशासंबंधाच्या बाजार-समुच्चयाचें लंडनमधील रस्त्याचें नांव.

**लिक्विडेशन—** दिवाळें वाजल्यानंतर मंडळीचें ' गुंडाळणें. '

**वायदा**— बाजाराच्या नियमांप्रमाणें ठराविक मुदतीनें व्हाव-याचा खरेदी-विक्रीचा व्यवहार. ज्या महिन्यांत हे व्यवहार पुरे व्हावयाचे त्याचें नांव वायद्यास देतात. जसें एप्रिल किंवा आश्विन वायदा.

**स्टर्लिंग**— इंग्लंडमधील कायदेशीर चलन.

**स्ट्रॅडल**— 'पुट' आणि 'कॉल' हे दोन्ही हक्क असण्यास स्ट्रॅडल म्हणतात. एका बाजारांत खरेदी व दुसऱ्या बाजारांत त्याबरोबरच किफायतशीर विक्री करण्यासहि स्ट्रॅडल म्हणतात.

**सिंकिंग फंड**— कर्ज फेडीसाठी बाजूस काढून ठेवलेला स्वतंत्र फंड.

**सेटलमेंटचा दिवस**—स्टॉक एक्सचेंज कमिटीनें ठरविलेला, वायद्याचे व्यवहार पार पाडण्याचा दिवस.

**हेज**— खरेदी-विक्रीपासून भावी नुकसान टाळण्यासाठी खरेदी-बरोबर विक्री आणि विक्रीबरोबर खरेदी करणें.

**हुंडी (बिल ऑफ एक्सचेंज)**— येणें असलेली रकम नमूद करून ती देण्याविषयीं धनकोनें काढलेला हुकूम.



# सूची



"अर्थ" ग्रंथमाला

संपादकः—प्रो. वामन गोविंद [illegible], एम्. ए.

सहायकः—श्री. श्रीपाद वामन [illegible], बी. ए.

## पुस्तक १ लें

# बँका आणि त्यांचे व्यवहार

या पुस्तकांत बँकांची घटना, व्यवहार व [illegible]मकाजाची पद्धति यांचें सोपपत्तिक विवेचन अत्यंत सोप्या भाषेंत केलेलें असून [illegible]कांनी आपला व्यवहार सुरक्षितपणें व [illegible] रीतीनें कसा करावा या बाबतीं अनेक महत्त्वाच्या व उपयुक्त सूचना [illegible] आहेत. शिवाय, या पुस्तकांत चलन, हुंडणावळ, आधुनिक तऱ्हेच्या बँका, [illegible] बँका, सावकारी धंदा, [illegible] मंदी, ठेवी, डिस्कौंट व कर्जे इत्यादि महत्त्वाच्या प्रचलित व व्यावहारिक [illegible] सांगोपांग चर्चा आली आहे.

सध्यांच्या परिस्थितींत प्रत्येक महाराष्ट्रीय [illegible] रिकास वरील प्रश्नांची माहिती व्हावी म्हणून **मराठीमध्यें** मुद्दाम त्यांचें बोधप्रद विवेचन या पुस्तकांत केलें आहे. विषयांची मांडणी व विवेचनपद्धति सुलभ असल्यानें सदर पुस्तक सर्वसाधारण वाचकांसहि उपयुक्त होणार आहे. किंबहुना, त्यांचेकरितांच तें सहेतुक लिहिलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सबब, बँकांचे भागीदार, ठेवीदार, डायरेक्टर गिऱ्हाइक, व्यवस्थापक आणि नोकर यांनीं विशेषतः हें पुस्तक अवश्य वाचावें.

**किंमत १ रुपया** ( ट. ख. निराळा ).

## पुस्तक २ रें.

# हिंदुस्थानची रिझर्व्ह बँक

हिंदुस्थानांत [illegible] मध्यवर्ती बँक ह्या नात्यानें रिझर्व्ह बँकेची स्थापना होऊन त्या[illegible] काम चालू झालें आहे. रिझर्व्ह बँकेची घटना, तिच्या कार्यांचा व्याप, तिचा इतर बँकांशी संबंध इत्यादि विषयांची सांगोपांग माहिती ह्या [illegible]कांत दिली असून रिझर्व्ह बँकेच्या कायद्याच्या निरनिराळ्या कलमांची छाननी केलेली आहे. अवघड विषयाचा सुलभ बोध व्हावा म्हणून पुस्तक-कर्त्यांनी बँकिंगच्या धंद्यांतले आधुनिक प्रकारचे व्यवहार, त्यांची उपपत्ति व त्यांचें कार्य ह्यांची [illegible] सोप्या मराठी भाषेंत चर्चा केली आहे आणि देशी व्यापार व उद्योगधंदे ह्यांच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें कोणत्या योजना अमलांत आणल्या पाहिजेत ह्या संबंधानें व्यावहारिक [illegible] [illegible] रिझर्व्ह बँक ही, राष्ट्रीय आर्थिक प्रगतीस परिपोषक होईल काय ? ह्या प्रश्नाचें [illegible] पुस्तकांत [illegible] मिळण्यासारखें आहे. पैसा आणि पत ह्यांच्या व्यवहारांच्या बाबतींतली, प्रमुख पाश्चात्य राष्ट्रांतल्या पद्धतींची त्यांत दिलेली माहिती जिज्ञासू विद्यार्थी व धंदेवाले ह्यांस उपयुक्त होईल.

**किंमत १ रुपया** ( ट. ख. निराळा. ).